# ध्यास

पु. भा. भावे




१९५० ]

[ मूल्य ४ रुपये

ती. नी. बा. तथा बाबाजी

व

कवि राजा बढे

ह्या सहृदय पितापुत्रांस

दुसऱ्या दिवशीं सकाळीं अनंत जगन्नाथ ब्रह्मे, जात ब्राह्मण, वय तीस, अविवाहित, दुहेरी पदवीधर, धंदा शून्य ( म्हणजे वडिलांनीं आपल्या एकुलत्या एका मुलासाठीं मिळवून ठेवलेली संपत्ति भोगणें किंवा व्यवहारज्ञांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे ती भोगण्याचें दैवी नसल्यामुळें अगदीं आंधळ्या वेडाच्या लहरींत असल्याप्रमाणें वागणें ) ह्याच्या रक्ताचा शिडकाव झालेले, त्याच्याच अक्षरांतले व त्याच्याच स्वाक्षरीचे कांहीं कागद मृताच्या भव्य शयनगृहांत सापडले.

अनंत जगन्नाथ ब्रह्मे, तत्त्वचिंतक, अखंड जिज्ञासु, पढिक पुस्तकी, अतृप्त ज्ञानपिपासु ह्याने आज पहाटे सहस्रवधि पुस्तकांनीं खचलेल्या आपल्या शयनग्रहांत दोन भुवयांच्या मधोमध पिस्तुल झाडून घेऊन आत्महत्या केली होती. त्या कागदांवर व इतस्ततः त्याचें रक्त उडालें होतें. फुटक्या बरणींतून सांडणाऱ्या दह्याप्रमाणे मेंदू बाहेर झिरपत होता. पलंगावर कोसळतां कोसळतां त्याची एक उचलति तगडी जणुं जगावर लाथ हाणण्याच्या पवित्र्यांत पलंगाच्या कठड्यावर तशीच अडकून पडली होती. कोणा नव्या वस्तूची ओळख करून घेताना एकाद्या मुलाच्या तोंडावर उमटावें तसें कुतूहलात्मक, निरागस प्रश्नचिन्ह त्याच्या कोवळ्या, नितळ चेहऱ्यावर आताहि उमटलेलें दिसत होते. त्याचे बारीक भेदक बदामी डोळे थिजलेला टक लावून अद्यापहि जणुं एकाद्या रहस्याचे एकाग्रपणें वेध घेत होते. आणि त्या सडपातळ, गौरवर्ण देहाच्या मानानें असामान्य आकाराचें असणारें त्याचें भरीव डोकें टिचून व फाटून गेले होतें. हेंच तें आमजनतेला विलक्षण, विचित्र, फिरलेले वाटणारें अनंत जगन्नाथाचें आक्षेपार्ह डोकें! अगदीं चमत्कारिकपणें चालणारें! विवाहाच्या, व्यवहाराच्या, व्यसनाच्या वा संसाराच्या चाकोरींत घरंगळत जावयास नकार भर-

णारें, साऱ्या विश्वाचा व्याप आपल्या इवल्याशा कक्षेत उकलूं बघणारें, शनी, मंगळ, राहू, अनंत ग्रहतारका व अमर्याद अवकाश ह्यांत भिरभिरण्यासाठीं झेपावणारें आणि तरीहि देहाशीं व मातीशीं बद्ध असणारें व अखेर मातीचेंच असलेलें! विश्व तोलण्याच्या प्रयत्नाचा परिणाम त्या मस्तकानें आतां भोगला होता. अवकाशाचा अमर्याद सागर उपसतां उपसतां तें मृण्मय पात्र तडकून गेलें होतें. केवढेंहि मोठें मडकें झालें तरी त्यांत सीमाशून्य सागर कसा सामावेल? आणि कितीहि भरीव मस्तक झालें तरी त्याला विश्वाचा व्याप कसा तोलेल?

अनंत जगन्नाथाचें अद्भुत आकाराचें डोकें साऱ्यांनाच नेत्रशल्यासारखें वाटत होतें. अतृप्त समस्यांचें तें उगमस्थान, अशांत शंकांचें तें आश्रयस्थान, सुखशांतीचें तें धूमग्रस्त स्मशान, अखेर अनंत जगन्नाथालाहि नेत्रशल्यासारखेंच झालें असले पाहिजे. शरीराच्या त्या त्रस्त व पीडादायक प्रांतावरच त्याने गोळी झाडली होती. संख्याहीन प्रश्नचिन्हांपुढे पडलेला तो स्फोटक पूर्णविराम होता. ज्यानें अनंत जगन्नाथाच्या ऐन तारुण्यास अस्वस्थतेच्या इंगळ्या लावून तें असह्य करून सोडलें, त्या कुचकामी मडक्याच्या त्यानें आता ठिकऱ्या उडवून टाकल्या. असुख उत्पन्न करणाऱ्या, पण सुख न सांगणाऱ्या पीडादायक पापाचें प्रायश्चित अनंत जगन्नाथाच्या मस्तकानें अखेर असें घेतलें! आत्मनाश! त्याच्या मस्तकाचा तो अखेरचा संदेश होता. अनंत जगन्नाथाचा नाश! त्याच्या मस्तकाचा नाश! त्याच्या समस्यांचा नाश! अस्वस्थतेचा नाश! दुःखाचा नाश! आणि या साऱ्यांना जन्म देणाऱ्या त्या मस्तकाचाहि नाश! आतां हा अखेरचा, निर्वाणीचा एवढाच मार्ग होता.

...अनंत जगन्नाथाचें लेखन संपत आलें. कागदाकागदावर त्यानें स्वाक्षरी केली, व पलंगालगतच्या मेजावर ते जुळवून ठेवले. टोकरीनें पुस्तकें उडवून देत तो दालनभर हिंडला. त्यानें कपाटें पालथीं केलीं, ग्रंथाचें ढीग पायाखालीं तुडवले व एकाला पेटती काडीहि लावून दिली.

मस्तकांतील आग भडकती ठेवणारी, तिला पोसणारी, पण तिला कधींहि न शमविणारी हीच ती दुष्ट, दुःसह, अर्थशून्य सामग्री! जळून जाण्यास, नष्ट होण्यास, अगदी योग्य!—आणि आतां हें मस्तक...

मस्तकाच्या त्रुटीविषयीं मस्तकानेंच निर्णय दिला. मस्तकाच्या पापाचें, अपूर्णतेचें प्रायश्चित मस्तकानेंच सांगितलें. मस्तकच अपराधी होतें व मस्तकच न्यायदातें! आत्मनाश! मस्तकाचा हाच निर्णय व हाच अंतिम संदेश होता.

अद्याप पाचला दहा मिनिटें होतीं. "अनंत जगन्नाथाचें प्रयाण—ठीक पांच वाजतां!" ध्वनिक्षेपकावरून कार्यक्रमाचे विस्तारलेले शब्द उमटावे, तसे अनंत जगन्नाथाच्या मस्तकांत शब्द घुमले. त्याला वाटलें कीं, मृत्यूच्या नुसत्या समीपतेनें त्याची मस्तिष्ककक्षा आकाशकक्षेसारखी विशाल होत आहे. अनंताशीं एकरूप होण्याच्या क्रियेचा प्रारंभ मृत्यूच्या निर्णय-क्षणापासूनच जणुं सुरू झाला आहे. तो खिडकीशी जाऊन उभा राहिला. पहाटेचें वैभव बहरास आलें होतें वर रत्नखचित आकाश झळाळत होतें. शीतल वायू पळस घेत लहरावत होता. रात्रीच्या पूर्णावस्थेस गेलेल्या क्रिम-येनें बागेंतील फुलें फुलवलीं होतीं. जेव्हां तीं फुललीं तेव्हांच तीं मेलीं, नव्हे का?—अनंत जगन्नाथास वाटलें. जन्माचा क्षण म्हणजेच मरणाचा जन्म नव्हे का? पूर्णावस्थेची परिसीमा म्हणजेच विनाशाचा प्रारंभ नव्हे का? पक्वता म्हणजे पतनाची, दुर्दशेची निशाणी, असेंच कीं नाहीं? जें फुललें तें गळेल. जें पिकलें तें सडेल. आजचीं फुलें म्हणजे उद्याचा पाचोळा! आजचा माणूस म्हणजे उद्याची माती! अगदी शुद्ध, केवळ माती! माती-सारखी माती! ही शिवाजीची माती, ही नेपोलियनची माती, ही तथागत बुद्धाची, ही पाणिनीची, ही समरधुरंधर महामानी प्रतापची, ही धर्मसूर्य शंकराचार्यांची, अशी तिची मुळींच कांहीं ओळख असणार नाहीं. माती... निव्वळ माती!

तर मग कोठें जातात ते सारे? कोठें जातो फुलांतला सुगंध? कोठें जाते जळक्या काजळांत समाप्त झालेली ज्योती? काय तेथें सुगंध नव्हताच? काय ज्योति नव्हतीच तेथें? तेथें कोणतेंच तेज, कोणतीच चित्शक्ति, कोणतीच विदेही, अशरीरि चेतना, कोणतेंच केवळ सौंदर्य नव्हतें? पुण्यवंताचीहि माती आणि पाप्याचीहि माती! पद्मिनीचीहि माती आणि कुब्जेचीहि माती! फुलांचीहि माती आणि काट्यांचीहि माती! कुठें आहे फुलाची मृदुता? कुठें आहे पद्मिनीचें सौंदर्य? कुठें आहे कंटकाची दुष्टता? व कुठें आहे कुब्जेची कुरूपता? माती! सारी माती!

तर मग कुणी मांडला हा सारा खेळ? हे मातीचे पुतळे कुणी घडविले! आणि कां? त्यांना कां घडविलें, कां खेळविलें, आणि पुन्हां मोडून मातींत कां मिळविलें? मी मात्र कुणाकडून तरी, कुणाच्या लहरीसाठीं, कोणा अज्ञात क्षणीं मोडला जाणार नाहीं. हा आतांच मी स्वत:ला मोडून घेणार. बरोबर पांच वाजतां! अरे निजणाऱ्यांनो! तुमचा मृत्युक्षण तुम्हांला माहीत नाहीं. माझा मृत्युक्षण मी जाणतों. तो माझा मीच निर्माण केला आहे. साडेतीन हाताचें हें ओल्या मातीचें पोतें, मातीच्या अनंत ढिगाऱ्यावर माझ्याच इच्छेनें व माझ्याच हातानें मी रितें करणार आहें. हें बाहुलें स्वेच्छेनें निर्माण झालें नव्हतें, पण तें स्वेच्छेने नष्ट मात्र होणार आहे. स्वेच्छेनें? पण म्हणजे कोणाच्या इच्छेनें? मातीच्या इच्छेनें तर निश्चित नव्हे! तर मग हा इच्छा करणारा कोण? कोठला? तो आपली प्रेरणा कोठून घेतो? आणि या मातीच्या तकलादू घरट्यांतील रहिवास संपल्यावर तो जातो कोठें? कशाचा त्याला आधार? कीं तोहि केवळ मृत्तिकेचेंच संतान असतो? आणि मृत्तिकेलाच मिळतो? हा इच्छा करणारा, हा दोन डोळ्यांतून लुकलुकत डोकावणारा, हा साडेतीन हातांच्या पंजरांत चिरचिरत व फडफडत राहणारा, हा मृत्तिकेची चेतना असणारा, तिचें सौंदर्य असणारा, हा ह्या मृत्तिकापात्रांतील जीवन असणारा? हें पात्र फुटलें, या भिंती भंगल्या, हा पंजर तुटला, म्हणजे मग कोठें जातो तो? बीज रुजतें, रोप उगवते,

त्याचा वृक्ष होतो. तो पानाफुलांनी व रसभरित फळांनी समृद्ध होतो. त्यालाहि जीवन असतें. त्याला श्वसन असतें. त्यालाहि रंगरूप असतात. वाऱ्यावर तो डोलतो. जलवर्षावानें पुलकित होतो. उष्णता व धूळ त्याला म्लान करतात. डोलणारें, हलणारें, फुलणारें, सुफलित होणारें, हिरव्या चेतनेनें रसरसलेलें, बहरास येणारें, त्याचेंहि जीवन मापलेलें असतें. वृक्ष सुकतो, उन्मळून पडतो, तोडला जातो आणि अखेर त्याची माती होते. त्यानेंच विखरून टेवलेल्या बीजरूपांत असेल तेवढेच त्याचें अस्तित्व. पण रंगरस-फुलोर देणाऱ्या त्याच्या हिरव्या चैतन्याचें काय होतें ? माती ? केवळ माती ? काल तो होता. आज तो नाहीं. बस–येवढेंच काय ? जें अगणित सुकलेल्या, मेलेल्या मातीस मिळालेल्या वृक्षांचें होतें ? जन्मले–वाढले–सुकले–मातीस मिळाले. पुन्हां शून्याकार. असख्यात मातीस मिळणाऱ्यांपैकीं एक. त्याच मातींतून पुन्हां नवें जीवन व त्या जीवनाचीहि पुन्हां माती. तीच माती आणि नवीं मडकीं. पण त्यांतलें जीवन ? त्यातील चेतना ? हा अनंत जगन्नाथ ब्रह्मे, विचार करणारा, अस्वस्थ होणारा, ओढ लागलेला, मातीच्या या मुर्दाड तटावरून उडूं बघणारा...?

—कर्रर्रऽऽ ! कर्रर्रऽऽ ! कररररर ऽऽ ! समोरच्या घरांत खट्‌कन दिवा लागला. व कोणी विद्यार्थी पुस्तक घोकूं लागला. कोणी गृहिणी सडा घालूं लागली. एक मरतुकडें कुत्रें जांभया देत मार्ग ओलांडून गेलें. कुणी म्हातारा बागेंत फुललेलीं फुलें परडींत गोळा करूं लागला. करर–टिन्-टिन्-टिन् टिन्- ! दुसरें घड्याळ केकाटूं लागलें, दुसऱ्या घरांत दिवे लागले.

अनंत जगन्नाथ दचकला व काहींसा भानावर आला. त्यानें मागें वळून पाहिलें चार पंचावन्न ! अद्याप पांचला पांच मिनिटें होतीं टीक पांचला तो मरणार होता. टीक पांचाला काय ? व पांच मिनिटें म्हणजे तरी काय ? सोमवार, मंगळवार, बुधवार, गुरुवार, शुक्रवार ! स्वतःच्या सोयीसाठी, स्वतःच्या बुद्धीप्रमाणें काळावर तुम्ही डकविलेल्या ह्या चिठ्या ! पळांच्या, घटकांच्या दिवसांच्या, मासांच्या, वर्षांच्या व शतकांच्या चळती रचून, अरे क्षुद्रांनो

तुम्ही काळ मापूं पाहतां काय? कशाचे एकोणीसशें अठ्ठेचाळीस? संख्येच्या मर्यादेची अटक काळाला घालण्याइतका तुमचा दंभ, तुमचें अज्ञान व तुमचें धारिष्ट वाढलें काय? संख्येच्या पंजरांत तुम्ही कधीं अनादि व अनंत काळास बद्ध करूं शकाल काय? एकोणीसशें अठ्ठेचाळीस! एकोणीस सहस्र अठ्ठेचाळीस! एकोणीस लक्ष अठ्ठेचाळीस! एकोणीस कोट...!! वाढवा, वाढवा, वाढवत बसा संख्या! पाहूं ती काळाच्या कोणत्या तरी टोकास पोहोंचते काय? पाहूं ह्या संख्येच्या साखळीनें काळाचें गणन होतें, कीं तुमचें व तुमच्या नगण्य जातीचेंच सारें अस्तित्व मापून निघतें! तुम्ही नव्हतांत तेव्हांहि तो असेल! ज्यानें तुमचा पाळणा पाहिला, तोच तुमची चिताहि पाहील. त्याच्या प्रचंड, अनंत अनादि, पार्श्वभूमीवर अगणित इवलाले कीटक धडपडले, नाचले, धांवले व उरीं फुटून नष्ट झाले. अनेक कृमींचीं, मानवांचीं, वनस्पतींचीं, पर्वतांचीं, सागरांचीं व ग्रहगोलांचीं कुळें जन्मलीं व नष्ट झालीं. आणि हें सारें पहात तो तसाच स्थिर होता. तो कधीं पुढें गेला? आणि कधीं मागें गेला? पुढें आणि मागें तुम्ही गेलांत, धांवलांत, धडपडलांत, गर्वोद्धत झालांत व रडत बसलांत, जन्मलांत आणि मेलांत, पण तो मात्र तसाच निश्चल, अविकारी, अनंत व अविनाशी होता! पुढें आणि मागें, आज, काल आणि उद्यां, ह्या साऱ्या तुमच्या उपाधि! जेव्हां दिवसांमासांना नांवें नव्हतीं, तेव्हां काळ नव्हता काय? सोमवार–मंगळवार–बुधवार–गुरुवार! एकोणीसशें... अठराशें... सोळाशें...अकराशें!–जा, अणखी मागें जा. आणखी मागें जा. आणखी मागें! कुठवर जाऊं शकतां तुम्ही? आणि आपल्या मातीच्या डोळ्यांनीं कुठवर पाहूं शकतां? काय पाहूं शकतां? आणि किती, किती–किती म्हणून मागें जाणार तुम्ही? व पुढें तरी किती जाणार? मातीनें बांधलेल्या मुर्दाडांनो, तुमची शक्ति तरी किती? निमिषार्धांत तुम्हाला धांप लागेल व तुम्ही उरीं फुटाल! तें कराल सत्य आकलन करण्याचें तुमचें सामर्थ्य नाहीं! तें जाणावयाचें असेल, तर...!

—कू—कू—कुच् ! कू—कू कुच् ! आकाशांतून कोवळी साद घालीत इवलाल्या पांखरांचा एक थवा उडत गेला. त्यांच्या पंखांची संमीलित फडफड जणुं अनंत जगन्नाथाच्या अगदीं कानाशीं झाली. लाडावत, भुंकत, धांवत, परस्परांना चावे घेत दोन केसाळ कुत्रीं रस्त्यावरून धांवत गेलीं. त्या सुंदर प्राण्यांमागोमाग, त्या सुंदर पांखरांमागोमाग, अनंत जगन्नाथाचें मन धाऊन आलें. हे पक्षी चिवचिवत उडतात. आणि हे प्राणी लवलवत धांवतात. कुत्रीं, हरणें, ससे, नागमोडी लचकते चित्रविचित्र सर्प, पोपट, मैना, घार, चिमण्या, मोर ! नर्तन, गायन, भक्षण, उत्पादन आणि मरण ! गजबजलेल्या जीवनांतली आणखी एक पातळी. किती प्रेमळ असतात कुत्रीं ! किती शूर, किती भाविक, किती निष्ठावंत. तीं धावतात, लाडावतात, प्रेम करतात, सेवा करतात आणि मग एक दिवस कांहींच करीत नाहींत. त्यांचीहि एक दिवस मातीच होते. मंजुळ आलाप घेणाऱ्या कोमल कोकिळांचे थवेहि मेलेल्या मृत्तिकेंतच लब्ध होतात. पण मग त्या संगीतमय, तरळत्या, चेतनेचें काय होतें ? आणि कुत्र्याच्या मायेचें प्रेमाचे काय होतें ? माती ? जशी एखाद्या झाडाची माती व्हावी, तशीच माती ? जसें झाडाचें मरण, तसेच त्यांचेंहि ? त्या जीवकोटीची जी गत, तीच ह्या अधिक बोलक्या, अधिक जवळच्या जीवकोटीचीहि गत ? माती ! केवळ माती ! दुसरें कांहीं नाहीं ? दुसरें कांहीं नाहीं ! झाडांची माती ! पशूंची माती ! पक्ष्यांची माती ! प्रेमाची माती ! निष्ठेची माती ! श्रद्धेची आणि विश्वासाचीहि माती ! नरडें फोडून रक्त पिणारा सिंहहि मातींत ! बेंबटत नरडें फोडून घेणारें कोकरूंहि मातींत ! क्रौर्यहि मातींत ! अशरणताहि मातींत ! आणि ह्या अनंत जीवकोटींतील उत्तम मानला गेलेला प्राणी ? अहंमन्य, बुद्धिगर्वी, माणूस ? तोहि अगदीं त्याच प्रकारें मातींत लोटला जातो काय, कीं ज्या प्रकारें प्रतिदिनीं झाडावरून गळून पडणारीं अब्जावधि पानें मातींत मिसळतात ? वृक्षांवरून गळणारें पानहि मातींत, मानवी वंशवृक्षावरून गळत राहणारीं माणसेंहि मातींत ? माणसाच्या कल्पना,

त्याच्या भावना, त्याच्या जिज्ञासा त्याचे शब्द, ह्या साऱ्यांच्या तोंडांत अखेर केवळ मातीच लोटली जाते काय? मृतांनीं गजबजलेल्या मृत्तिकेंत आपणहि लिंपित होणें येवढेंच त्याचें भाग्य काय? हाच त्याचा परिणाम? हाच त्याचाहि शेवट? मातीविना दुसरें चिन्ह नाहीं? मातीविना त्याला दुसरें अस्तित्व नाहीं?

कडकडून झालेल्या प्रश्नचिन्हाच्या दंशामुळें अनंत जगन्नाथ भानावर आला. आतां केवळ दोन मिनिटें उरलीं होतीं. जित्याची खोड मेल्याविना जात नाहीं, हेंच खरें! ह्या अखेरच्या दहा मिनिटांतहि त्याच्या मस्तकाला अनुत्तरित प्रश्नचिन्हांचाच ध्यास असावा काय? प्रश्नचिन्हापायीं नष्ट होण्याच्या मार्गावर असतांहि त्याचें मस्तक प्रश्नच विचारीत होतें. त्याचें आयुष्य आणि त्याचे मार्गहि सर्वसामान्य लोकांना प्रश्नचिन्हांकितच करीत होते. 'वेड–शुद्ध वेड!' ते सारे आजवर म्हणत आले होते. ते झोपलेले व अर्धजागृत थोड्याच अवकाशांत जेव्हां येथें घोळक्यानें जमतील, तेव्हां तर ते आक्रोशून ओरडतील, "वेड! भयंकर वेड" पण खरोखर वेड आहे कोणतें? त्याचें कीं...?

एक मिनिट. पहांट फटफटत होती. वस्तूंत आकार येत होता. अंधाराच्या व अज्ञाताच्या गर्तेत गाडलें गेलेलें जग पुन्हां आकारास येत होतें. काळोखाच्या धुळींत जें तात्पुरतें बुजलें व मेलें होतें, तें जणुं पुन्हां जन्मत होतें. अर्धअंधाराच्या चिखलांत जें विरलें होतें, तें आतां पुन्हां विलग होत होतें व त्याच चिखलास अनेक स्वतंत्र आकार देऊन आपला पृथक पसारा मांडीत होतें, जे रात्रीसाठीं मेलें होतें, तेंच सारें आतां अंधेराचें उदर फाडून पुनर्जीवित होत होतें. पलीकडचा रस्ता, घरें, बाग, अनंत जगन्नाथाच्या परिसरांतली हिरवळ, कारंजें, लताकुंज सारीं अंधाराच्या काळ्या प्रस्तरांतून कोरून काढलेल्या कलाकृती प्रमाणे अधिकाधिक स्पष्ट होत होतीं. जेव्हां झोपलेलं जग जागें होणार होतें, तेव्हां अनंत जगन्नाथ चिरनिद्रेत विलीन होणार होता. चिर-

निद्रा ? की चिरजागृति ? खरोखर कोण झोंपणार होतें आणि जागें कोण होणार होतें ? तें की तो ? गुंगी कोणास येणार होती व जागृति कोणास येणार होती ?

—" अनंत जगन्नाथ ब्रह्मे. प्रयाण ठीक पांच वाजतां ! " ध्वनिक्षेपकावरून घुमावेत तसे अनंत जगन्नाथच्या मस्तकांत शब्द घुमले. घाईनें तो मागें वळला. जणुं एखाद्या आवडीच्या प्रवासास तो आतां निघणार होता. गुंड्या दाबून त्या भव्य दालनांतील प्रत्येक विद्युद्दीप त्यानें पाजळला व लिहून काढलेले कागद जुळवून मेजावर ठेवले. " र्रर्र— टन् " घड्याळांत पांचाचा पहिला ठोका पडूं लागला. आणि मग " टन्—टन्—टन्—धाड् ! " पिस्तुलाच्या बारानें पांचवा ठोका अलगत झेलला व एखाद्या चुरगळलेल्या कागदाच्या कपट्याप्रमाणें 'अनंत जगन्नाथ ब्रह्मे' ह्या नांवाची चिठ्ठी धारण करणारें मातीचें बाहुलें वाकडेंतिकडें पलंगावर कोसळलें. जें प्रश्नचिन्ह त्यानें जन्मभर आपल्या चेहऱ्यावर वागविलें, तें आतांहि तेथें तसेंच होतें. कुतूहलानें प्रश्न विचारणाऱ्या एखाद्या निरागस मुलासारखाच त्याचा भाव होता. साऱ्या जगावर लाथ झाडल्यासारखी त्याची एक तंगडी पलंगाच्या कठड्यावर अडकली होती. त्याच्या बारीक भेदक बदामी डोळ्यांपैकीं एक पूर्णपणें उघडा होता व दुसरा अर्धवट मिटलेला होता. थिजल्या एकटकी नजरेनें कोणा अनाकलनीय रहस्याचा भेद घेत असतांनाच जणुं तो डोळा मिचकावून इतरेजनांची चेष्टादि करीत होता !

दारें फोडलीं गेलीं, हांका मारल्या गेल्या व चाळवलेल्या वारुळांतील मुंग्याप्रमाणें लोक तेथें धांवले. कोणी धोतराच्या सोग्यानें घाम पुसला, कोणी डोळे टिपले आणि कोणी 'हें असेंच होणार होतें' अशा अर्थानें माना हालविल्या !

" वेडा !—अगदीं वेडा ! " कुणाच्या तरी तोंडून शब्द निसटले.

" मिस् माया वाईट होती का मुलगी ती ? पण तिला ह्यानें झिड-कारलें. " दुसरा म्हणाला.

" लग्न केलं असतं, पोरंबाळं झालीं असतीं, तर गोष्टी या थराला जात्या ना ! "—तिसरा.

" सात पिढ्या पुरेल इतका पैसा बापानं ठेवला होता. पण दैवीं पाहिजे ना ? "—चवथा.

" कधीं कुणांत मिसळणं नाहीं, कधीं कुणासारखं वागणं नाहीं ! " —पांचवा.

" कधीं नाटक नाहीं, सिनेमा नाहीं, मग विडीकाडी लांब राहिली ! "

" घातला तो पैसा पुस्तकांच्या उरावर घातला ! " हा त्याचा परिणाम ! "

" वेडा-वेडा—शुद्ध वेडा ! " दोन चार सूर जिभेनें ' चक् चक् ' करीत सरमिसळीनें म्हणाले.

" A stark, staring lunatic ! " कुणीतरी तेवढ्यांत डौलदार इंग्र-जीची तलफ भागवून घेतली.

" वेडा-वेडा-वेडा ! वेडा-वेडा-वेडा- ! " ओटा ओटावरून शब्द फिरत असतांच वाऱ्याच्या वेगवान् झोतानें खाडकन् खिडकी उघ-डली व त्यानें मेजावर रचून ठेवलेले कागद भिरभिरत त्यांच्या तोंडावर उडाले. अनंत जगन्नाथानें मेल्यावरहि वाद करीत त्यांच्या तोंडावर फेकलेलें हें उत्तर होतें——

*   *   *

" वेडा ? अरे कोण वेडा ? वेडे तुम्हीं, कीं वेडा मी ? संख्येच्या बळावरच ह्या प्रश्नाचा निर्णय लावतां येईल काय ? चूलबोळक्यांचे संसार मांडणारे व त्यांतच दंग होणारे बहुतेक सारे आहेत व मी तसा नाहीं, म्हणून मी वेडा काय ? एखाद्या मातीच्या पुतळीला कवटाळून वीण वाढवीत बसणारेच बहुतेक आहेत व मी तसा नाहीं, म्हणून मी वेडा काय ? जें निश्चित संपणारच अशा आयुष्याला घट्ट पकडून बिलगत बसणारे

बहुतेक आहेत व मी तसा नाहीं, म्हणून मी वेडा काय? तुमचे रीतिरिवाज, तुमच्या बालिश कल्पना तुमचे क्षुद्र जीवनादर्श, तुमची तुच्छ सुखदुःखे, तुमचे नगण्य हर्षविषाद, तुमच्या इवलाल्या समस्या, तुमचे तिरस्करणीय संघर्ष, तुमची नाममात्र ज्ञानलालसा, ह्यांत मी सहभागी नव्हतों, म्हणून मी वेडा काय? केवळ संख्या, माझा स्वर बुडवून टाकील असा केवळ संख्येचा कल्लोळ हेंच माझें वेड सिद्ध करण्याचें तुमचें एकमात्र साधन आहे ना? तर मग खुशाल मला वेडा म्हणा, व सुखी असा! मूढांच्या जगांत ज्ञाताहि मूढ ठरतो. चिकित्साशून्यांच्या जगांत चिकित्सक बुद्धिहीन गणला जातो. कद्रूंच्या समाजांत उदारात्म्याची संभावना व्यवहारशून्यतेच्या पदवीनें होते. जडवाद्यांच्या मापानें अध्यात्मवादी वेडा ठरतो व अध्यात्मवाद्यांच्या दृष्टीनें जडवादी! आणि तुमचीं सारीं मूल्यें व सारे जीवनप्रकार लाथाडूं शकणाऱ्या एकाद्या वेड्याचा तुम्हांस हेवा वाटत नाहीं काय? तुमची भाषा त्याला कळत नसेल, तर त्याचीहि भाषा तुम्हांस कळत नाहीं! त्याचें वर्तन तुम्हांस समजत नसेल तर तुमचेंहि वर्तन त्याला समजत नाहीं! तो तुमच्यांत असतो, आणि तरीहि तुमच्या नियमांनीं, सुखदुःखांनीं तो बद्ध नसतो! त्याची भाषा वेगळी, सुखदुःखें वेगळीं, जीवनप्रकार वेगळा! अगदीं शक्य आहे कीं, वस्तुतः तोच सुखी असेल, तोच ज्ञाता असेल, व तो मुक्तहि असेल. तुमच्या सहवासांत तो असेल आणि तरीहि तुम्हां क्षुद्रांविषयीं तो सर्वस्वीं विस्मृत असेल. तो तुमच्यांत असेल आणि तरीहि तुमच्या संकीर्णतेपासून, संघर्षाणापासून, दुष्टतेपासून, तो अलिप्त असेल. तुमच्या खेळांत तुम्ही त्यास नगण्य मानीत असाल, तर त्याच्याहि खेळांत तो तुम्हांस नगण्य मानतो. तर मग त्याच्यापेक्षां तुम्ही अधिक श्रेष्ठ कसे? वरचढ कसे? ज्ञानी कसे? केवळ संख्येच्या व कल्लोळाच्या बळावर काय?

परंतु तुमचें तें बळहि मी मानीत नाहीं. तुमच्या आंधळ्या 'मूर्खत्वाला मान देत, तुमच्या वेड्या वळणावर माझेंहि आयुष्य लांबवीत व

वांकवीत रहाण्याइतका मी मूढ नाहीं. अवश्य वाटलें तोंवरच मी जगलों. पृथ्वीशीं व तुमच्याशीं बद्ध करून ठेवणारा ऐहिक जीवनाचा हा धागा आतांच मी ताडकन् तोडणार व मोकळा होणार. ह्या मातीच्या पंजरांत असाच फडफडत बद्ध होऊन राहण्याचें मी निश्चितीपूर्वक नाकारतों. पंजर! पंजरच! साधन नव्हे! मला, माझ्या ज्ञानपिपासेला, माझ्या कुतूहलाला, माझ्यांतील भरारी घेऊं पहाणाऱ्या चेतनेला डांबून व लिंपून ठेवूं बघणारा साडेतीन हाताचा क्रूर, संकीर्ण, असह्य, मृत्तिकापंजर! माझ्यांतील सत्त्वाभोंवतीं उभारलेल्या कठोर पण रंगीबेरंगी भिंती! माझ्यांतील तेजोगर्भाला झांकळून टाकणारी अपारदर्शक छाया! माझ्या आकाशगामित्वाच्या पायांत घातलेल्या साडेतीन मणाच्या सांखळ्या! अंतिम सत्यापासून मला अलग ठेवणारें मायावी अज्ञानाचें जड कुंपण! हें कुंपण मी मोडणार! ह्या सांखळ्या तोडून टाकणार! ह्या भिंती उध्वस्त करणार! ह्या पंजराच्या ठिकऱ्या उडविणार!— पाप? आत्महत्येचा मृत्यू हें पाप? आणि अपघाताचा जन्म हें मात्र पाप नव्हे? ह्या अशा मृत्यूचें अंतिम दायित्व त्या तशा जन्मावरच जात नाहीं काय? हा मृत्यू जर पातकी, तर ह्या मृत्यूस कारणीभूत होणारा तो जन्म किती पातकी? हा मृत्यू मी मागत असलों, तरी तो जन्म मात्र मी मागितला नव्हता. त्याला माझी संमति नव्हती. कोणी पाठविलें मला येथें? कां पाठविलें? कोणाच्या संमतीनें? ह्या मर्यादांच्या जगांत. ह्या मातीच्या जगांत. ह्या अंधकाराच्या जगांत. माझ्या विश्वदर्शनोत्सुक नेत्रांवर लघुदृष्टीची जड झांपड फेकून! अज्ञानाचें व संदेहाचें असह्य ओझें माझ्या मस्तकीं देऊन! साडेतीन हात मातींत माझी स्वैरविहारी चेतना चिणून टाकून! अवकाशाच्या अनंत चक्रांत भिरभिरणाऱ्या असंख्य गोलांपैकीं एका तुच्छ मृत्तिकाकणावर कोणी जखडून टेवलें मला? येथल्या सुखानें मला सुख नाहीं. येथल्या ज्ञानानें मला शांति नाहीं. येथील मृगजळाच्या प्राशनानें माझ्या चिरतृषित आत्म्यास तृप्ति नाहीं. पहा, दैदिप्यमान् तारकांनीं आकाश कसें डंवरून आलें आहे. भुंग्यानें

फुलाफुलावर उड्डाण करीत जावें तसें ग्रहाग्रहांवर व ताऱ्याताऱ्यांवर मला उड्डाण करीत जावेसें वाटतें. नदीच्या ओघावरून सुसाट उडणाऱ्या बगळ्याप्रमाणें आकाशगंगेच्या प्रवाहावरून मला तरंगत जावेसें वाटतें. अंतर! अवकाश! त्यांचीच अटक मला मोडावयाची आहे. त्यांच्या रहस्याचाच मला भेद घ्यायचा आहे. नवग्रहांची रत्नजडित माळ मला परिधान करायची आहे. सूर्यचंद्रांचीं कुंडलें मला कानांत घालायचीं आहेत. शनीमंगळांच्या आंगठ्या मला बोटांवर चढवायच्या आहेत. जरतारी टिकल्यांनीं नटलेलें निळें महावस्त्र मला लीलेनें खांद्यावर फेकायचें आहे, पोकळीचा रत्नमंडित मुकुट मला मस्तकावर ठेवायचा आहे. एकाच अचिंत्य भरारींत मला साऱ्या विश्वाला पलांडण घालायचें आहे. आणि आकाशाच्या मांडवावर फुललेल्या फुलाफुलाला स्पर्श करीत उडत रहायचें आहे, अवकाशाच्या परडींत विखुरलेलीं फुलें तीव्र दृष्टीच्या सर्वभेदक सुईवरून मला सर्वेक जाणीवेच्या दोऱ्यांत ओवायचीं आहेत. आणि ती मेखला मला कटिभोवतीं गुंफायची आहे. पोकळीचा पालथा कटोरा झटकून मला हातांत घ्यायचा आहे आणि त्यांत साऱ्या विश्वाचें दान मागायचें आहे. सप्तर्षींच्या सोंगट्यांचा मला खेळ खेळायचा आहे. आणि आकाशाच्या धांदोट्यांचा मला पट मांडायचा आहे. मी तारकांच्या कवड्या मुठींत वाजवून सैरावैरा फेकीन. मी दशदिशांना खो देत ध्रुवांचे खुंट धरीन, गिरक्या घेत गरगरणाऱ्या तारकांचें संपूर्ण नृत्य मी पाहीन. आणि गुरुशुक्रांचे डग्गे करून त्यांना साथ देईन. विश्वाला अंत नसेल तर मलाहि अंत नसेल. काळाला जन्म नसेल तर मलाहि जन्म नसेल. अवकाशाला मर्यादा नसतील तर मलाहि मर्यादा नसतील. ह्या साऱ्यांचाच मी होईन. ह्या साऱ्यांनाच मी मापेन. आवाक्यांत आणलेल्या अवकाशाच्या झोळींत मी साऱ्या विश्वाचें अंतिम सत्य झेलीन. आणि म्हणूनच प्रथम मी हा जड, गतिशून्य, संवेदनाशून्य, मातीचा देह मोडीन! पाप? ह्या दिव्य लालसेंत पाप आहे? ह्या अमर्याद कुतूहलांत पाप आहे? ह्या भव्य निदिध्यासांत, ह्या दिव्य

स्वप्नांत, ह्या प्रचंड प्रयत्नांत पाप आहे? विश्वभ्रमणाच्या एकमेव मार्गावर पाऊल टाकण्यासाठीं पृथ्वीची अटक मोडणें, मातीची अटक मोडणें, हें पाप आहे? ह्या देहाच्या मर्यादा ध्यानांत आल्यावर? ऐहिक ज्ञानाच्या मर्यादा ध्यानांत आल्यावर? साऱ्या ग्रंथांचें सार व साऱ्या पंडितांचें पांडित्य तोलून पाहिल्यावर व थिटें भरल्यावर? मृण्मय मस्तकाच्या टीचभर करवंटीनें विश्वसंसाराचा अथांग सागर अंशमात्रानेंहि उपसला जात नाहीं, हें प्रत्ययास आल्यावर? सारें तडफडतें कुतूहल सारी उमळती जिज्ञासा, सारी अमर्याद ज्ञानलालसा अखेर केवळ मातीच्या मर्यादांवर टक्कर खाऊन चूर होते, हें अनुभवास आल्यावर? अमर्याद काळाची असीम कल्पना सीमांकित बुद्धीस पेलत नाहीं, ह्याचें प्रत्यंतर पटल्यावर? नव्हे, नव्हे, तें पाप नव्हे. पंजरबद्ध पांखरांस स्वैर आकाशांत सोडणें, हें पाप नव्हे. बंदिस्त जिज्ञासेला, गुदमरलेल्या चेतनेला, कोंडलेल्या कुतूहलाला मुक्त करणें हें पाप नव्हे. असलीच तर तेवढीच ती एक शुभ संधि आहे. तेंच एक आशास्थान आहे. तीच काय ती अनंताच्या अवगाहनाची शक्यता आहे. पूर्ण ज्ञानाच्या तृप्त परिसरांत उघडणारें असलेंच तर तेंच एकमेव महाद्वार आहे. असलाच, तर अंतिम सत्याप्रत जाणारा तेवढाच तो मार्ग आहे. अमर्यादाची तहान मर्यादित पृथ्वीवरील दुबळा देह काय भागवील? चैतन्याची अनुभूति मातीनें मढविलेल्या जडतेस कशी होईल? त्यासाठीं चैतन्यच मोकळें सुटलें पाहिजे. त्यासाठीं देहाचें बंदिस्त दार फोडूनच फेंकलें पाहिजे. चैतन्य चैतन्यास मिळेल, तेव्हांच शंका फिटतील. अशरीरि शरीरास सोडील, तेव्हांच संदेह संपतील अनंत आकाशाचा पट मानण्यास अनंत आत्मा मुक्त झाला पाहिजे. अमर्याद काळाच्या मर्यादा मोजण्यास चितकळा भरारत गेली पाहिजे विश्वाच्या अनादि, अजरामर रहस्याचा भेद घेणें हें केवळ अनादि, अजरामर अशा मुक्तात्म्यासच साध्य! ह्या भव्य ईप्सीतासाठीं, ह्या प्रचंड प्रयोगासाठीं शरीर गाळणें हें कसें पाप? हा कसा मृत्यू? ही तर दिव्य, ज्ञानमय चिरजीवनाची एकच वाट, एकच आस! हेंच तर

खरें जीवन! तुम्ही भोगत आहांत तें नव्हे. वस्तुतः तोच मृत्यू आहे. तें सत्य नव्हे, तर तें एक कुरूप कुंठित स्वप्न आहे. संदेहानें, अज्ञानानें, मायामोहानें, दंभानें, गर्वानें क्षुद्र संघर्षानें, मृगजालात्मक समाधानानें, विकृत सौंदर्यानें लडबडलेलें भयानक स्वप्न! ती जागृती नव्हे, ती तर घोर मरणप्राय निद्रा आहे! दृष्टीवर पटल पसरणारी! चैतन्यास जडता देणारी! निरंकुशावर बंधनें घालणारी! तरलतेस अंधतेची झांपड आणणारी! आत्म्यास अपंग, असहाय, निश्चेष्ट करणारी! आभासावर आरूढ! मर्यादा-जन्य मूढतेवर आधारलेली! निद्रा तर तीच आहे! आणि ज्याला मृत्यू म्हणतां, तें मात्र संभवतः प्रबोधन आहे, जागृति आहे! साऱ्या विश्वाशीं तुम्हांस स्वैरतेनें जोडणारा एक पूल! तुम्हांस मुक्त करणारी एकमात्र संजी-वनी! केवळ त्या मार्गानेंच असली तर अनंतांत झेंपविण्याची, विश्वाच्या रहस्यांत खोलवर बुडी मारण्याची, काळावर मात करण्याची शक्यता आहे! एरवीं सारेच मार्ग अवरुद्ध आहेत, सारेच अंधकारमय आहेत! रहस्यशून्य ग्रंथराशी, वर्तुलाकर विद्वत्ता, शून्यवत् तत्त्वज्ञान व मृतप्राय आयुष्य! हें विटलेलें आयुष्य नष्ट करणें पाप कसें? कोणी मागितलें होतें हें आयुष्य? कोणी मागितला होता हा जीव जाळणारा असंतोष? कोणी मागि-तला होता हा भारभूत, अर्थशून्य जन्म? आमच्या इच्छेनें तर आम्ही येथें आलों नव्हतों. तर मग कोणाच्या लहरीसाटीं येथें आम्हीं ढकलले गेलों? अनंत काळाच्या पडद्यासमोर ह्या बाहुल्यांच्या रांगा उगाच कां नाचत सुटल्या आहेत? उडून बागडून, झिजून मोडून ह्या कोणाची करमणूक करीत आहेत? काय ह्यांच्या आविर्भावांचा उद्देश? काय अर्थ व काय परिणाम? ह्या अखंडपणें सरकत राहणाऱ्या बाहुल्यांना तरी त्यांच्या क्रियांच्या अर्थाची जाणीव आहे काय? तर मग ह्या आंधळ्या तमाशांत कां म्हणून नाचत रहावें त्यांनीं? डोळे झांकून नाचण्याची त्यांच्यावर कां एवढी बळजोरी? त्यांच्या अस्तित्वाचें, आविर्भावाचें व अभिनयाचें कार्य-कारण, त्यांचें त्यांनाहि माहीत असूं नये काय? कोणीतरी सूत्रें ओढावीं व

त्यांनीं नाचावें; कोणीतरी ढकलावें व त्यांनीं प्रवेश करावा. कोणीतरी सूत्र चाळवावें व त्यांनीं बागडत रहावें. कोणीतरी खूण करावी व त्यांनीं काळाच्या पटापुढून अदृष्य व्हावें. पुन्हां नव्या बाहुल्या, पुन्हां नवा खेळ! तितकाच आंधळा! तितकाच संदेहात्मक! तितकाच अज्ञेय! कुठून येतात ह्या बाहुल्या? आणि कुठें जातात? कोण त्यांना घडवितें, कोण मोडतें व कां? मातींतूनच त्या येतात का? आणि मातींतच जातात काय? मातीचाच जन्म, मातीचाच मृत्यु. तर मग हा क्रियेचा इच्छेचा ईर्ष्येचा आविर्भावाचा, सजीव, रंगीत मध्यंतर कशासाठीं? ही निरर्थक वर्तनाची बळजोरी काय म्हणून? कोणाच्या क्रीडेसाठीं? कोणाच्या मनोविनोदासाठीं?...नाहीं, नाहीं नाचत रहाणार मी असा! ह्या आंधळया गारुडात मी सहभागी होणार नाहीं. मला कळलें पाहिजे कीं, कशासाठी? मला कळलें पाहिजे कीं, कुठून? मला कळलें पाहिजे कीं, कोणीकडे? येणें माझ्या हातचें नव्हतें, पण जाणें माझ्या हातचें आहे. ज्या अभेद्य, अनंत पटासमोर असंख्य जीवांच्या ह्या संख्याहीन सृष्टी यःकश्चित् कृमींच्या समूहाप्रमाणें वळवळत आहेत, त्या पटामागें मी धांवत जाईन व पाहीन! कदाचित् मी कांहींच पाहणार नाहीं! सूत्रचालकहि नाहीं! सूत्रसंचलकहि नाहीं! नुसताच मातीचा ढिगारा! नुसताच शून्याकार! त्या शून्यवत् मृत्तिकेंतच मी लुप्त होईन. डोलून, फुलून, डंवरून, मातींत मिळणाऱ्या एकाद्या वृक्षासारखा! मातींत जातात ना ते? कीं, मरूनहि त्यांचें अविनाशी तत्त्व, अमर सौंदर्य, चिरंतन सौरभ अदृश्यपणें अज्ञात सृष्टींत फुलतच राहतात? हे नाचणारे मोर, ललकाऱ्या मारणाऱ्या कोकिळा, बागडणाऱ्या हरिणी...सारें मातींत? कीं देहाच्या पतनानंतरहि विश्वाच्या विरल सृष्टींत त्यांची चित्‌शक्ति नाचतच असते, गातच असते, बागडतच राहते? मातीच असेल तर मातीच होवो! उद्या व्हावयाची असेल तर आजच होवो! तोंवर तरी हें नाटक, हे श्रम, हें दुःख कशाला? त्यालाहि कांहीं उद्देश नसेल तर! ह्याचेंहि कांहीं पारितो-

षिक नसेल तर? ह्यालाहि कांहीं परिणती नसेल तर? माती तर माती! तर मग मातींतच जाईन मी!

...पण मला येथून नीट दिसत नाहीं. विश्वरचनेच्या उदंड मानचित्रावर दृष्टि पोंहचत नाहीं येथून. रांगोळींतील एका बिंदूला रांगोळीचा संपूर्ण आकार आकलन करतां येत नाहीं. त्यासाठीं मला प्रथम पुसटूनच गेलें पाहिजे. मला मृत्यूच्या मनोऱ्यावरून विश्वाच्या त्या अथांग डोहांत उड्डाणच केलें पाहिजे. मगच हे मातीच्या ढापणांनीं बांधलेले जड नेत्र फुटतील. आणि मला दिक्कालांचा भेद देणारी ज्ञानदृष्टि लाभेल. तेवढीच आतां एक आशा आहे. तेवढाच एक मुक्ततेचा मार्ग! तेवढीच एक ज्ञानस्वर्गास नेणारी पाऊलवाट! ऐहिकांतून अज्ञातांत घेतलेली माझी ही उडी कदाचित् शून्याकार मातीच्या ढिगाऱ्यावरच पडेल. तर मग तसेंहि होवो! पण कुणाच्या तरी खुणेवर चाललेलें हें हेतुशून्य नृत्य मी नाचत बसणार नाहीं. तुम्ही बसा नाचत. आणि त्यांतच झिंगून जा! पण वेड्यानों, कां नाचत आहांत तुम्ही? कां बागडत आहांत? कां रडत आहांत? आणि कां झगडत आहांत? मातीच्या स्त्रीरूप पुतळ्यांना कां मिठ्या मारतां उगाच? कुठवर टिकतील ह्या मिठ्या? क्षणभंगुर रंगरोगण! क्षणभंगुर सौंदर्य! क्षणभराचे आविर्भाव! आणि क्षणभराचा तमाशा! लुब्ध होण्यासारखें काय आहे ह्यांत? ह्या आभासाचा ध्यास कां लागावा माणसाला? आणि चिरंतन सत्याचा, अमर सौंदर्याचा अशरीरि चेतनेचा कां लागूं नये? जें गळणारच आहे, जें अनित्यच आहे, तें आतांच झाडून टाका ना! आणि चला नित्याच्या, चला सनातन सत्याच्या शोधास! नाहीं तर कडू वैफल्यानें फणफणलेल्या संतापांत मिळून जाऊंदे सारें गार, शांत मातींत! पण कुणाच्या तरी लहरीसाठीं, कुणाच्या तरी तमाशांत कां नाचत बसायचें आम्ही! मोहमय मातीच्या स्त्रीरूप पुतळ्या शोधायच्या! त्यांच्यावर प्रेमाचा आरोप करायचा! अरे, तें कपट आहे सारें! नुसती गुंगी! वीण वाढविण्याच्या कुटिल हेतूवर घातलेलें मायावी आवरण! ह्या निर्दय खेळासाठीं

नव्या बाहुल्या पाहिजेत ना, म्हणूनच तें स्त्री प्रेमाचें नशाबाज प्रलोभन निर्माण झालें आहे. पळा, पळा वेड्यांनो! फसूं नका आणि फसवूं नका! कां उगीच निरपराध जीव येथें ढकलतां? ह्या निर्दय तमाशांत, ह्या क्रूर मोहचक्रांत कां त्या नव्या निष्पाप बाहुल्या लोटीत बसतां? त्यांची संमति घेतली होती कां तुम्ही? येथें ती कां आणली जात आहेत हें सांगूं शकाल तुम्ही त्यांना? येथून तीं कुठें जातील हें सांगूं शकाल? तर मग कां ह्या पापाचे वांटेकरी होतां? जें तुमच्या विषयांत कोणीतरी दुष्ट अज्ञानानें केलें, तें त्यांच्याहि विषयांत तुम्ही कां करतां? त्यापेक्षां चला जाऊं आपण सारे त्या बाहुल्यांच्या व्यापाऱ्यासमोर आणि आक्रोशून विचारूं त्याला त्याच्या खेळाचा अर्थ!

——पिसाट वेडगळ बरळ! मीनाकुमारी तसेंच म्हणाली होती. निर्बुद्ध मातीची बाहुली! नुसती रंगीत आणि सजलेली! अहंमन्य आणि मूर्ख! स्वप्नशून्य आणि संकुचित! मायावी रूपाचें आमिष लावलेलें वीण वाढविण्याचं भयानक यंत्र! तिला सहचरी व्हावयाचें नव्हतें, तर माझ्या जागत्या जिज्ञासेचा बळी घ्यावयाचा होता. चूलबोळक्यांच्या संसाराचा ध्यास घेणारी ती व विश्व-संसाराचा ध्यास घेणारा मी! मेलेल्या आयुष्यांत गुंगून पडणारी ती व जिवंत मरणांत शांति शोधणारा मी! ह्या आंधळ्या तमाशात सहनर्तनासाठीं मलाहि ओढूं पाहणारी ती आणि अवकाशाच्या अमर्याद परिसरांत ग्रहगोलांभोवतीं जोडीनें गिरक्या घेण्यासाठीं तिला आवाहन करणारा मी! ती सहचरी बनून आली असती, तर सूर्याचा कुंकुमतिलक मी तिच्या कपाळीं लावला असता. उषेच्या मेंदीनें तिच्या चरणांस लाली आणली असती. अनेक चंद्रांच्या ज्योत्स्नेचें चंदन तिच्या देहास विलेपिलें असतें. निळ्या खलबत्त्यांत घोटलेलें गर्द रात्रीचें काजळ तिच्या नेत्रांत चढविलें असतें. दहा दिशांच्या रंगीत वस्त्रांनीं तिला सजवून सोडलें असतें. ग्रहगोलांचे पैंजण तिच्या पायांत व चांदण्यांच्या शुभ्र जुई-माळा तिच्या कंठांत घातल्या असत्या. शनीच्या तेजस्वी कंकणांनीं तिचें

करद्वय भूषविलें असतें. आणि मग प्रकृति–पुरुषाच्या विश्वसंसारांत आम्हीं जोडीनें रमत राहिलों असतों. परम सत्यावरच आम्ही आसन मांडलें असतें. चार दिशांच्या पलंगावरच आम्हीं पहुडलों असतों. आकाशाची जाळीदार मच्छरदाणी त्यावर झुलत टेवली असती. अवकाशाचे पटच आम्हीं पांघरलों असतों. पोकळीच्या प्याल्यांतील ज्ञानामृताचेच आम्ही घोट घेतले असते. आणि अनादि काळाच्या सुसाट वारूवर आरूढ होऊन आम्हीं क्रीडा केल्या असल्या! पण ती सहचरी बनून आली नाहीं! बाहुली म्हणूनच आली व बाहुली म्हणूनच गेली! माझ्या जगड्व्याळ ध्यासाचें रहस्य जी जाणूं शकली नाहीं, माझ्या भव्य स्वप्नांत जी तदाकार होऊं शकली नाहीं, तिचा मोह मला कां पडावा? मृत्यूचें महाद्वार हातांत हात घालून ओलांडावयास जी सिद्ध नाहीं, ती सहचरी कसली? ह्या कल्पनातीत कूटाची जिला ओढ नाहीं, तिला ओढ कशाची? ह्या खिजविणाऱ्या रहस्यांचा जिला ध्यास नाहीं, तिला ध्यास कशाचा? ह्या पालवणाऱ्या परम सत्यावर जिचे प्रेम नाहीं, तिला प्रेम कशाचें? मातीचा तिला ध्यास, क्षुद्रतेचा तिला ध्यास–जीवन्मृत निद्रेचा तिला ध्यास, पण प्रत्यक्षाचा नाहीं! तिचें वेड वेगळें, माझें वेगळें! तिचा ध्यास वेगळा, माझा वेगळा! मी म्हणतों तिचा ध्यास क्षुद्र व ती म्हणते माझा! ध्यासच घ्यावयाचा तर तो एका यःकश्चित् मृत्तिकाकणाचा काय म्हणून व अनंताचा कां नाहीं? तर मग कोणाचा ध्यास क्षुद्र, मीनाकुमारी? कोणाचें स्वप्न विफल? कशासाठीं कशाचं मूल्य दिलें पाहिजे? व कोणतें मूल्य दिलें म्हणजे काय मिळेल? नमस्ते मीनाकुमारी, तेंच सारें शोधावयास मी आतां जात आहें. जगांतील साऱ्या ग्रंथराशी म्हणजे मानवी अज्ञानाची निबिडता मांडणारें प्रदर्शन! सारें पांडित्य केवळ वर्तुळाकार व शब्दमात्र! सारे ऐहिक ज्ञानमार्ग, साऱ्या बौद्धिक साधना अपूर्णाच्या गर्तेत लोटणाऱ्या! लांबणारें आयुष्य म्हणजे असह्य शंकांनीं भारभूत होत जाणारें ओझें! तें ओझें आतां मी तोडून टाकणार! हें जाळें आतां मी तोडून टाकणार! देहाची काडवात पेटवून

मृत्यूच्या महाद्वारांत मी प्रवेश करणार, माती मातीस मिळूं द्या; व उर्वरित जें कांहीं असेल, व जर कांहीं असेल, तर तें पैलथडीस जाऊं द्या! कडी-निकडीचा, निर्वाणीचा, अगदीं अखेरचा हा आतां एकच मार्ग आहे, मीनाकुमारी! आतां ही एवढी एकच आशा आहे. मृत्यू! कर्ररर्र ऽऽ टिन्–टिन्–टिन्–!

दिवा लागला, घड्याळ थांबलें व तो समोरचा विद्यार्थी धडा घोकूं लागला. हाच त्याचा ध्यास. बालिश पुस्तकें, अज्ञानांतल्या परीक्षा, स्पर्धा, यश! मी तुला मारीन, तूं खालीं– मी वर, मी पहिला व तूं नंतर! आणि मग पुढें? हेंच सारें अधिक उग्र आकसानें, अधिकच निर्मम उत्साहानें! तूं खालीं व अवश्य तर तुझ्या प्रेतावरहि मी! पण मुला, अरे हें काय म्हणून सारें! ...आणि रामूकाका, भल्या पहाटें लांब लांब चोपड्या घेऊन कशाचा हिशेब करतां? मजल्यावर मजले, थैल्यावर थैल्या! दांत पडले, केस पिकून गेले, मान हलूं लागली, तरी अद्याप हाच ध्यास! चांदीच्या टिकल्या मोजीत आहांत काका? वेड्या माणसा, कधीं आयुष्याचे क्षण मोजून पाहिले आहेस काय? कधीं कृतकर्मांचा हिशेब मोजून पाहिला आहे? काळ झडपून नेईपर्यंतहि काळाची चाहूल घेणार नाहीं का तुम्ही? त्याचें अंतर कधीं तपासून पाहणार नाहीं? वेड आहे काय तें? आणि हें वेड नाहीं? क्षुद्र, तुच्छ, गलिच्छ वेड तुमचें!...आणि वसंतराव, भल्या पहाटे उठल्याबरोबर कशाला वहिनींना एवढ्या कड-कडून मिठ्या मारतां? माहीत नाहीं कीं, या मिठ्या तुटतीलच म्हणून? आणि धुंद वेड्या, कुणाला मिठ्या घालशील तूं मग? बुद्धिमान् म्हणवितां आणि कधीं हा विचारच केला नाहीं! केवळ तिचा ध्यास–एका स्त्रीचा! ह्याहून अधिक भव्य, अधिक आकर्षक छंद माहीत नाहीं तुम्हांला? अरेरे! वेडा–वेडा बिचारा!

—"कू–कू–कुच"—"कू–कू–कुच!" पांखरांनो! कुठून आलांत आणि कुठें चिवचिवत चाललांत? पडाल एक दिवस चोंच

वासून! तुमची पार माती होईल! तुमचें संगीत, तुमचें सौन्दर्य, कुठें असेल रे तेव्हां!--आणि वृक्षांनों! अंगाखांद्यावर तुम्ही खेळ-विलेल्या हिरण्यकंच पल्लवांचें आणि पुष्पगुच्छांचे पुढें काय होतें? तीं टपटपा गळून धुळींत मिळाल्यावर? त्या रंगसौन्दर्याचें काय होतें? त्या स्वर्गीय सौंदर्याचें काय होतें? माहीत नाहीं! माहीत नाहीं! माहीत नाहीं! पशूंना माहीत नाहीं, पक्ष्यांना माहीत नाहीं, वन-स्पतींना माहीत नाहीं आणि माणसालाहि माहीत नाहीं! माहीत करून घेण्याची इच्छा नाहीं! जाणून घेण्याचा ध्यास नाहीं! मूल्य देण्याची शक्ति नाहीं! जिज्ञासेंत तीव्रता नाहीं! प्रयत्नांत प्रामाणिकपणा नाहीं! बुद्धींत सामर्थ्य नाहीं! माहीत नाहीं! माहीत नाहीं! माहीत नाहीं! मी जाणेन! मी माहीत करून घेईन! हें आयुष्यव्यापी प्रश्नचिन्ह मी पुसून टाकीन! हा शरीराचा बोळा फिरवून!—र्रर्र ऽऽ टन्–टन्–टन्–टन्–टोऽ!...!

—वेडा–वेडा–वेडा!" अवत्याभवत्यांचा घोळका पुटपुटत होता.

"वेडे–वेडे–वेडे!" अनंत जगन्नाथ ब्रह्मेचा मिचकावतच थिज-लेला डोळा म्हणत होता!

—सत्यकथा ऑगष्ट ४८.

# पसतीस : : २

'व्हायना' हॉटेलच्या पहिल्या माळ्यावर समुद्राच्या अंगास जी गॅलरी आहे, तिथें व्हिस्की पीत आणि गप्पा मारीत आम्ही महिन्या–पंधरा दिवसांतून निदान एकादी दुपार तरी घालवतों, आणि यांत्रिक चाकोरींत धावून धावून शिणलेल्या आमच्या मनांना मनसोक्त विरगुळा देतों. एकत्र जमून अगदीं अघळपघळ गप्पा मारणं, सिनेमाला, गाण्याच्या बैठकीला जाणं, नुसतंच गाडींतून भटकत राहणं, आणि दुपारीं सुरू झालेल्या मद्ययागाची समाप्ति सायंकाळीं केव्हां वाटेल तेव्हां करणं, असा आमचा त्या दिवशींचा कार्यक्रम असतो. निश्चित आनंदांत आणि स्वैर वार्तालापांत व्यतीत होणाऱ्या त्या दिवसाची वाट आम्ही सारेच मित्र मोठ्या उत्सुकतेनं पहात असतों. तो दिवस हेंच जणुं आमच्या अन्य दिवशीं होणाऱ्या धांवपळीचं आणि श्रमाचं पारितोषक असतं, व त्या दिवशीं मिळणाऱ्या प्रेरणेमुळेंच जणुं इतर दिवशीं उरीं फुटेतों श्रम करणं आम्हांला शक्य होतं.

चौपाटीचा लहरी मारणारा समुद्र एका अंगाला घेऊन, ओल्या पावसाळी वाऱ्याचे हबके खात, आज आम्ही जेव्हां 'व्हायना' च्या दिशेनं निघालों तेव्हां 'अनृतं साहसं माया' या श्लोकाच्या आधारानं आमचं स्त्रियांविषयीं बोलणं चाललं होतं. आमच्यापैकीं एकाचं म्हणणं होतं कीं, या श्लोकानं (किंवा अनुष्टुपानं, किंवा त्या ओळी–जें कांहीं असतील त्यानं) स्त्रीवर्गाची निष्कारण अपकीर्ति गाइलेली आहे. दुसरा तितक्याच आग्रहानं प्रतिपादीत होता कीं, त्यांत स्त्रीवर्गाची अपकीर्ती वगैरे मुळींच नसून वस्तुस्थितीचं यथार्थ वर्णन आहे. "अनृत, साहस आणि माया हे काय स्त्रियांचेच विशेष आहेत? पुरुषांचे ठिकाणीं त्यांचा काय आढळच नसतो?" पहिल्यानें विचारलें. "पुरुषांचे ठिकाणीं त्यांचा आढळ नसतो असा माझा दावा नाहीं, तर स्त्रियांचे ठिकाणीं त्यांचा

आढळ असतो, येवढंच माझं म्हणणं आहे." निरुत्तर करणाऱ्या धूर्तपणें दुसरा म्हणाला, "स्त्रिया देवता आहेत, मातृत्वाचा मुकुट त्यांच्यामुळें त्यांच्या ठिकाणीं अनेक स्वर्गीय गुणांचा उदय झाला आहे, ह्या सर्व थापा आहेत. इतकंच माझं म्हणणं." त्याचं हें वळणदार विधान ऐकून पहिला गोंधळल्यासारखा झाला व हा विषय फारसा न रंगतां इथंच आरगळणार असं वाटूं लागलं, तोंच कुळकर्णी नांवाचा तिसरा वादपटु म्हणाला, "अगदीं पुरुषापासून आपल्या विशेषत्वानं वेगळे उठून दिसावे, अशाच प्रकारें व अशाच प्रतीनें अनृत, साहस आणि माया हे गुण स्त्रियांत आहेत यांत कसली सुद्धां शंका नाहीं. साऱ्याच स्त्रिया अनुदार नसतात, किंवा साऱ्याच स्त्रिया संकुचित नसतात. उलटपक्षीं कांहीं स्त्रियांचं औदार्य आणि प्रेम अगदीं दैदीप्यमान आणि दैवी वाटावं अशा कोटींतलं असतं, हें खरं. तरीही एकंदरींत पाहतां व साकल्यानं विचार करतां मनाचा कोतेपणा हा स्त्रीस्वभावाचा स्थायीभाव असल्याविषयींची मान्यता पुरुष तर देतातच, पण स्त्रियाही देतात. माया, अनृत, साहस यांच्या विषयांतहि हीच गत आहे. बेछूट साहसाला, एखादी स्त्री जेव्हां कोणा कारणामुळे प्रवृत्त होते, तेव्हां तिच्या त्या साहसासमोर पुरुषाचं साहस हा नुसता पोरखेळ वाटूं लागतो. स्त्रीचा मायावीपणा आणि पुरुषाचा मायावीपणा ह्यांत स्त्रीच्या मखमली, मादक, विषारी, वळसेदार मायावीपणाशीं तुलना केल्यावर पुरुषाचा मायावीपणा म्हणजे शुद्ध ओबडधोबड प्रतीचा उघडा वाघडा गांवढळपणा वाटूं लागतो. व्हिस्की नाशिकलाहि होते, सोलनलाहि होते, पण खरी धारदार व्हिस्की करावी स्कॉच लोकांनीं! कवितेचा विषय तीच व्हिस्की होऊं शकेल! कपट, तूं करूं शकशील देशपांडे, मी करूं शकेन, पण वैध–अवैध प्रेमासाठीं म्हणा, बऱ्याबाईट महत्त्वाकांक्षेसाठीं म्हणा, कपट आणि धाडस करावं तें बायकांनींच! आणि अभिजात कलात्मक मायावीपणांत त्यांनींच तें पचनीं पाडावं.

कवितेंत आणि सुभाषितांत नमूद होण्याच्या योग्यतेचं ह्या विषयांतलं कर्तृत्व त्यांचंचं."

"आपल्याला नाहीं हें पटत. स्त्रियांना आठपट काम असतो, अशा अर्थाचं जें एक सुभाषित आहे, त्याचीही तूं उद्यां तरफदारी करशील!" दोन्ही हातांचे तळवे उताणे करीत देशपांडे मान हलवून म्हणाला.

"तसं तर कांहीं मी म्हणत नाहीं." कुलकर्णी हांसून म्हणाला, "पण एखादी कामातुर स्त्री त्याच अवस्थेंतल्या पुरुषापेक्षां आठपट साहसी, आठपट मायावी आणि आठपट खोटी सहज होऊं शकते येवढं मात्र मी अवश्य म्हणतों. या विषयांत सोळा वर्षांच्या पहिल्या तारुण्यांतल्या मुलींचं साहस त्याच वयाच्या मुलाशीं तूं ताडून पहा. मनोमन पेटलेली वीस वर्षांची तरुणी केवढी आंधळीं धाडसं केवढ्या अचाट कौशल्यानं पार पाडते तें तपासून बघ. आणि पसतिशी पार पडलेली स्त्री जेव्हां पुन्हां एकदां एखाद्या षोडशीलाहि लाजवील अशा आवेगांत अखेरची भडकून उठते, तेव्हां तर तिच्या घोटीव धाडसाला, मुरलेल्या मायावीपणाला, आणि सराईत अनृताला सीमा उरत नाहीं!"

"पसतीसची, अर्ध्या वयांतली बाई? अरे बोलतोस काय कुलकर्णी! तुझ्या जिभेला कांहीं हाड?"

"जा आणि विचार एखाद्या विलायती वैद्याला." कुलकर्णी म्हणाला, "विझण्यापूर्वी ज्योत भडकते, आणि तें भडकणं अधिकच आंधळं असतं. नष्ट होण्यापूर्वी पसतिशींतील पुरंध्रीच्या वासना, षोडशीलाहि लाजवतील इतक्या अनावर होऊन जातात आणि मगच पुढं त्या चाळिशीच्या थंड काळोखांत विसर्जन पावतात. पसतिशींतील पटाईत पुरंध्रीच्या तुलनेंत एखाद्या षोडशीचं साहस, प्रेम, कपट, सारंच पोरखेळ ठरतील. पेटणाऱ्या ज्योतीपेक्षां विझणारी ज्योत नेहमींच अधिक उग्र आणि भडक असते."

"तुझं बोलणं मात्र आहे खरं उग्र आणि भडक." पहिल्या माळ्यावरील भोजनालयाकडे जाणाऱ्या हॉटेलच्या पायऱ्या चढत असतां

देशपांडे म्हणाला, व आणखींहि पुढं कांहीं तो बोलला असता, पण त्याच क्षणीं आम्हां सार्‍यांच्या ध्यानांत यावें, इतक्या जोरानें दचकून, भोजनालयांतील एका मेजाशीं कोणा तरुणासमवेत बसलेल्या एका प्रौढ स्त्रीकडे पहात, चारदोन क्षण, गर्गे दारांतच खिळल्यासारखा उभा राहिला. "कांरे स्तंभलेखक?" देशपांडे दबक्या आवाजांत म्हणाला, "पुढं सरक ना!"

पूर्णपणें रिकाम्या असलेल्या भोजनालयांतील त्या स्त्रीकडे पहात गर्गे आम्हां सर्वांना डोळ्यानें खुणावून पुटपुटला, "Just have a look at that dame there. जरा तिथें बसलेल्या त्या बाईकडे नीट पाहून ठेवा. लक्ष्यांत ठेवण्यासारखं पात्र आहे."

भोजनालयांतून समुद्राच्या अंगाला असलेल्या पडवीकडे जात असतां शक्य त्या कौशल्यानें त्या प्रौढ स्त्रीकडे आम्हीं सार्‍यांनीं नीट पाहून घेतलं. पहाण्यासारखं अद्यापहि तिच्यांत किनीतरी होतं, आणि कांहीं वर्षांपूर्वीं तर जिच्या भारदस्त सौंदर्याकडे आदरानं आणि कौतुकानं पहातच रहावं, अशा प्रतीचं रूप तिच्यापाशीं असलं पाहिजे. सरासरी चाळीसची वाटणारी लिंबासारख्या अंगकांतीची, टपोर्‍या काळ्याशार डोळ्यांची, अतिशय प्रमाणबद्ध व भरीव बांध्याची, लालचुटुक ओठांची आणि पुर्‍या उंचीची ती स्त्री, एखाद्या महाराणीची आठवण करून देईल अशा तोलाची दिसत होती. तिनें क्वचित् कोठें पांढरी लकेर दाखविणार्‍या आपल्या रेशमी केसांवरून पदर घेतला होता. तिच्या पायांत नाजुक मखमली चढाव होते, कपाळावर अर्धेलीच्या आकाराचं टसठशीत कुंकू होतं, आणि मोतिया रंगाचं नऊवारी चन्देरी पातळ ती नेसली होती. कोणाही पुरुषाबरोबर कोठेंहि एकटी दिसली, तरी जिच्याविषयीं कोणताही वावगा संशय घेण्याचा माणसाला धीर होऊं नये, अशा प्रतीचं तिचं गंभीर व विश्वासप्रेरक व्यक्तित्व होतं. आणि आमचा वृत्तविशारद गर्गे तिच्याकडे पाहून ठेवायला आम्हांला आवर्जून सांगत होता. अर्थात पाहण्यासारखंच नव्हे, तर ऐकण्या-

सारखंहि तिच्याविषयांत पुष्कळच असलं पाहिजे ह्याविषयीं आम्हांला शंका उरली नाहीं.

पडवींतल्या आमच्या ठरीव मेजाभोवतीं आम्हीं बसलों, तेव्हां विजेच्या धनुकलीवर पिंजला जाणारा बारीक पाऊस रेशमाच्या अगणित उभ्या तंतूंप्रमाणें शब्दशून्य अविरतपणें तरंगत येत होता. समोरच्या आकाशरेषेपर्यंत फेसाळणारा बहुरंगी समुद्र लहरा मारत होता. मद्याच्या मादक उष्णतेचं सार्थक करील असा गारठा वातावरणांत भरून राहिला होता. पडवी अगदीं निर्मनुष्य होती, आणि भोजनालयांत बसलेल्या त्या दोघांकडे न पाहिल्यासारखें करून पहात कांहीं वेळ आम्ही निःशब्द उतावळीनें पेयाचे प्याले रिकामे करीत होतों. दहा पांच मिनिटांतच परिचारकाला भक्कम चिरीमिरी देऊन तीं दोघं उठून गेलीं. व आतां भोजनालयही पूर्णपणें रिकामं झालं. एकाद्या राजकन्येच्या घरंदाज डौलांत पावलं टाकीत ती प्रौढ स्त्री जिन्याकडे गेल्याचं आम्हीं पाहिलं व अनावर झालेल्या उत्कंटेनं देशपांडेनं विचारलं,

"कोण, आहे कोण रे ही ? मुंबईची नाहीं दिसत !"

"मुंबईची नाहीं, नागपूरची आहे." गर्गे म्हणाला.

"आतां थोडी उताराला लागली आहे, पण दिसते एखाद्या महाराणीसारखी." कुळकर्णी.

"दक्षिण महाराष्ट्रांतल्या एका सरदाराची मुलगी आहे ती. आणि नागपूरच्या एका गब्बर जमीनदाराची बायको आहे." गर्गे.

"गब्बर आणि गाढव ?" गुप्ते.

"ह्या बाईसमोर कोणीही पुरुष गाढवच दिसेल म्हणा ! पण नाहीं सामान्य अर्थानं तिचा नवरा गाढव नाहीं. तो डॉक्टर आहे. म्हणजे ऑक्सफर्ड विश्वविद्यालयाचा वाङ्मयविषयाचा पीएच. डी. आहे ज्ञानाच्या समुद्रांत पोहून कोरड्या राहिलेल्या पुस्तकी किड्यांत पुष्कळद आढळतो, तसा एक प्रकारचा मठ्ठपणा मात्र त्याच्यांत भरपूर आहे.'

गर्गे म्हणाला, "तशांत पुढें पुढें तो दारूही चिकार प्यायला लागला होता. क्लबांत जाऊन पत्तेहि सपाटून खेळायचा. पैसे होते वाडवडिलांचे!—तसं या बाईचं कुणाला कधीं नव्ह दिसायचं नाहीं सहजासहजीं. घराणं फार मोठं होतं त्यांचं; पण घरांतूनच करडी देखरेख होती तिची त्याच्या इस्टेटीवर, म्हणूनच त्याच्या पत्त्यांना आणि दारूला न जुमानतां त्याची इस्टेट कायम राहिली. मोठी चतुर आणि कर्तृत्ववान बाई आहे."

"तिचं चातुर्य तर मघांच माझ्या लक्षांत आलं." कुळकर्णी म्हणाला, "जातांना मखमली चढावांत खडा गेल्याचं निमित्त करून ती वांकली, आणि तेवढ्यांत तिनं आपल्याकडे, आणि मुख्य म्हणजे ह्या गर्गेकडे पाहून घेतलं. नागपूरला असतांना बरीच दाट ओळख होती काय तुझी तिच्याशीं गर्गे?"

"छे:रे, तोंडओळख नुसती!" गर्गे म्हणाला.

"कोणत्या अर्थानें तोंडओळख?" मिस्कीलपणें डोळा मिचकावून गुप्तेनं विचारलं, "एकदाचं सांगून टाक कीं!"

व्हिस्कीचा एक लांबलचक घोट घेऊन, पेल्याच्या पृष्ठभागावर जुन्या स्मृतींच्या घोळक्याप्रमाणं येणाऱ्या बुडबुड्यांकडे पहात गर्गे म्हणाला—

"मी तेव्हां होतों नागपूरला एम्. ए. चा अभ्यास करीत. आणि जयंत गद्रे होता ज्यूनियर बी. ए. ला. जयंतला तर पाहिलंच आहांत तुम्हीं! नाताळांत तो इथें आला होता, तेव्हां त्याच्याबरोबर 'रेडिओक्लब' मध्यें एक संध्याकाळ आपण गाजविली आहे. आतां तुम्हांला तो मोठा फाकड्या आणि बनेल माणूस वाटला असेल. मध्यप्रांत पोलीस विभागांत ए. डी. एस. पी. च्या जागेवर राहून आतां तो इतका टणक बनला नसता, तर ती नवलाची गोष्ट झाली असती. त्याच्या मर्दानी देखणे-पणाचं, सुरूसारख्या उंचीचं आणि तांबुस गोऱ्या वर्णाचं तुम्ही केलेलं कौतुक आठवतच असेल तुम्हांला. पण मी जेव्हांची गोष्ट तुम्हांला सांगतों आहें, तेव्हां जयंत गद्रे हा एक कोवळा, सोधा. एकोणीस वीस वर्षांचा

अनुभवी पोऱ्या होता. त्याच्या मानानं आम्हींच तेव्हां फार मर्द आणि बनेल समजले जायचे. आणि लोकांना असं वाटायचं कीं, आयुष्यांत खरी तरवार आम्हींच मारणार आणि हा जयंत होणार कुठं तरी एकाद्या मुलींच्या शाळेंत मास्तर. पण गोष्टी किती उलट्या झाल्या आहेत तें तुम्हीं पहातांच आहांत. जयंत झाला आहे गणवेशांत पिस्तूल लटकावून 'अल्ल् झुर' करणारा पोलीस अधिकारी, आणि आम्हीं मात्र झालों आहोंत एक निरुपद्रवी लेखणीढकले. हें भविष्य जयंतला सुद्धां तेव्हां कोणी सांगितलं असतं तर त्याला सुद्धां तें त्यावेळीं खरं वाटलं नसतं. आज लेखणी हातांत धरणाऱ्या मला, बंदूक हातांत धरणारा जयंत, त्याकाळीं गुरु, वीरपुरुष, मार्गदर्शक, आश्रयदाता सारं कांहीं मानत असे, आणि मनांतलं कोणतंहि गुपित सांगायला, किंवा कोणत्याहि विषयांत सल्ला विचारायला माझ्याविना त्याला दुसरा कोणी योग्य वाटत नसे, हें खरं वाटेल तुम्हांला ? पण हें असं होतं खरं. जयंत आणि मी पहिलीं दोन वर्षं एकाच खोलींत रहात असतांना आणि त्यानंतर तो जहागीरदारांच्या वाड्यांत रहायला गेल्यावर सुद्धां आमचं नातं हें असंच होतं. जयंत तेव्हां खरोखर फार सीधा, सालस, आणि कोवळा पोरगा होता. कॉलेजचा मोसम सुरू झाल्यावर प्रथम माझ्या खोलींत तो रहायला येतांच 'नायमात्मा बलहीनेन लभ्य:' 'ब्रह्मचर्य हेंच जीवन' इत्यादि फलकांनीं आणि मारुतिरायाच्या चित्रांनीं त्यानं खोली सजवली, तेव्हां कुठें त्याला हायसं वाटलं. हायस्कूल-पासूनच तो हॉकी, क्रिकेट आणि कॅरमसारखा बायकी खेळसुद्धां फार उत्तम खेळायचा आणि महाविद्यालयांत तर ह्या खेळांतल्या प्राविण्याविषयीं अगदीं वर्ष दोन वर्षांतच त्यानं नांव मिळवलं. शनिवारचा सिनेमा साधण्याविषयीं तो आमच्यासारखा उत्सुक होत नसे. पण रोजचे सूर्य-नमस्कार मात्र त्यानं कधीं चुकवले नाहींत. मी आणि जयंत वऱ्हाडांतल्या एकाच गांवचे. त्याच्या आणि आमच्या वडिलांचे संबंधहि मैत्रीचे. म्हणून महाविद्यालयाच्या पहिल्या वर्षात प्रवेश करणाऱ्या लाजाळू जयंतला

माणसाळविण्यासाठीं त्याच्या वडिलांनीं त्याला माझ्या स्वाधीन केलं आणि साथीदार म्हणून, एकाच खोलींत आम्हीं राहूं लागलों. जयंतपेक्षां मी वयानं वडील होतों. महाविद्यालयांत त्याच्यापुढें होतों, आणि वेगळयाच अर्थानं त्याच्यापेक्षां चार 'गुण' माझ्या अंगीं अधिक होते, हें खरं. मी चांगला विद्यार्थी होतों एवढंच नव्हे, तर बऱ्यापैकीं वक्ता व लेखक म्हणून तेव्हांहि मला लोक ओळखीत असत. आणि वात्रटपणाविषयीं व टवाळपणाविषयीं मी विद्यार्थ्यांत मिळवलेली कीर्तीहि उपेक्षणीय नव्हती. ह्यांपैकीं कोणत्या गुणासाठीं जयंत मला मानत होता, आणि माझ्यापासून त्यानें काय शिकावें अशी त्याच्या वडिलांची अपेक्षा होती, परमेश्वर जाणे! कदाचित माझ्या सहवासांत जयंतचा भाबडा, लाजाळू पोरपणा झडून जावा आणि जगाशीं सामना द्यावयास अवश्य अशी 'चंट' वृत्ति त्याच्या अंगीं यावी, अशी त्यांची अपेक्षा असेल. माझ्या निकट सहवासांत जयंतचीं जीं दोन वर्षं गेलीं, त्या अवधींत ह्या दृष्टीनं त्यानं विशेष प्रगति केल्याचं मला तरी दिसलं नाहीं.

वास्तविक पाहतां तरुण मुलींकडे पहायला, आणि एकंदरींत स्त्रीजातीच्या पत्त्यावर असायला, कॉलेज वयाच्या पोराला काय कुणी शिकवायला पाहिजे? कॉलेजांत कांहीं तपस्वी तर असे असतात कीं, त्यांनीं गांवांतल्या बायकापोरींचा जवळ जवळ संदर्भग्रंथच सिद्ध केलेला असतो. कोण, कोठें आणि कशासाठीं प्रसिद्ध, हें त्यांना केव्हांहि विचारून घ्यावं. आणि तरीहि जहागिरदारांच्या वाड्यापासून आमची खोली हांकेच्या अंतरावर असतांनाहि जहागिरदारांच्या कुतूहलपूर्ण वाड्याविषयीं जयंताच्या ठिकाणीं फारसं कुतुहल जागं होतांना मीं पाहिलं नाहीं. अगदीं त्याचं कॉलेजांतलं पहिलं वर्ष संपत आलं होतं, तेव्हां सुद्धां नाहीं. लांबलांबच्या दिशेनं तरुण यात्रेकरू पायीं किंवा दुचाकीवरून जहागिरदारांच्या वाड्याला प्रदक्षिणा घालायला येत असतां, शेजारच्या जयंतनं तेवढं सहजलभ्य पुण्यहि सहसा कधीं जोडलं नव्हतं.

मघांच्या त्या बाई ? होय कुलकर्णी, त्याच सौ. सुशीलाबाई जहागिरदार, इथें मुंबईत या सार्वजनिक ठिकाणीं जेवायला आलेल्या तुम्हीं पाहिल्या. कारण एकतर ही मुंबई आहे, इथें त्यांना आणि त्यांच्या घराण्याला ओळखणारं कुणी भेटेल अशी त्यांना कल्पना नसेल किंवा सध्यां त्या गंमतीसाठींच प्रवासाला निघाल्या असतील. किंवा कदाचित् गेल्या सहा सात वर्षांत त्यांना प्रौढ वयामुळं अधिक सूट घेऊन वागण्यांत कांहीं विशेष वाटत नसेल, किंवा ह्या काळांत त्यांच्या वागण्याच्या पद्धतींतहि पुष्कळसे पालट झाले असतील. अर्ध्या तपानंतर मी देखील आज त्यांना प्रथम पहातों आहें आणि मघल्या काळांतला इतिहास मलाहि मुळींच माहीत नाहीं. पण ज्या काळची गोष्ट मी सांगतों आहें, त्या काळीं सुशीलाबाईंचं नखहि सहजासहजीं सामान्य माणसांच्या दृष्टीला पडणं कठीण होतं. सुशिलाबाई ह्या अशिक्षित किंवा मागासलेल्या होत्या अशांतला भाग नाहीं. पण जहागिरदारांच्या घराण्यांतल्या बायांनीं अगदीं दुर्मिळ आणि पडदापोशींत असणं हा त्या घराण्याच्या मोठेपणाचा परंपरागत भाग झाला होता. आणि ह्या परंपरेविषयीं गिरिधरपंत दादासाहेबांना अभिमान असला, तर सुशीलाबाईनीं त्या परंपरेला कुठें धक्का लावला नव्हता. सामान्य जनांपासून शक्य तेवढं अंतर ठेवणाऱ्या अलिप्त मोठेपणाविषयीं, त्यांनाहि कौतुक असावं.

नागपूर नगरांतल्या जुन्यांतल्या जुन्या आणि गर्दीच्या भागांत जहागिरदारांचा वाडा होता. आणि तिथें तर त्यांची ही अलिप्त सरदारी लोकांच्या अधिकच डोळयांत भरे आणि खुपे. गिरिधरपंत दादासाहेब विलायतेला जाऊन आल्यावर त्यांच्या वाड्यांत अंतर्गत सुसज्जतेच्या दृष्टीनं कांहीं अद्यावत् सुधारणा झाल्याविषयीं जनवार्ता असली, तरी त्यांच्या अलिप्त तुटकपणांत मात्र कुठेंच खंड पडला नव्हता. उलट अलिप्ततेच्या आधींच धारदार असलेल्या देशी पात्याला आतां तुसडेपणाचं विलायती पाणी चढलं होतं.

जहागिरदारांच्या वाड्याचा दिंडी दरवाजा सदैव बंद असायचा, येवढंच नाहीं, तर वाड्यामागच्या भिंतीवरून घराच्या आणि माड्यांच्या ज्या कांहीं खिडक्या दिसायच्या त्या सुद्धां सदा पडद्यानें मढवलेल्या. क्वचितच कधीं वाड्याच्या अगदी वरच्या टोंकाच्या गच्चीवर सुशीलाबाई दिसत, किंवा कांहीं क्षणच दिंडी-दरवाजा उघडून मोटारींतून अथवा बग्गींत पाय ठेवतांना त्यांचें किंवा त्यांच्या मुलीचें उत्सुक डोळ्यांना कधीं मधीं दर्शन होई. मुलगी ? होय, सुशीलाबाईंना पंधरा वर्षांची इंग्रजी पांचवींत शिकणारी एक मुलगी होती. तेरा वर्षांचा इंग्रजी तिसरींत शिकणारा एक मुलगा होता, आणखी त्यांच्या पाठचीं दहा वर्षांच्या आंतलीं दोन मुलं होतीं. सुशीलाबाईंच्या भारदस्त, एखाद्या राणीला शोभेल अशा सौंदर्याची गांवांत जितकी कीर्ति होती, तशीच कीर्ति त्यांच्याच वळणावर असलेल्या ह्या पंधरा वर्षांच्या वडील मुलीलाहि झपाट्यानं मिळाली होती. सुशीलाबाई पंधरा वर्षांच्या असतांना कशा असतील, त्याची कल्पना त्यांच्या मुलीकडे पाहून येत असे, आणि पूर्णत्वाचा विकास साधून राजबिंड्या सौंदर्यानें पसतिशी पार केल्यावर ती मुलगी कशी दिसेल, ह्याचं मूर्तिमंत चित्र सुशीलाबाई होत्या. सुशीलाबाई अधिक मोहक, कीं त्यांची आपलेपणांत येणारी मुलगी मोहक, ह्याचें उत्तर देणे फार कठीण होतें. पिवळ्या छटेनें पाडावर येणारी कैरी अधिक मोहक कीं रसानं रसरसलेला त्याच डौलाचा आंबा अधिक मोहक, हें कसं सांगणार ? हा अखेर ज्याच्या त्याच्या अभिरुचीचाच प्रश्न होता. इतकं मात्र खरं कीं, दिवसभर प्रदक्षिणा घालून सुशीलाबाईंचं किंवा सुलोचनेचं चुटपुटतं दर्शन झालं, तरी तो दिवस कारणीं लागला, असं समजणारे पुष्कळ वयस्क रसिकहि होते. अर्थात् तरुण विद्यार्थी तर होतेच होते अभिलाषा ? अगदीं तसंच कांही म्हणतां येणार नाहीं, देशपांडे. सुशीलाबाई जहागिरदारांविषयीं कोणाही अलबत्या गलबत्यानं अभिलाषा धरावी, इतक्या कांहीं, एकतर, त्या वाटेवर पडल्या नव्हत्या. दुसरं असं कीं, सुशीलाबाईंविषयीं (सुलोचना तर अद्याप पोरच होती म्हणा !)

कोणत्याहि प्रकारचा पुसट सुद्धां प्रवाद, वर्षीहि कोणाच्या ऐकिवांत नव्हता. सुशीलाबाईच्या व्यवस्थित वैवाहिक आयुष्याची साक्ष त्यांची चार पोरं देत होतीं. आणि गिरिधरपंत दादासाहेब बाहेर क्लबांत कितीही पत्ते कुटत असले, आणि बाटल्या उलथवत असले, तरी सुशीलाबाईविषयीं मात्र त्यांच्या मनांत आदर, वचक व प्रेम ह्याच भावना होत्या, असंच मानायला कारणं होतीं. तेव्हां तशा कांहीं दृष्टीनं किंवा आशेनं जहागिरदारांच्या वाड्यासमोरून कुणी फेऱ्या घालणं फारसं संभवत नव्हतं. परंतु आकाशांतला चंद्र आपल्या मुळींच हातीं लागण्यासारखा नाहीं, हें जाणूनहि त्याच्या दूरस्थ उज्ज्वलतेनं अधिकच आकर्षक बनलेल्या बिंबाकडे आपण पाहतोंच कीं नाहीं! तशांतला हाहि प्रकार समजा.

आणखी महिन्याभरांतून केव्हांतरी एकदांच दिसणारा जर तो पूर्णचंद्र असेल, तर त्याची दुर्मिळ शोभा पाहण्यासाठीं लोकांनीं तीस दिवस ताटकळावं हें साहजिकच नाहीं का?

जहागिरदारांच्या वाड्याचा तो सदा बंद दरवाजा, त्या पडदा घेतलेल्या खिडक्या, तिथला तो पहारेकरी आणि त्या वाड्यांत रहाणाऱ्या लोकांचा तो गर्भश्रीमंत आणि दर्शनदुर्लभ अलिप्तपणा, ह्यामुळें त्या वाड्याभोंवतीं एक प्रकारचें गूढ आणि काव्यमय वलय निर्माण झाल्यासारखं सामान्य लोकांना वाटत असल्यास आणि त्या गूढाकडे डोळे ताणून पहाण्याचा त्यांनीं प्रयत्न केल्यास त्यांत नवल कोणतं होतं?

परंतु ह्या गूढाचं सुद्धां जयंतला कधीं फारसं आकर्षण वाटलं नव्हतं. माझ्या संगतींत दोन वर्षं राहून तो कांहीं शिकलाच असेल, तर अश्लीलतेची झांक मारणाऱ्या कांहीं कोट्या करायला तो शिकला होता. पण तेंहि, आपणहि कांहीं कमी नाहीं, येवढं दाखवण्यापुरतंच. पुष्कळदां स्वतःच्या कोटीपुढं तो स्वतःच लाजून जाई, इतका तो, कॉलेजांत वर्ष दीडवर्ष आणि माझ्या सारख्या गुरूच्या संगतींत तितकाच काळ घालवल्यावरहि, कच्चा राहिला होता.

अर्थात् जहागिरदारांच्या वाड्याच्या दिशेनं गेल्या वर्ष सहा महिन्यांत झालेल्या अगदीं बारकाव्याच्या पालटाकडे त्याचं मुळींच लक्ष नव्हतं. पूर्वीपेक्षां जास्त, किंचित् जास्त अशा सुशीलाबाई आज काल वाड्याच्या गच्चीवर दिसत. दोन चारदां तर एका विशिष्ट खिडकीचा पडदा सारून मार्गाकडे टक लावून पहात असलेल्या मीं त्यांना पाहिल्या होत्या. सुशीलाईच्या पसतीसाव्या वाढदिवसानिमित्त एका फार प्रसिद्ध गायिकेचं गाणं गिरिधरपंत दादासाहेबांनीं वाड्यांत करवलं होतं आणि गाण्याच्या त्या कार्यक्रमाला प्रवेश मिळवण्याची धडपड आमच्यापैकीं अनेकांनीं केली होती. त्यामुळें सुशीलाबाईंचा पसतीसावा वाढदिवस पुष्कळांच्या चांगलाच ध्यानांत राहिला. वाढदिवसाच्या त्या कार्यक्रमानंतरच सरासरी शाळाकॉलेज सुरू व्हायच्या व संपायच्या सुमारास एका विशिष्ट खिडकीच्या पडद्याआडून आपल्या काळ्याशार डोळ्यांनीं टक लावून मार्गाकडे पहातांना माझ्या कावदृष्टीनं सुशीलाबाईंना हेरलं होतं. मला पक्कं आठवतं कीं, वाड्याच्या उंचांतल्या उंच गच्चीवर उभं राहून आसमंतांत पहात रहाण्याचं सुशीलाबाईचं प्रमाणहि ह्याच सुमाराला वाढत होतं. ह्या गोष्टींना विशेष कांहीं अर्थ आहे, असं तेव्हां मला वाटलं नाहीं. जगाच्या दृष्टिआड असलेल्या पुष्कळ पडदानशीन नायका ह्या प्रकारें जगाची ओळख अगदीं निर्हेतुक कुतूहलानं करून घेत असतात.

परंतु आम्हांला, येवढंच नव्हे, तर साऱ्या गांवाला खरा धक्का बसला पुढल्या वर्षी, शाळा—कॉलेज पुन्हां सुरू होण्याच्या सुमारास. जयंत आतां ज्यूनिअर बी. ए. ला होता, आणि माझं होतं एम्. ए. चं अंत्य वर्ष. मला माझी पहिल्या श्रेणीची परंपरा शेवटच्या परीक्षेंतहि राखणं अगदीं आवश्यक होतं, आणि त्यासाठीं मी वसतिगृहांत रहायला यावं, म्हणजे व्यक्तिशः सर्व प्रकारचं सहाय्य ते वेळोवेळीं स्वतः देऊं शकतील, असं मला आमचे इंग्लिशचे प्राध्यापक आणि वसतिगृहाचे पर्यवेक्षक डॉ. राघवन् ह्यांचं आग्रहाचं सांगणं होतं. अर्थात् माझी आणि जयंतची

साथीदारी ह्या वर्षी संपणं अपरिहार्य होतं. त्याचं हें उपांत्य म्हणजे खेळायचं वर्ष होतं. आणि अंत्य विद्यार्थ्यांची वसतिगृहांत गर्दी चालू असतां त्याला तिथं प्रवेश मिळण्याचा संभव अगदींच नव्हता. ज्या खोलींत मी आणि जयंत गेलीं दोन वर्षं एकत्र राहिलों, तिथं एकटाच रहायला जयंत आतां फारसा उत्सुक नव्हता, आणि घरधन्यानंहि पण, ती खोली यापुढं त्याला स्वतःलाच पाहिजे असल्याविषयींची सूचना देऊन ठेवली होती.

जयंतसाठीं खोलीच्या शोधाला आम्ही बाहेर पडलों आणि संवयी-प्रमाणं मुद्दाम वांकडी वाट करून मी जहागिरदारांच्या घराच्या अंगानं निघालो. दुरूनच सुशीलाबाई मला घराच्या गच्चीवर उभ्या असलेल्या दिसल्या, पण आश्चर्यानं मला अगदीं घेरी येईल, असं कांहीतरी मी त्यांच्या भल्या थोरल्या दिंडी दरवाजावर पाहिलं. " Rooms to let—for students only. Enquire within " तेथें पाटी लागली होती. " केवळ विद्यार्थ्यांसाठीं खोल्या भाड्यानें देणें आहेत. आंत चवकशी करा. " माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना. ज्या जहागिरदारांच्या नुसत्या अंगणाचेहि बाहेरून दर्शन होणं दुर्घट, त्या जहागिरदाराच्या प्रत्यक्ष वाड्यात भाड्यानं खोल्या देणं होत्या ? आणि त्याहि केवळ विद्यार्थ्यांना ? अगदीं मध्यम स्थितीतील घरधनीसुद्धां शक्य तो विद्यार्थी भाडेकरूची सावलीहि घ्यायला सिद्ध नसतात, आणि इथं पहावं तो प्रत्यक्ष गिरिधरपंत दादासाहेब जहागि-रदारांचा वाडा केवळ विद्यार्थ्यांना प्रकट निमंत्रण देणारी पाटी दाखवीत होता!

ज्याला जे सुचले ते तर्क त्यानं केले आणि बोलून दाखविले. पण पत्ते आणि बाटली ह्यापायीं ह्या बड्या घराचा वासा आतां इतका पोकळ झाला आहे कीं, राहत्या वाड्यांतहि भाडेकरू ठेवण्याविना कांहीं उपाय उरला नाहीं; विद्यार्थ्यांना जागा थोडी पुरते आणि बापाचा पैसा ते सहज फेकतात म्हणून त्यांच्यावर ही विशेष कृपादृष्टि, हा स्पष्टीकरणाचा पर्याय अधिकांत अधिक लोकप्रिय होता.

जहागिरदारांच्या वाड्याच्या दिशेनं आतां आश्रयार्थी विद्यार्थ्यांची गर्दी उसळली, हें सांगायला नकोच. तिथें सरासरी दहा खोल्या भाड्यानं द्यावयाच्या होत्या आणि त्यासाठी धडपडणारे विद्यार्थी होते शेकडों! व्यवहाराची सर्व माहिती मुनीमाकडून दिली जाई. परंतु अखेरचा होकार अगर नकार, इच्छुकाला प्रत्यक्ष भेट देऊन आणि त्याची एका अर्थानं चांचणी घेऊन, जातीनं सुशीलाबाई देत. एवढ्या मोठ्याच्या घरांत ज्याला प्रवेश मिळायचा, तो काय आहे, कसा आहे, तें प्रत्यक्ष घरधनिणीनं पाहणं एका परीनं बरोबरच होतं! परीक्षेच्या ह्या पद्धतीमुळं आधींच डळमळीत सिंहासनावर असलेले गिरिधरपंत दादासाहेब पूर्णपणे पदच्युत झाल्याविषयीं व सर्वाधिकार आतां सुशीलाबाई महाराजांचे हातीं गेले असल्याविषयींच्या वदंतेला चांगलंच बळ चढलं.

तें कांहींहि असो, विद्यार्थ्यांकडे नुसती एकच दृष्टि टाकून जरी सुशीलाबाईंनीं त्यांना निरोप आणि नकार दिला असला, तरी मी आणि जयंत (आणि विशेषतः जयंत) ह्यांचं स्वागत त्यांनीं फार वेगळ्या प्रकारं केलं. येवढंच नव्हे तर त्याच्या वाड्यातील अगदीं अखेरची आणि उत्तमांतली उत्तम खोली जयंतला देण्याविषयीं त्यांनीं चटकन् मान्यता दिली. जयंताची खोली माडीवर, इतर विद्यार्थ्यांच्या खोल्यांपासून अगदीं एकीकडे आणि प्रशस्त होती. त्या खोलीचं आंतलं दार उघडलं, तर लगतच्याच खोलींत सुशीलाबाईच्या मुलांची अभ्यासिका होती, आणि त्या खोलीच्या पलीकडेच होती सुशीलाबाईची कपडे पालटण्याची खोली. जयंताविषयीं सुशीलाबाईंच मत खरोखरच चांगलं झालं असलं पाहिजे. कारण केवळ दहा रुपये भाड्यांत समोर छोटीशी स्वतंत्र गच्ची असलेली, अगदीं त्यांच्या रहात्या भागाला खेटून असणारी ती खोली तर त्यांनीं त्याला दिलीच, पण त्या खोलींतला एक सुंदर पलंग, मेज, खुर्च्या आणि आरशाचं कपाट सुद्धां जयंत तिथें रहायला गेला तेव्हां त्याच्या उपयोगासाठीं जसंच्या तसंच ठेवलं गेल्याचं सुशीबाईंनीं त्याला कळवलं. ही वार्ता ऐकल्यावर आईबापा-

वेगळ्या मुलाविषयीं येवढी सहानुभूति दाखवणारा घरंदाज मोटेपणा ही कांहीं वेगळीच वस्तू आहे असं वाटल्याशिवाय मला राहिलं नाहीं. जहागिरदारांच्या संपत्तीला कदाचित् ओहोटी लागली असेल, पण गृहलक्ष्मीच्या जिव्हाळ्याला किंवा औदार्याला निश्चित ओहोटी लागलेली नव्हती.

जयंत आठवड्यांतून एकदां तरी माझ्याकडे वसतिगृहांत येतच असे. जहागिरदारांच्या सांपत्तिक स्थितीला कोठेंहि फारसा धक्का लागल्याचं लक्षण त्याला दिसलं नसल्याचं त्यानं मला सांगितलं. नोकरचाकर, घोडागाडी खाणंपिणं, पै–पाहुणे, भरीव ऐश्वर्यामुळें येणारी वर्तनांतली आत्मविश्वासाची ऐट, कुठं कशाला कमी नव्हतं. दादासाहेबांचे व सुशीलाबाईंचे संबंधहि अतिशय प्रेमाचे दिसत होते. आतां दादासाहेब बाईसाहेबांच्या थोडेसे मुठींत असण्याचा मात्र संभव होता. आणि पत्ते व बाटलीचा नाद ठेवणारा पण हाडाचा सरळ आणि गरीब माणूस आपल्या चतुर, सुंदर, आणि कर्तृत्ववान बायकोसमोर थोडा वरमून वागत असला, आणि व्यसनापायीं जाणाऱ्या पैशाची अंशत: भरपाई करण्यासाटीं त्यानें घरांत भाडेकरू टेवायला संमति दिली असली, तरी त्यांत विशेष नवल नव्हतं. आणि सुशीलाबाई? वा:! सुशीलाबाई खरोखरच लाखांत बायको होती. दिवसांतून केव्हां तरी मधलं दार उघडून त्यांनीं जयंतची चौकशी केली नाहीं, असा एकहि दिवस त्याला आठवत नव्हता. पुष्कळदां त्या त्याच्याकडे फराळाचंहि पाठवून देत. खाणावळींत जेवून राहणारीं परदेशी पोरं. सणावाराला तर कोणत्याच भाडेकरूला त्यांनीं कधीं बाहेर जाऊं दिला नाहीं. सारेच सुशीलाबाईंचं नांव घेत होते, सारेच त्यांच्या घरंदाज रीतिभातींवर प्रसन्न होते. जयंत? होय, जहागीरदारांच्या वाड्यांत जयंतचं फार चांगलं चाललं होतं. अर्थात् माझ्या संगतींत घालवलेल्या दिवसांची मौज तिथें कशी येणार?–जयंत सांगत होता,–पण एरवीं त्याला माणसं फारच चांगलीं मिळालीं होतीं. सुलोचनाही एखादी अभ्यासांतली अडचण विचारायला त्याच्याकडे यायची. आणि त्याच्या खोलीचं

मधलं दार तर आतां नेहमीं उघडंच असे. सुशीलाबाईंनीं जणूं जयंतला अगदीं आपल्या कुटुंबापैकींच एक मानला होता. साहजिकच जयंतला सुशीलाबाईविषयीं अतिशय आदर वाटत असे. त्यांच्या सुसंस्कृत, गंभीर, घरंदाज व्यक्तित्वानं दिवसेंदिवस तो अधिकाधिक भारला जात होता. एखाद्या प्रेमळ, सुंदर, कर्तृत्ववान वडील स्त्रीकडे ज्या भगिनीतुल्य गौरवानं पहावं त्या गौरवानं तो सुशीलाबाईकडे पहात असे. त्यांच्या धाकट्या मुलांना शिकवण्याचं काम केव्हांच त्याच्याकडे आलं होतं, आणि दोनच महिन्याच्या अवधींत त्यानं देऊं केलेलं भाडं स्वीकारलं गेलं नव्हतं. मुलांना शिकवीत असतां बहुधा सुशीलाबाई तेथें येऊन बसत. आणि शिकवीत नसतांहि दिवसांतून कित्येकदां येत. त्याच्या खोलीच्या सजावटीकडे, स्वच्छतेकडे, व त्याच्या प्रकृतीकडे, जातीनं सुशीलाबाई लक्ष घालीत व खाणावळींत जेवण्याचा प्रसंग तर आतां त्याच्यावर खाणावळींतल्या मेजवानी इतकाच क्वचित् येई.

जयंतच्या आणि माझ्या भेटींतील बहुतेक वेळ तो आतां सुशीलाबाईच्या गुणवर्णनांत घालवीत असे. त्याच्या वर्णनांत ढोबळपणं तसं आक्षेपार्ह वाटण्यासारखं फारसं कांहीं नव्हतं, पण त्या वर्णनांतले बारकावे मात्र निश्चितपणं मला सूचक व संशयास्पद वाटूं लागले होते. "पहा रे बुवा जयंत," मी एकदां त्याला म्हणालों होतों, "मला कांहीं हें लक्षण ठीक दिसत नाहीं."

"काय बोलतोस नानू," जयंत रागावून म्हणाला होता, "सुशीलाबाई छत्तीस सदतीस वर्षांच्या, माझी वडील बहीण, नव्हे अगदीं माझी आई शोभतील इतक्या वयाच्या आहेत. अगदीं थट्टेत तरी असा संशय तुझ्यानं कसा घेववतो?"

"सोळा सतराव्या वर्षीं बायका बेफामपणा करूं शकतात, तोच त्या पसतीस आणि चाळीसच्या दरम्यान पुन्हां एकदां कितीतरी धाडसानं करायला निघतात असं मी ऐकलं आहे, एका परीनं सोळाव्या वर्षीं नुक-

त्याचं फुलं लागणाऱ्या वासनेच्या ज्योतीपेक्षां, हा विझतांना भडकणारा जाळ फारच विलक्षण असतो."

"चुलींत गेला तुझा जाळ." असं म्हणून जयंत रागानं त्या दिवशीं माझ्याकडून जो गेला, तो चांगला पंधरा दिवसांनीं अगदीं वेगळ्याच मनःस्थितींत मजकडे परत आला.

"नानू" कपाळावरचा घाम टिपत कांपऱ्या स्वरांत तो मला म्हणाला, "कांहीं तरी फार चमत्कारिक होतं आहे."

"काय रे बाबा, काय झालं?" मी विचारलं.

"हो, व्हायचं तें होऊन गेलंच आहे म्हणा!" विषण्णपणें हंसून तो म्हणाला.

"अरे, पण काय? सुशीलाबाईसंबंधीं कांहीं?" मी चांचरत पण अचूक अंतर्दृष्टीनं विचारलं.

"सुशीलाबाई!" तो कडूपणं हंसून म्हणाला, "सुशीलाबाई तर खऱ्याच! घरंदाज! प्रौढ! ज्यांना मी वहिणीसमान मानत होतों! छेः!– छेः!– कल्पनाच करवत नाहीं." आणि मग अंगावर शहारे आणून कांपऱ्या मलूल स्वरांत गेल्या पंधरा दिवसांची कहाणी त्यानं मला सांगितली. सुशीलाबाई आतां नुसत्या जयंतच्या खोलींत येत आणि बसत नव्हत्या. तर एकेका टप्प्यानें त्या अधिकाधिक पुढें जात होत्या. फार चतुरपणें, फार हळूहळू. एकदां जयंतच्या अंगाला अत्तर लावण्याच्या निमित्तानं त्यांनीं त्याच्या अंगाला स्पर्श केला. एकदां त्याचा हात पहाण्याच्या मिषानं, एकदां त्याच्या अंगावरील रेशमी शर्टचं कौतुक करण्याचा देखावा करून. नकळत जयंतला त्या स्पर्शाविषयीं लोभ उत्पन्न झाला. स्त्रीकडून त्याला होणारा हा पहिलाच स्पर्श होता. आणि तो स्पर्शहि इतक्या सुंदर स्त्रीकडून होत होता. प्रथम हा एका भगिनीतुल्य पुरंध्रीचा निष्पाप स्पर्श आहे, अशी जयंतनं स्वतःची समजूत करून घेतली. तरीहि मनोमन तो अस्वस्थ होता. त्या स्पर्शाविषयींची त्याची आवड व ध्यास वाढत होता.

एका वेगळ्याच जळत्या उत्सुकतेनं सुशीलाबाईंची व त्यांच्या स्पर्शांची तो वाट पहात असे. बहिणीच्या स्पर्शाविषयीं माणसाला असा ध्यास कधींहि लागत नाहीं, हें अर्धा डझन बहिणींचा भाऊ असलेल्या जयंतच्या ध्यानांत यावयास फारसा वेळ लागला नाहीं. माझी शंका जयंतपाशीं मीं बोलून दाखविली, त्यापूर्वीच सुशीलाबाईंविषयीं मनोमन तो अस्वस्थ झाला होता. म्हणूनच माझ्या भाषणानें तो चिडला, पण त्यानंतर सुशीलाबाईंच्या वृत्तीविषयीं व वासनेविषयीं त्याचा उरलासुरला संदेहदेखील नाहींसा झाला. अतिशय धाडसानं व अतिशय चातुर्यानं जहागिरदार घराण्यांतल्या सुशीलाबाई जयंतला गुंतवीत होत्या. त्यांचा कुठें आणि कसा प्रतिकार करावा, हेंच त्याला कळेना. सुशीलाबाईंच्या प्रौढ व पुष्ट सौंदर्याच्या प्रत्येक दर्शनानं व त्यांच्या हातांच्या प्रत्येक स्पर्शानं त्याची मोहमूढ गुंगी अधिकच वाढत होती. त्याची प्रतिकारशक्ति अधिकच पंगु बनत होती. अखेर आज कळस झाला. जयंतला शेवटचे तास नव्हते, व त्याचं डोकं दुखत होतं, म्हणून दुपारीं एकटाच तो कॉलेजमधून खोलीवर परतला. वाड्यांत सारा शुकशुकाट होता. मुलं शाळेला गेलीं होतीं. गिरिधरराव बाहेरगांवीं गेले होते. लोटलेलं दार उघडून हळूच सुशीलाबाई आंत आल्या. तोंडावर हात घेऊन जयंत पलंगावर पडला होता. येतांक्षणींच खोलीचीं दोन्हीं दारें अगदीं स्तब्धपणें सुशीलाबाईंनीं आंतून लावून घेतलीं असलीं पाहिजेत. जयंतशेजारीं पलंगावर बसून सुशीलाबाईंनीं त्याला विचारलें, "निजलांत कां भलत्या वेळीं?"

"बरं नाहीं का वाटत आहे." त्याला जवळ जवळ रेलून बसलेल्या सुशीलाबाईंच्या मांसल शरीराचा जयंतला स्पर्श होतांच त्याचं डोकं भिरभिरूं लागलं, सारं शरीर तापून उठलं,—आणि इच्छाशक्ति नष्टप्राय झाली. जयंतच्या कपाळावर हात फिरवीत मखमली आणि मादक स्वरांत सुशीलाबाई म्हणाल्या, "थांबा, तुमच्या डोक्याला थोडा बाम चोळतें हं." आणि सुशीलाबाई जयंतच्या शरीरावर रेलूनच त्याच्या कपाळाला बाम

चोळूं लागल्या. त्यांचीं गुलाबाच्या पाकळीसारखीं कोमल बोटं, मधूनच जयंतच्या गालावरून फिरून जात. "नको–नको." जयंतचं निपाचित पडणारं मन म्हणत होतं, व त्याच्या शरीराला अनावर धुंदी चढत होती. सुशीलाबाईंचे काळेशार डोळेहि चकाकूं लागले होते व त्यांत एका अनावर तृष्णेची आग दिसत होती. त्यांचा प्रतिकार करण्याची शक्ती वा इच्छा आतां जयंतच्या अंगीं उरली नव्हती. "नको–नको–पुरे आतां!" उगी-चच त्याच्या तोंडून शब्द निघाले व त्याचीं कपाळावर गेलेलीं बोटं सुशीला-बाईंच्या बोटांत गुंतलीं. किती आवेशानं त्यांनीं तीं बोटं दाबलीं! किती आवेशानं! आणि मग बेफामपणं खालीं वांकून त्याला घट्ट बिलगत त्या भराभर जयंतचीं चुंबनं घेऊं लागल्या. "पाहील, कुणीं येईल." गुदमर-लेला श्वास घेत जयंत म्हणाला व त्याची आणि सुशीलाबाईंची दृष्टि एक-दमच दोन्ही दारांच्या बंद कड्यांवरून फिरली. सुशीलाबाईंनीं किंचित् स्मित केलें व मग त्यांच्या मांसल, सुगंधित, उन्मादक आलिंगनांत जंयत अगदीं पूर्णपणें...

ह्या प्रकारचा आयुष्यांतला हा जयंतचा पहिला अनुभव होता आणि एका भगिनीतुल्य घरंदाज पुरंध्रीकडून तो त्याला मिळाला होता. जयंतचें मन रागानं, पश्चात्तापानं भरून गेलें. त्या पहिल्या दिवशीं त्याच्या शब्दा–शब्दांत स्वतःविषयींची व सुशिलाबाईंविषयींची उबग भरून राहिली होती. परंतु अनुतापाची ही प्रतिक्रिया एखादा दिवसच टिकली असेल. जयंतला सुशिलाबाईंची कधीं वाटली नसेल अशी ओढ नंतर वाटूं लागली. त्यानें जें भोगलं होतं त्याची भिरभिरत नेणारी ओढ त्याला वाटूं लागली. आजवर अज्ञात असणाऱ्या ह्या सुखाच्या परिस्तनांत केवळ सुशिला-बाईमुळेंच त्याचा प्रवेश होत होता. त्याला प्रथम टोचणाऱ्या पापभावनेचा लेशहि नंतर त्याचे ठिकाणीं उरला नव्हता. सुशिलाबाईंचे व त्याचे नवे संबंध हेच अतिशय साहजिक आहेत, असंच जणूं त्याला वाटत होतं.

सुशिलाबाई—सुशिलाबाई ! अनभिज्ञ जयंत आतां पूर्णपणं सुशिलाबाईंचा झाला होता त्याच त्याचं सुखनिधान होत्या. अगदीं कल्पनेस अज्ञात असा आनंद केवळ त्याच त्याला देऊं शकत होत्या. आतां माझ्या व जयंतच्या साप्ताहिक भेटीसही खंड पडूं लागला. सुशिलाबाई हेंच त्यांचें दैवत बनलं होतं. जयंतचं तिसरं वर्ष व माझी एम्. ए. ची परीक्षा होऊन जाईपर्यंत हें असंच चालल होतं. उन्हाळयाच्या सुट्टींत आम्हीं दोघेहि वऱ्हाडांतल्या आमच्या गांवीं गेलों. जयंत मोठ्या कष्टानें घराकडे वळला व मी मोठ्या आनंदानं एम्. ए. नंतर लॉ कॉलेजांत जायच्या तयारींत होतों व जयंत पुन्हां सुशिलाबाईंना भेटायला उत्सुक झाला होता. त्यांच्याविषयीं माझ्यापाशीं सारखं बोलत राहणं व निरोप घेतांना स्वतः सुशिलाबाईंनीं त्याच्या बोटावर चढवलेली हिऱ्याची अंगठी ओठाला लावणं हाच जयंतचा उन्हाळयाच्या सुटींतला ब्रह्मानंद होता. आणि नंतर उन्हाळयाच्या सुट्या संपवून आम्ही परत नागपूरास गेलों तेव्हां—तेव्हां जयंतच्या मस्तकावर अशनिपात झाला. मी लॉ कॉलेजच्या वसतिगृहांत रहावयास गेलों व माझ्या समवेत एका खोलींत रहावयाची कल्पना अर्थातच जयंतच्या अगदीं स्वप्नांतहि आली नाहीं.

एखाद्या तहानेनें पिसाट बनलेल्या माणसाप्रमाणं उद्यांच्या आनंदाचीं स्वप्नं पहात जयंत तडक जहागीरदारांच्या वाड्याकडे वळला. " Rooms To let for students only. Enquire within " ही पाटी पुनश्च वाड्याच्या दारावर निमंत्रणपूर्वक लागली होती आणि आंत जातांच त्याला असं कळलं कीं त्याची ती माडीवरील खोली ह्यापुढें त्याची राहिली नाहीं. लॉ कॉलेजांतील चंद्रकांत पटवर्धन नांवाच्या अतिशय देखण्या व पटाईत खेळाडू विद्यार्थ्याला प्रत्यक्ष भेटीअंतीं स्वतः सुशीलाबाईंनीं ती आधीच देऊन टाकली होती. आणि त्यांतील पलंग, कपाट व मेज देखील! वाटल्यास न्हाणीघरापाशीं असलेल्या अंगणांतल्या एका रिकाम्या खोलीचा

जयंतनं तत्काळ ताबा घ्यावा. कारण त्या खोलीसाठींसुद्धां अनेक विद्यार्थी......

ह्यानंतर अधिक कांहीं जाणण्याची जयंतची इच्छा नव्हती. सुशीलाबाईना भेटण्याचीहि नव्हती. आतां त्याच्या डोक्यांत स्वच्छ प्रकाश पडला होता. जहागीरदारांच्या घरंदाज वाड्यांत केवळ तरुण विद्यार्थ्यांनाच खोल्या कां भाड्यानं देणं होत्या, तें आता त्याला कळलं होतं. अगदीं एकीकडे असणाऱ्या माडीवरच्या त्या सुंदर खोलीचा उपयोग त्याला चांगला समजला होता. सामान्य बायका रस्तोरस्तीं पुरुषांच्या मागें धांवत सुटतात. पण घरंदाज, कुलीन व चतुर बायका त्या सामान्यांच्या मूर्ख व उघड्या मार्गानं जात नाहींत. त्यांच्या थोरवीस व चातुर्यास शोभेल असं कांहींतरी त्या करतात. नव्या राणीशीं रात्रभर संसार केल्यावर सकाळीं तिचं डोकं मारणाऱ्या शारियर बादशहाप्रमाणें दर मोसमास त्या चातुर्यानें नवा प्रियकर शोधतात व जुन्याचं मुंडक मारतात. गत वर्षी जयंत गद्रे व ह्या वर्षी चंद्रकांत पटवर्धन, तर पुढच्या वर्षी त्या वर्षीचा कोणी नवा आकर्षक तारा !

आणि हें सारं घराचा उंबरठाहि न ओलांडतां ! साऱ्या मर्यादा, सारे उपचार संभाळून !...सुशीलाबाई...सुशीलाबाई... भकास चेहऱ्यानें व गरगरत्या मस्तकानं जयंत माझ्याकडे आला. अर्थातच कांहीं दिवस तडतडल्यावर हा घाव पूर्णपणें भरला व ज्युनिअरचं जहागिरदारांच्या वाड्यांतलं जयंतचं वर्ष हा केवळ एक विनोदाचा व आठवणीचा विषय होऊन बसला. "यंदांचा चँपियन कोण ? यंदाची अंगठी कोणाला ?" हें कित्येक दिवस आम्हां दोघांत खुणेचं व वंदनेचं वाक्य होऊन बसलं होतं, अद्यापहि आहे. परंतु मला असं वाटतं कीं, दोन वर्षांच्या सहवासांत मी जयंतला जें शिकवूं शकलों नाहीं, तें आठदहा महिन्यांत सुशिलाबाईनीं त्याला शिकवलं, व 'शहाणा' करून सोडलं. जहागिरदारांच्या वाड्यांत जाणारा जयंत कोवळा आणि कच्चा पोरगा होता. पण तेथून

परत आलेला जयंत मात्र घोटीव आणि पक्का पुरुष होता. जयंताच्या पोलिशी विभागांतील कर्तृत्वाचा व यशाचा खरा पाया जहागिरदारांच्या वाड्यांत भरला गेला, ह्यांत मुळींच संशय नाहीं. एरवीं खरोखरच तो मुलींच्या शाळेंतला एखादा निरुपद्रवी मास्तर झाला असता. सुशीलाबाईचे दोष कांहींही असोत, पण ह्या हळव्या पोराचा त्यांनीं पुरुष बनविला ! She made a man of him ! "

गर्गे थांबला. आमचे रिकामे पेले पुन्हां भरले व उचलले गेले. " पोरांचे पुरुष बनवण्याचं सत्कार्य सुशिलाबाईनीं अजूनहि सोडलेलं दिसत नाहीं. मघांहि त्यांच्याबरोबर एक तरुण मनुष्य होताच. तर मग हा पेला आपण सुशिलाबाईच्या नांवानेंच पिऊं या ! To Sushilabai ! " कुळकर्णी म्हणाला, व आम्हीं उंच उचललेले पेले ओंठाला लावले.

—सत्यकथा जुलै ४९.

---

मुलांच्या बैठकींत [ Common Room ] त्या एकाच विषयाची चर्चा चालू होती. मैना ठाकूर आपल्या मोटारहांक्याबरोबर पळून गेल्यानंतर गेल्या तीनचार वर्षांत येवढा सनसनीदार मामला त्या महाविद्यालयांत घडला नव्हता. प्रत्यक्ष एका मुलाच्या तोंडांत बरं! प्रत्यक्ष एका मुलाच्या तोंडांत एका पोरीनं भडकावून दिली होती.—कारण? दुसरं कोणतं असणार! गणपति पांडे नांवाच्या एका मुलानं शरयू कैकिणी नांवाच्या एका मुलीची खोडी काढली होती, [ म्हणजे त्यानं तिला नक्की काय केलं होतं कुणास ठाऊक! ] आणि तिनं त्याचं तोंड रंगवून दिलं होतं. रंगवून दिलं म्हणजे काय! नुसतं लाक्षणिक अर्थानं रंगवून दिलं! कारण गणपति पांडे चांगला पांच फूट आठ इंच उंचीचा काळा रोम दणकट जवान होता आणि शरयू होती आपली अशीच किरकोळ. पांच फूट एक इंचावर कांहीं तिची उंची नसेल. चवडयावर उभं राहिल्याविना गणपतीच्या तोंडांत देणं देखील शरयूला शक्य झालं नसेल. शरयूकडून थप्पड खाल्ल्यामुळं गणपतीचे गाल फारच तर नुसते कुरवाळले गेले असतील. ह्या निमित्तानं तरी आपल्या गालाला शरयूचा हात लागल्यामुळें त्याला गम्मत वाटायलासुद्धां कांहीं प्रत्यवाय नव्हता. पण गणपति नुसता देहाचाच अहिरावण होता, एरवीं त्याच्यांत मुळींच दम नव्हता, हें आतां स्पष्टच झालं होतं. नाहींतर अशी कोण एखाद्या मुलीची विद्यार्थ्यांच्या मुद्दाम बोलावलेल्या सभेंत प्रकट क्षमा मागेल! प्रिन्सिपॉलनें हकालपट्टी (‘रस्टिकेशन’) किंवा ‘प्रकट क्षमा’ असा पर्याय ठेवला असला म्हणून काय झालं! त्या महाविद्यालयाच्या न्हाणीघराकडे जाणाऱ्या अंधाऱ्या बोळांत गणपतीनं शरयूची जी कांहीं खोडी काढली असेल ती असेल, पण म्हणून काय हॉकी चमूच कप्तान असणाऱ्या पांच फूट आठ इंच उंचीच्या

तगड्या जवानानं शरयू कैकिणीसारख्या फटेल आणि पुरुषद्वेष्ट्या पोरटीची प्रकट क्षमा मागायची ? अरे सतरा भानगडी होत्या ह्या मिस् कैकिणीच्या ! तिच्या नुसत्या गोष्टीच ऐकून घ्या पुरुषद्वेषाच्या ! एरवीं दर तिमाहीला एका नव्या पुरुषाविना भागत नव्हतं त्या महामायेचं ! आणि मोठा आव आणते आहे सीता–सावित्रीचा ! गणपति पांडेला तिचा मर्यादाभंग करणं शक्यच नव्हतं मुळीं ! त्या अंधाऱ्या बोळांत करून करून गणपति पांडेनें तिचा असा कितीसा मर्यादाभंग केला असेल ! भंग पावण्यासारखी मर्यादा तरी होती का तिच्याजवळ ? गणपतीनें जो कांहीं विनोद तिच्याशीं तिथं केला असेल, तो तिच्या विषयांत तरी क्षम्यच होता मुळीं ! आणि तरी-सुद्धां ह्या लेकाच्या गणप्यानं अगदीं तोंड झुकवून तिची प्रकट क्षमा मागितली होती ! व्यर्थ लेकाचा पुरुषाच्या जातींत जन्माला आला होता ! व्यर्थ एरंडासारखा पांच फूट आठ इंच वाढला होता ! व्यर्थ हॉकी चमूचा कप्तान झाला होता ! आणि व्यर्थच महाविद्यालयांत तीन वर्षे त्यानं घालविलीं होतीं ! हां, खरोखरीच एखाद्या सुशील, सालस पोरीची खोडी गणपतीनं काढली असती तर गोष्ट वेगळी होती ! मग ती पोरगीच कशाला, आम्हीच साऱ्यांनीं प्रथम गणपतीची कणीक तिंबून काढली असती ! पण मिस कैकिणीसारख्या उटवळ, तोंडाळ पोरीसमोर लोटां-गण ? छे ! छे ! मोठी लज्जेची गोष्ट होती ! म्हातारी मेल्याचं दुःख नव्हतं, पण काळ सोकावतो ! आतां ह्यापुढें कोणत्याही ढालगज भवानीनं आपल्या स्त्रीत्वाचा फायदा घेऊन कोणत्याही पुरुषाच्या खुशाल तोंडांत मारावी ! पद्धतच पडून जाईल ही एक ! आमचे प्रिन्सिपॉल आणि प्रोफेसरसुद्धां धन्य आहेत ! पोरी म्हटल्या कीं अगदीं ह्यांच्या काळजाचा फालुदा होऊन जातो ! न्याय–अन्याय, बरं–वाईट कांहींसुद्धां मग ते पहायचे नाहींत ! जातच जातीशीं वैर करते हेंच खरं ! नाहींतर त्या गणपतीचे दोन्ही कान धरून त्याला प्रकट सभेंत शरयूसमोर गुढगे टेकायला लावायची कांहीं आवश्यकता होती ह्यांना ? त्यानं तिची कुचेष्टा केली, तिनं त्याचं मुस्कुट

रंगवलं ! बरोबरीत सुटलं काम ! व्हायचा तो न्याय तिथंच होऊन गेला. त्यांत आणखी चोंबडेपणा करायला ह्यांना कुणी सांगितलं होतं ? पण मग स्त्रीदाक्षिण्य कुठें दाखवितां येईल ह्यांना आपलं ? आणखी दाक्षिण्य दाखविणाऱ्यांचे उद्देश कोणते मोठे सुधे असतात ? त्या गणपतीनें जें आडमुटेपणानं केलं असेल तसंच कांहीतरी ह्यांना लबाडीनं पार पाडायचं असतं इतकंच ! वास्तविक पाहता पोरी समानतेच्या भावनेनं पुरुषांच्या विद्यालयांत येत असतां त्यांचे नसते देव्हारे माजवायचं कारणच काय मुळीं ? एखाद्या मुलाची गणपतीनं खोडी काढली असती तर प्रिन्सिपॉलनं त्याची एवढी शोभा केली असती का ? नसती केली ना ! मग पोरी आणि पोरं मुळींच समान पातळीवर येऊं शकणार नाहींत असं तरी सांगून टाका आम्हांला ! एकीकडे समान अधिकारांचा बकवा करून, आणि मुलांच्या विद्यालयांत धडपडत येऊन, मुलांनाच वर असा स्त्रीवर्गाचा सासुरवास कां ? तिकडे मारे मुलींसाठीं मुद्दाम उघडलेलं तें 'वुइमेन्स कॉलेज' हांका मारत आहे कीं पोरी आमच्याकडे शिकायला येत नाहींत म्हणून ! कशाला येतील ? पोरांच्या संगतीचा चटका कुठं आहे त्या मुलींच्या महाविद्यालयांत ? लग्नं कुठें जमवतां येतात तिथें ? स्वतःच्या रूपाचा आणि नखऱ्याचा तोरा कुठे मिरवतां येतो ? गणपति पांडे सारख्याच्या थोबाडींत कशी मारतां येईल निव्वळ मुलींच्या कॉलेजांत ? तिथे फारच तर नुसते एकमेकींना चिमटे काढींत, एकमेकींच्या झिपऱ्या ओढतां येतील ! पण त्यांत 'ती' गम्मत नाहीं. थोबाडींत मारायची म्हटलं तरी ती मुलाच्या थोबाडींत मारली पाहिजे ! त्यांत 'किक्' आहे ! म्हणून तर यायचं मुलांच्या महाविद्यालयांत ! तिथे गणपति पांडे असतात पुष्कळसे !...

...ह्याच सुरांत मुलांच्या बैटकीतलं संभाषण चाललं होतं. मिस् कैकिणीविषयीं कुणालाच सहानुभूति वाटत नव्हती. आणि तिचे कुणी चारदोन सखे तिथे असलेच, तरी त्यांना तोंड उघडायची मुळींच सोय नव्हती. शरयू कैकिणीविषयीं कुणाला आदर किंवा सहानुभूति वाटावी

अशी मुळीं ती मुलगीच नव्हती. सारं करूनसंवरून वर तिला झांशीच्या राणीचं श्रेयहि हवं होतं! एखाद्या मुलाच्या तोंडांत ठेऊन दिली म्हणजे तें श्रेय मिळेल असं तिला वाटत होतं; पण गणपति पाढेच्या नव्हे आपणा सर्वांच्याच तोंडांत शरयूनं भडकावून दिली, असंच त्या प्रकारानंतर मुलांना वाटलं. गणपतीवरहि पोरं फार अप्रसन्न होतीं. शरयूसारख्या पोरीची त्यानं चेष्टा केली असली, तरी त्यांत कोणतं मोठं भयंकर पातक घडलं असं मुलांना मुळींच वाटत नव्हतं. पण पोरींच्या खोड्या करायला निघालेल्या मुलामधेंहि एक प्रकारचा दम लागतो. तशीं खट्याळ आणि दमदार मुलं विद्यार्थ्यांना आवडतात—आणि बहुतेक विद्यार्थिनींनाहि आवडत असावींत. शरयूनं भार्गवराम वरेकरांच्या नफ्फट नायिकांच्या पावलावर पाऊल ठेवून (किंवा अचूक बोलायचं म्हणजे हाताला हात लावून) गणपतीच्या गालफडांत मारली, तेव्हांच गणपतीनंहि शरयूचं थोबाड रंगवून दिलं असतं तर मुलांना तें फार आवडलं असतं. तुम्हीं कांहीहि म्हणा, पण पोरींकडून मार खाणारीं पोरं मुलांना आवडत नाहींत. आणि मुलींची क्षमा मागणारी तर त्याहून आवडत नाहींत. पोरीकडून मार खाणं हा एक ढिलेपणा! आणि वर तिची क्षमा मागणं हा सात ढिलेपणा! म्हणून विद्यार्थी जितक्या रागानें शरयूविषयीं बोलत होते, तितक्याच अप्रसन्नतेनं गणपतीलाहि मंत्रपुष्पांजलि वहात होते.

"आतां तोंड करायची सोय ठेवली नाहीं ह्या लांब कानाच्या गणपतीनं!" हॉकी—पटु माने म्हणाला.

"लांब कानाच्या गणपतीनं, का लांब कानाच्या गाढवानं?" होतकरू कवि महाशद्बे (तथा 'मंजुनाद') म्हणाला.

"अरे, गाढव निदान दुगाण्या तरी झाडतं! ह्या मूर्खाला गाढव तरी कसं म्हणायचं?" त्रैमासिकाचा उदयोन्मुख लेखक सहस्रबुद्धे (तथा बालबुद्धि) म्हणाला.

" मंडळी! आतां आपले सगळयांचेच गाल धोक्यांत आले आहेत!" श्रीमंत तात्या देशमुख नाकांत तपकिरीची चिमूट कोंबीत म्हणाले.

" गाल धोक्यांत आणायला किंवा आणून घ्यायला आपली मनाई नाहीं. पण गालाची शोभा करायची ही पद्धत बरी नव्हे!" कवि मंजुनाद म्हणाला.

"आतां डोळाभर एखाद्या पोरीकडे पहायची कांहीं सोय उरली नाहीं! पाहिलं तर हेटाळणीनं फिदीफिदी हंसतात पोरट्या!" —बालबुद्धि.

" असं वाटूं लागलं आहे कीं बांगडया भरून आम्हीं साऱ्यांनीं त्या पोरींच्या कॉलेजांत जावं आणि हें कॉलेज रिकामं करून द्यावं ह्या मर्द महिलांना!"—माने.

" अरे कशाच्या मर्द महिला! हा गणप्याच भारी भेकड सांपडला त्या मिस् कैकयीला म्हणून!"

" गणपति पांडेनं मिस् कैकिणीची प्रकट क्षमा मागून वास्तविक पाहतां असामान्य नैतिक धैर्याचं प्रत्यंतर दिलं आहे." जाड भिंगांच्या आरशीचा स्कॉलर तत्त्ववादी उपरोधाने म्हणाला. त्याचा उपरोध हॉकी-प्रवीण मानेच्या डोक्यावरून निघून गेला व तो जळफळत उद्गारला,—

" खूप नैतिक धैर्य आहे! हें जर त्या गणप्याचं नैतिक धैर्य, तर अंधेऱ्या बोळांत दाखवलेल्या धैर्याचं नांव काय?—अनैतिक धैर्य?"

" मंडळी, तुम्हीं कांहीं म्हणा," पुन्हा दुसऱ्या नाकपुडींत टांसून परत श्रीमंत तात्या देशमुख म्हणाले, " पण पाप करायलासुद्धां पुण्य करण्याइतकंच धैर्य लागतं. अरे रंगेलपणाच करायचा तर मग तो माणसानं रंगदारपणानं करायला पाहिजे कीं अमुक अमुक एक गोष्ट माझ्या शौकासाठीं मीं केली, आणखी त्याचे जे कांहीं परिणाम असतील ते भोगायला हा मी इथें छातीठोकपणें उभा आहें! रंगेलपणासाठींहि मर्दुमकी अंगांत लागते मंडळी! आणखी मग अशा माणसाचंहि लोक कौतुक करतात!"

"म्हणूनच रंगेलपणानं जगणाऱ्या आणि रंगेलपणानं मरणाऱ्या संभाजीराजाचं चरित्र साऱ्या कवींना स्फूर्तिप्रद वाटतं!" कवि मंजुनाद छातीवर हात मारून म्हणाला.

"तीच गोष्ट पहिल्या बाजीरावाची! त्या पठ्ठयानं मस्तानीवर प्रेम केलं म्हणजे केलं! मग तुम्ही त्याला काय वाटेल तें म्हणा! त्याच्या मर्दुमकी-विषयीं काहीं कुणाला अवाक्षर बोलतां यायचं नाहीं!" उदयोन्मुख लेखक सहस्त्रबुद्धे (तथा बालबुद्धि) मूठ वळून म्हणाला.

"नाहींतर हा आमचा एका तोंडाळ पोरीला सोंड झुकवून सलाम करणारा गणप्या! अरे अंगांत दम नाहीं तर ह्या अशा फंदांत पडूं नये माणसानं! का अण्णा?" मुलाचं संभाषण शांतपणें ऐकत बसलेल्या अण्णा लट्ठेच्या पाटीवर थाप मारून माने म्हणाला.

हातांतल्या छोट्या कात्रीनं अण्णानं चिरूटाचं टोंक कापलं आणि तें ओंठावर फिरवीत अण्णा बोलूं लागला,—

"गुरुबचनसिंगचं नांव ऐकलं आहे तुम्हीं कुणी? ऐकलं नसाल. बरींच वर्षं झालीं त्या गोष्टीला. मीच तर तेव्हां पहिल्या वर्षांत होतों. इंटर-मधें आमच्या दोन 'बैठका' झाल्या त्यानंतर झाली आमची मुंबईतल्या कॉलेजची वारी, आणि मग इथे परत आल्यावर ह्या बी. ए.तल्या दोन-तीन बैठका! किती वर्षं झालीं बोला? चांगलं अर्ध—पाऊण तप तरी होऊ-नच गेलं. आपण तर मोजदादच करायचं सोडून दिलं आहे! असं सम-जतों कीं, इतकीं वर्षं कॉलेज लाईफ एंजॉय करायचं तरी कोणा लेकाच्या भाग्यांत असतं? बाकी, आम्ही काय कॉलेज लाईफ एंजॉय करावं म्हणा! कॉलेज लाईफ एंजॉय केलं गुरुबचनसिंगसारख्यानं! काय त्याचा कपडया-लत्यांचा झोंक! काय त्याचं तें गौरगुलाबी देखणें रूप आणि ती सरळ-सोट उंची! पोऱ्या काहीं पुरता बावीस वर्षांचा नव्हता! त्याच्या गाला-वरची दाढीसुद्धां अजून फुलांतल्या रेशमी तंतूसारखी कोंवळी आणि सोने-रीच होती; पण केवढी त्याची तडफ! जादूच्या कांडीप्रमाणें हॉकिस्टिक

हातांत चाळवीत गुरुबचन एखाद्या लपलपत्या वांसरासारखा मैदानावर सुसाट निघाला कीं त्याला पाहून असं वाटे, जें काय हा पोरगा मागेल तें त्याला देऊन टाकावं! एवढं असून त्याला गर्व काडीचा नव्हता. सारखा हंसत असायचा. हे पंजाबी आणि उत्तर हिंदुस्थानी करतात तसाच अगदीं ढोबळ आणि पुष्कळदा अश्लील विनोद तो सारखा करीत असे. आणखी मग आपणच खो–खो करून खिदळत सुटे! गुरुबचनला मीं कधीं दुर्मुखलेला किंवा आंबलेला पाहिला नाहीं. इतर कुणालाहि त्याच्या संगतींत लांब चेहेरा करून बसणं फार वेळ शक्य होत नसे. नुसती तोंडीं चेष्टा करूनहि तो कधीं थांबायचा नाहीं. प्रतिदिनीं त्याची एक नवी सक्रिय चेष्टा (प्रॅक्टिकल जोक) असे. रोज नवी खोडी! कुणी त्याला कांहीहि म्हणो, पण मोठा धाडसी होता गुरुबचनसिंग! अतिशय खट्याळ असूनहि विद्यार्थ्यांत इतका आवडता असलेला दुसरा मुलगा मीं पाहिला नाहीं! त्याच्या अतिप्रसंग करणाऱ्या खोड्यांतसुद्धां इतकी चमक असे कीं ज्याची खोडी गुरुबचनकडून केली जाई, त्यालासुद्धां त्याच्याविषयीं कौतुकच वाटे. उगाच मुळमुळीत खोड्या नसत त्याच्या! सगळं कांहीं बेधडक आणि रसरशीत काम! आपल्या खोड्यांच्या परिणामांना भिणं आणि मागं हटणं त्याला माहितच नव्हतं! वाः! मोटा छातीचा–मोठा छातीचा होता गुरुबचनसिंग. नाहींतर तसे आपले गणपति पांडे पुष्कळ झाले आहेत आजकाल! एखादा गुरुबचनसिंग सांपडणंच महाकर्म कठीण! नाहींतर ती डोरा नगरकर म्हणजेसुद्धां कांहीं कमी जहांबाज नव्हती! नुसती मिरची होती मिरची! आणि एका अर्थानं ती त्याला झोंबलीहि! रस्टिकेट व्हावं लागलं तिच्यापायीं त्याला! पण त्यानंहि तिचा नक्षा उतरवूनच ठेवला! पुन्हा कांहीं तिनं मान वर केली नाहीं कधीं! गुरुबचनचं नुसतं नांव तिच्या कांनीं पडलं कीं डोळे भुईला लागायचे तिचे आणि चेहरा कावराबावरा व्हायचा! 'गुरुप्रसाद' काय अन् 'गुरुकृपा' काय, नाहीं नाहीं ते आवाज द्यायची तिला पोरं गुरुबचन कॉलेजांतन काढला गेल्यावर! एकदां तर पोरांनीं तिला गुरुबच-

नच्या नांवानं हांक दिली तेव्हां तिच्या गालावरून ओळून टिपं ओघळलेलीं पाहिलीं आहेत मीं !...कां ! तें काय मी तुम्हांला सांगूं तात्या देशमुख ? कदाचित् अपमानाच्या आठवणीनं असेल, कदाचित् आणखी एखाद्या कोंवळ्या कारणामुळें असेल ! कां तें मी तुम्हांला कसं सांगूं ? गुरुबचन गेला, पण जातांजातां त्या वाघिणीला अगदीं गाय करून गेला. हें मीं प्रत्यक्ष पाहिलं आहे. उगाच सांगोवांगी गोष्टी नाहींत ह्या ! येवढं मी तुम्हांला सांगतों ! तो तिच्यापायीं कॉलेजांतून काढला गेला, पण तिनंहि अगदीं आपण होऊन दुसऱ्या कॉलेजचा मार्ग धरला !...पुन्हा कां ? आतां काय सांगूं तुला माने ? वाटलं तर त्या बालबुद्धीला विचार ! वाटलं तर त्या कवि मंजुनादला विचार ! नाहीं तर असं समज, कीं गुरुबचनविना तिला कॉलेज सुनं वाटूं लागलं ! कॉलेजचं वारं गुरुबचनच्या हकालपट्टीनंतर तिला फार गरम वाटावं असं झालं होतं खरंच ! तुम्हीं वाटलं तर गुरुबचनला दोष द्या, तेव्हांहि त्याला दोष देणारे चारदोन लफंडू होतेच. पण मी तुम्हांला सांगतों, बहुतेक सगळ्यांची सहानभूति गुरुबचनच्या अंगानं होती ! त्याच्या निधडेपणावर बहाल होतीं सगळीं पोरं ! हकालपट्टी होऊन कॉलेजबाहेर पडला तेव्हाहि तो हंसतच होता ! आणखी तर काय सांगूं तुम्हांला ? जातांजातांसुद्धां त्यानं डोरा नगरकरला—"

" अण्णा, आम्हांला सगळंच कांहीं सांग, पण सुरवातीपासून नीट सारं सांग ! " माने फर्रकन् वेत्रासन ओढून त्यावर देह टाकत म्हणाला.

" किस्सा रंगदार दिसतो आहे. पण सुरवात उलटीकडून होते आहे. " उदयोन्मुख लेखक बाळबुद्धि म्हणाला, " जरा तंत्राकडे लक्ष द्या अण्णा ! "

" आतां आमची उत्कंठा चाळवली गेली आहे, येवढंच नव्हे तर कळसास पोहोंचली आहे. " होतकरू कवि ' मंजुनाद ' म्हणाला, " गुरुबचनसिंगच्या गुरुचरित्राचा अध्याय मोठा श्रवणीय आणि पुण्यप्रद दिसतो. आणि डोरा नगरकर हें काय गंगा–जमनी प्रकरण आहे ? "

"प्रकरणच होतं बाबा तें!...अरे चांगल्याचांगल्यांच्या डोळ्यांत पाणी आणलं होतं ह्या फटाकडीनं त्या काळांत! ही किरिस्तांव पोरगी होती काळीसांवळीच—" विझलेल्या चिरूटाला पुन्हा काडी लावत अण्णा लेले म्हणाला, "पण ऐशी ठसठसीत होती म्हणतोस! ती होती त्या वेळीं तिसऱ्या वर्षात, आणि मी होतों तेव्हां पहिल्या वर्षात! आपणं खरं सांगतों, 'पिकेटिंग' करणं आपल्याला तेव्हांहि आवडत असे, पण माझी कांहीं कधीं समोरून तिच्या डोळ्याला डोळा द्यायची तेव्हां छाती झाली नाहीं. माझीच कशाला, फार थोड्यांची तिच्या दृष्टीला दृष्टी द्यायची हिंमत होत असे! फणा उभारून जणूं कुणावर तरी 'फू' करायला टपलेल्या नागिणी-सारखंच तिचं सारं अवसान असे. त्या काळांत कॉलेजांतून मुली ह्या अशा पैशापांसरी झालेल्या नव्हत्या. पांचपंचवीसच काय त्या साऱ्या मिळून तेव्हां आपल्या कॉलेजांत पोरी होत्या! आतां विचार करा, शेंपांचशें मुलांच्या कॉलेजांत अवध्या पांचपंचवीस पोरी! काय प्रमाण पडलं? ए तत्त्ववादी, सांग ना लेका, प्रमाण काय पडलं मुलांशीं मुलींचं?...साहजिकच पोरी तेव्हां भलताच भाव खाऊन असत. त्यांना वाटे, जणूं आपण कुणी स्वर्गांतल्या पऱ्या आहोंत, आणि आपण कॉलेजांत आलों, ही मुलांवर मोठी कृपा झालेली आहे. त्यांना वाटे, जणूं आपण उंबराचं फूल आहोंत आणखी आपल्याला अगदीं कुणाचा दृष्टीनेंसुद्धां स्पर्श होतां कामा नये! आजच्यासारख्या पोरी तेव्हां लग्नाला हपापून कॉलेजांत येत नसत! आजन्म अविवाहित राहून समाजसेवा करण्याची भाषा त्या काळीं मुलींमध्यें प्रच-लित होती. अर्थात् त्यांपैकीं खरोखर आजन्म अविवाहित किती राहिल्या, आणि अविवाहित राहून पुढें त्यांनीं कोणते दिवे लावले, हा कथाभाग वेगळा! पण एकूण त्यावेळीं वारा कसा वहात होता तें सांगितलं! भारी तुर्रेबाज आणि उर्मट वागणं असे तेंव्हां पोरींचं! काय वाटेल तें असलें तरी शेवटीं आपल्याला कोणत्या ना कोणत्या पुरुषाशींच गांठ घालावी लागणार आहे, ही उघड गोष्ट, कां कोण जाणे, तेव्हांच्या पोरींच्या गळीं

कांहीं निदान त्या वयांत तरी उतरत नसे! प्रत्येकीची भाषा पहावी तों आजन्म अविवाहित राहून समाजसेवा करण्याची! त्यांना हें कळेना, कीं साऱ्याच कुमारिका जर अविवाहित रहाण्याची प्रतिज्ञा भोगून बसल्या, तर मग ज्याची व्रतस्थपणें सेवा करायची तो समाजच मुळी शिल्लक रहातो आहे कशाला? एकाच पिढींत वाजतील कीं त्याचे बारा! पण एवढा विचार कांहीं शिक्षणाच्या नुसत्या वासानें उंडारून गेलेल्या त्या वेळच्या कॉलेजांतल्या मुलींना सुचत नसे! पुरुषांना एखाद्या मारक्या म्हशीप्रमाणें शक्य तिथे आणि शक्य तेव्हां हुंदाडण्याचीच तेव्हांची चालू फॅशन होती! मुलांच्या कॉलेजांत यायचं तर गोडीगुलाबीनं नांदण्यांत अन् जमलं तर चटकन् लग्न उरकून टाकण्यांतच आपलं खरं कल्याण आहे, हें जसं आजच्या मुलींना अनुभवानं पटलं आहे, तशी तेव्हां स्थिति नव्हती. चारदोन पोरी ज्या कॉलेजांत यायच्या त्याच मुळीं ओंचे-पदर कसून मुलांशीं मारामारी करण्याच्या विचारानें. मुलांची अगदीं सांवली घ्यायला त्या सिद्ध नसत. पोरांना त्या अगदीं तुच्छ, अस्पृश्य मानत अन् त्यांच्या ह्या चढेल मग्रूरीला स्त्रियांच्या सवंग कैवाऱ्यांची भरपूर चिथावणी असे. मुलां-मुलींत झगडा आला आणि त्या झगड्यांत दोष मुलीचा असला, तरी प्रिन्सिपॉल किंवा प्रोफेसर मुलींचीच कड घेणार, आणि मुलगाच दोषी मानला जाणार, हें तेव्हां अगदीं ठरून गेलं होतं. त्यामुळें मुलींचा वरचढपणा भलता वाढलेला असे. आणखी कांहीं मुली तर सीमेच्या उन्मत्तपणानें अन् तुच्छतेनं मुलाशीं वागत...त्या उन्मत्त मुलींतहि उठून दिसावी, इतकी ही डोरा नगरकर जहांबाज पोर होती. पोर ख्रिस्ती होती, आणि म्हणून आधींच तर आगाऊ धीटपणा तिच्यांत भरपूर होता. मिशनऱ्यांच्या सहवासामुळें इंग्रजीहि ती इतर मुलींच्या मानानं बरं बोले व तिचे साहेबी धर्तीवर होणारे शब्दोच्चारहि मोठे अक्कडबाज असत. रूपानं ती सुंदर नसली, तरी अतिशय तरतरीत होती. वापरत असे ती साडी-पोलंकच, पण तोच तिचा वेष अतिशय स्वच्छ असल्यामुळें तिच्या रूपाला परीटघडीची

कडक धार नेहमींच दिसे. ह्या साऱ्या झोंकावर मग्रूर आव्हानाचं आणि असह्य उद्धटपणाचं पाणी चढलेलं होतं. त्यामुळें तिच्या रूपांत मर्यादशील मुलीचा गोडवा मात्र औषधालाहि नव्हता. साऱ्या पुरुष विद्यार्थ्यांना जणूं ती 'काला आदमी' समजे! ज्या प्रकारच्या उर्मट दृष्टीनं ती मुलांकडे बघे, ती दृष्टीहि मुलांना मोठीं बोंचक आणि अपमानास्पद वाटे. सारीं मुलं म्हणजे मळक्या अपराधी वृत्तीचीं जनावरं आहेत, आणि तसंच त्यांना वागवलं पाहिजे, असाच जणुं तिचा भाव होता. 'मला थोडं—थोडं—तर कारण द्या, अन् मग पहा तमाशा! गोऱ्या लोकांत वावरलेली ही डोरा नगरकर म्हणजे तुम्हीं चेष्टा नका समजूं!' हाच तिच्या प्रत्येक आविर्भावाचा इत्यर्थ होता. शिकलेल्या पोरींचे भलतेच देव्हारे माजवावयाचे ते 'दिवस होते. आतां रेशनिंग ऑफिसांत, पोलिसखात्यांत, रस्तोरस्तीं आणि गल्लोगल्लीं, केविलवाण्या पोरींचे थवे जसे भटकतांना दिसतात, तसे ते तेव्हां दिसत नसत. त्यामुळें कॉलेजांत येणाऱ्या मोजक्या मुलींचं किती कौतुक करूं आणि किती नको, असें प्रोफेसर आणि प्रिन्सिपॉलना होऊन जात असे. डोराच्या वांट्याला तें भाग्य विशेष प्रमाणांत आलं होतं. ती बुद्धीनं बऱ्यापैकीं होती, आणि एका यशस्वी डॉक्टरची लेक होती; मग आणखी काय पाहिजे होतं? 'मिस् डोरा—मिस् नगरकर—' म्हणून कॉलेजचा सारा प्राध्यापकवर्ग तिला डोक्यावर घेऊन नाचत असे. ह्या साऱ्या पूजेअर्चेमुळें डोराचं डोकं फिरून गेलं नसतं तरच ती नवलाची गोष्ट झाली असती! पूजा घेण्याची योग्यता नसलेल्या माणसाच्या डोक्यावर सारखा फुलांचा वर्षाव चालू ठेवला तर त्याचा परिणाम बरा होत नाहीं; उलट फार उलटा होतो. त्यामुळं सात्त्विक वृत्ति वाढत नाहीं, नम्रता वाढत नाहीं; उलट तीं माणसं अधिकाधिक तामसी होतात. अधिकच असहिष्णु होतात. पूजा हा आपला रास्त अधिकार आहे असंच त्यांना वाटूं लागतं. आपली जागा लोकांच्या मस्तकावर आहे आणि लोकांची जागा आपल्या पायातळीं आहे, अशीच

त्यांची धारणा बनते. डोरा नगरकरची धारणा हुबेहुब तशीच बनली होती. इंटरची परीक्षा दुसऱ्या वर्गांत पास होऊन आणि केवळ मुलीं-साठीं ठेवलेलीं कांहीं पारितोषकं मिळवून ती तिसऱ्या वर्षांत आली, तेव्हां तिनें उद्दामपणाचा कळस गांठला होता. आपलं तेज, आपली बुद्धि, आपलं शौर्य, सारंच कांहीं अपार आहे असं तिला वाटूं लागलं होतं. मुलांविषयींची तिची तुच्छता आणि शत्रुत्व शिगेला पोंहोंचलं होतं. कांहीं नाहीं तरी निदान दहापांच मुलांना ह्या ना त्या तऱ्हेनं आतांपर्यंत डोरा नगरकर भोंवली होती. कुणाला तिच्यापायीं दंड झाला होता, कुणाला बोलणीं बसलीं होतीं, कुणांचीं नांवं 'ब्लॅक लिस्टांत' गेलीं होतीं आणि एकदोन जणांचीं तर तिच्यापायीं परीक्षापत्रं अडकवलीं जाऊन त्यांचीं वर्षं वायां गेलीं होतीं. कांहीं होवो,कांहीं न होवो, कांहीं झाल्याची तिला नुसती शंका येवो, उठसूट कोणातरी मुलाची कागाळी घेऊन थेट प्रिन्सिपॉलकडे जाऊन पोहोंचायची तिला संवयच लागली होती. अमका माझ्याकडे पाहून खाकरला, तमका मुद्दाम मला उद्देशून अश्लील बोलला, फलाणा रोज दुचाकीवरून माझा पाठलाग करतो, येवढीं कारणं तिला पुरत ! आणि येवढीं कारणं तेव्हांच्या स्त्रीदाक्षिण्य प्रिन्सिपॉलसाहेबांनाहि पुरेशीं वाटत ! डोराकडून कागाळी म्हणजे प्रिन्सिपॉलकडून शिक्षा, हें समीकरण साऱ्यांनाच समजून चुकलं होतं. डोराला तर सगळ्यांत जास्त समजलं होतं. त्यामुळं पोरांना खोड्यांत अडकवायला जणूं ती टपलेलीच असे. तो आतां तिचा एक प्रकारचा छंदच झाला होता, पण एवढ्यानं सारं संपलं नाहीं. तिची आणखीहि एक खोड होती. आणि तिची ती खोड साऱ्याच पोरांच्या अगदीं जिव्हारीं झोंबत असे. 'चप्पल मारीन मेल्याला !' हा तिच्या पांचवीला पुजलेला महामंत्र होता. ती समोर असतांना दोन मुलं आपसांत बोलत असलीं, तरी तीं आप-ल्याच विषयीं कांहींतरी फाजील बोलत आहेत असं खुशाल गृहीत धरून मोठ्यानं ती शेजारच्या मैत्रिणीला वारंवार म्हणे, 'चप्पल मारीन मेल्याला !

जणूं कांहीं मुलांची जात तिच्या चपला खाण्यासाठींच उत्पन्न झाली होती. जणूं पायांत घालणं हा चपलांचा उपयोग नसून त्या वारंवार हातांत घेणं हाच त्यांचा खरा उपयोग होता. मोठ्यानं पुटपुटून सदान्‌कदा चप्पल मारण्याची भाषा बोलण्यांत मर्यादेला किंवा संस्कृतीला सोडून कांहीं आहे असं कधीं तिला स्वप्नांतहि वाटत नसावं. उलट तिला ती आपल्या शौर्याची आणि मोठेपणाची निशाणी वाटे. इतर मुलींपेक्षां आपण जास्त शूर आहोंत, जास्त धीट आहोंत, मुलं आपल्याला जास्त वचकून वागतात, असा तिला गर्व होता. अन् कांहीं अंशांनीं तो खराहि होता. कारण चार दोनदां ती पायांतली चप्पल हातांत घेऊन खरोखरच कांहीं मुलांच्या अंगा-वर धांऊन गेली होती, आणि तीं मुलं वाऱ्यासारखीं तिच्या समोरून पळून गेलीं म्हणूनच तिच्या हातून वांचलीं. हो, नाहीं तर काय! चप्पल उगारून मुलगी अंगावर आली म्हणजे कठीणच काम! तिच्याशीं कांहीं कुस्ती खेळून तिला चीतपट करतां येत नाहीं! कारण त्यांत मर्यादाभंग होतो! बर पोरीच्या हातच्या चपला खाव्यात तरी ती लज्जेची गोष्ट! तेव्हां आपलं खिदळून गोड करत अशा प्रसंगीं मुलांनीं तिच्यापुढून धूम ठोकावी हेंच बरोबर होतं. मुलींना आपण त्यांच्या स्त्रीत्वामुळें ज्या कांहीं विशेष सवलती देऊन ठेवल्या आहेत त्या वास्तविक त्यांच्या अशक्तपणाच्या द्योतक आहेत. त्या आम्हींच त्यांना देऊन ठेवलेल्या सवलतींमुळेंच अनेकदां आमची अतिशय अडचण होते आणि आम्हांला त्यांच्यापुढें हार मानावी लागते. पण महामूर्ख पोरींना वाटत असतं काय कीं तो त्यांना मिळालेल्या सवलतींचा, म्हणजे पर्यायानं पुरुषांच्या दया-बुद्धीचा विजय नसून, तो त्यांच्या शक्तीचाच विजय आहे! ह्या डांरा नगरकरलाहि तसंच वाटत होतं. प्रिन्सिपॉल आणि प्रोफेसर्स, हे सारे पुरुष तिची तळी उचलून धरायला कंबरा कसून उभे नसते, आणि दाक्षिण्याच्या कल्पना आड आल्या नसत्या, तर विथरलेल्या पोरांनीं तिची चपला मार-ण्याची भाषा क्षणार्धांत बंद पाडली असती, अगदीं बोल–बोल म्हणतां

तिचा खुर्दा केला असता, हें तिच्या डोक्यांतच शिरत नव्हतं. त्यामुळं तिची घमेंड, आणि उर्मटपणा अगदीं भलता वाढला होता. डोगकडे पाहिलं कीं असं वाटे, स्त्रियांना तर कांहीं विशेष सवलती किंवा सरक्षण देण्याची आवश्यकता नाहींच, उलट पुरुषांनाच त्यांच्यापासून संरक्षण मिळालं पाहिजे. किंवा किमानपक्ष मनगटाच्या बळावर स्वतःचे अधिकार बजावण्याचं स्वातंत्र्य पुरुषांना असलंच पाहिजे. दाक्षिण्य–कल्पनेच्या रेशमी दोरीनं त्यांचे हात बधून त्यांची कुचंबणा करण्यांत मुळींच न्याय नाहीं! तर काय हो? दाक्षिण्य म्हणे दाक्षिण्य! इकडे एक उन्मत्त पोरटी प्रतिदिनी मुलांना चपलानीं बडवण्याच्या धमक्या देते आहे आणि म्हणे दाक्षिण्यानं वागवा! कां रे बाबानों? आतां समताच घ्या ना! बायका पुरुषांच्या बरोबरीनं सर्व क्षेत्रात उतरून त्यांच्याशीं स्पर्धा करूं लागल्या, चड्डया घालूं लागल्या, चोळणे घालू लागल्या, बिड्या पिऊ लागल्या, दारूसुद्धा झाकूं लागल्या तेव्हांच दाक्षिण्य संपलं कीं! तुम्हाला हें सगळं करायला पाहिजे, पुरुषाबरोबर स्पर्धा करायला पाहिजे, त्यांच्याशीं शत्रुत्व करायला पाहिजे, आणि वर त्यांच्याकडून दाक्षिण्याच्या सवलतीची वरदक्षिणाहि उपटायला पाहिजे का? अरे वारे वा! मी ह्या पुरुषी बायकांची आणि बायकी पुरुषांची एक गंमत पाहून ठेवली आहे. प्रथम तीं समान अधिकारासाठीं अगदीं आकस्ताळा ओरडा करतील. आणि मग आमच्यासारख्यानं म्हटलं, कीं घ्या, हे घ्या तुमचे मोजून शेंकडा पन्नास, आणि जा खड्डयांत. आतां सवलतीचा एकावन्नावा मात्र मिळणार नाहीं. तर लागलीच हे लोक तोंड वेंगाडून स्त्रियांच्या मातृत्वाची ढाल पुढें करतील आणि म्हणतील कीं मातृत्वाला मान आणि सवलत मिळालीच पाहिजे! लेको! मातृत्वाला मान आणि सवलती पाहिजेत काय? आणि मग पितृत्वाला कां नको मान? फिफ्टी–फिफ्टीच्या न्यायानंच करा ना विचार! मातृत्वाशिवाय पितृत्व शक्य नसेल, पण पितृत्वाशिवाय मातृत्व तरी कुठं शक्य आहे? आम्हीं मातांना मान द्यायचा, तर मातांनीं नको का पित्याला मान

द्यायला! मानलं तर मातृत्व स्वर्गीय आहे, नाहींतर तसं दिव्य काय आहे रे त्यांत! नुसती ती एक प्राणिशास्त्रात्मक घटना आहे झालं! आणि बायका मातृत्व पत्करतात तें काय आमच्यावर उपकार करण्यासाठीं? तुम्हांला नसेल पत्करायचं मातृत्व तर नका ना पत्करूं, इथे कुणा लेकाचा आग्रह आहे? पण तें तर होणं नाहीं! पुरुषांशीं एक भांडतां येईल, पण निसर्गाशीं कसं भांडणार बाबा? म्हणजे गंमत पहा अं! प्रथम साऱ्या गोष्टी लढाईच्या आणि वांटे–हिश्शाच्या! पण मातृत्वाचा न टाळतां येण्याजोगा विषय निघाला कीं मग एकदम दिव्य, भव्य, उदात्त काव्य सुरू! मग एकदम ह्या कर्कशपणें भांडणाऱ्या हक्कवादिनी भावनात्मक होतील,काव्यात्मक बनतील, हुंदके देऊन आम्ही मानवजातीच्या माता आहोंत असं म्हणतील, आम्हांला मान द्या म्हणून तोंड वेंगाडतील, आमच्या मातृत्वाला सवलती द्या म्हणून हात पसरतील! मग मात्र शेंकडा पन्नास हा कडक न्याय आणि संघर्षाची कडवी नीति ह्यांना नकोशी होते! कारण ती परवडण्यासारखी नसते ना? ती परवडण्या-सारखी असती तर गुहेंत सुखाचा संसार थाटून पुरुषांना शिकारीसाठीं बाहेर पिटाळण्याचें दूरदर्शी चातुर्य ह्या हक्कवादिनी विदुषींच्या वनचर बहिणींनीं कशाला दाखविलं असतं? जाऊं द्या झालं! खरं बोलावं तर तो प्रतिगामीपणा होतो, गप बसावं तर गळा कापला जातो! अखेर ह्यांचे गळे आमच्याशीं आणि आमचे ह्यांच्याशीं गुंतले आहेत. म्हणून तर विचार करायची अन् बोलायची वेळ येते ना! पण आज पहावं तों सारा उलटा हिशेब! आम्हांला म्हणे समान अधिकारहि द्या आणि मातृत्वासाठीं सवलतीहि द्या! तुमच्या तोंडांत भडकावायला आमच्या हातांत चपलाहि आणून द्या आणि वर आमच्या डोसक्यावर मातृत्वाचा दिव्य मुकुट चढ-वून आमची आरतीहि करा! अरे वा रे वा! मग ह्यांत समान अधि-कार कुठं राहिले? त्यापेक्षां चक्कच म्हणा ना कीं आम्ही बायका आहोंत, तुमच्या बायका आहोंत, आम्हांला अमुक एक काम द्या म्हणून! जरा

प्रेमानं, माणुसकीनं बोला, मग पन्नास टक्केच कां, अगदीं सगळे शंभर टक्के आम्ही तुम्हांला देऊन टाकूं! आम्हींच मुळीं मग तुमचे आहोंत! अगदीं डोक्याचं सोडून देऊं, कंबरेचं सोडून देऊं! पुरुषांची जात गाढव, त्यांना थोडं चुचकारून घेतलं कीं वाटेल तें ओझं मोठ्या आनंदानं वाहते! आतां हें स्त्रीदाक्षिण्याचं आणि मातृत्वाच्या स्वर्गीयपणाचं ओझं वहाणारे प्राणी थोडे का आहेत? आणखी तेंच तर तुम्हांला पाहिजे आहे! खरे रगदार पुरुष नको आहेत; तुम्हांला पाहिजे आहेत हीं नेभळीं गाढवं! त्या गाढवांना समजणार तुम्ही पुरुष आणि रगेल पौरुषानं रसरसलेल्या मर्दांना म्हणणार जंगली आणि प्रतिगामी!...साऱ्याच बायकांचं कांहीं असं नसतं. बहुतेक बायकांना मारखाऊ गाढव आणि महामर्द पुरुष ह्यांतला भेद उत्तम प्रकारें कळतो; पण मी तुम्हाला डोरा नगरकर सारख्यांची गोष्ट सांगतों आहे. तिचा आपला असाच कॉलेजच्या व्यासपीठा-वरून मातृत्वाच्या थोरवीविषयीं बकवा चालवायचा, आणि तिच्या हातांत असायची नेहमीं उगारलेली चप्पल! पुरुषांशीं नुसता चपलेनं संबंध आणून मातृत्व तरी कसं काय उत्पन्न होणार होतं हें तिचं तिला ठाऊक! पण डोरा तिसऱ्या वर्षांत आली तेव्हां चप्पल मारण्याविना ती दुसरी गोष्ट बोलत नसे! समोर तिला एखादा पोरगा दिसला रे दिसला कीं ती अंगांत आल्यासारखं करून एकदां आपल्या पायांतल्या चपलांकडे पहायची आणि एकदां त्या मुलाकडे पहा-यची आणि लागायची धमक्या पुटपुटायला! ...खोड्या? हो–हो, कांहीं मुलं काढायची कीं तिच्या खोड्या! चप्पल मारण्याच्या तिच्या भाषेमुळं पोरांनीं तिचं नांव 'चांभारीण' असं ठेवलं होतं. कुणी तिला 'मिस् चप्पल' म्हणूनसुद्धां हांका देत. पण तिच्या खोडया काढणारीं मुलं एकं-दरीत थोडीं. तिच्यापायीं ज्यांची निष्कारण हानि आणि अपमान झाला अशींच मुलं फार होतीं. त्यामुळं एका परीनं पोरं तिला वचकतहि असत आणि दुसऱ्या परीनं तिचा अतिशय रागहि करीत असत. आतां तुम्हींच

पहा, ती आसपास असतांना गाण्याची एखादी तान घेणं किंवा आपसांत-सुद्धां मोकळेपणानं थट्टामस्करी करणंसुद्धां पोरांना कठीण झालं होतं. ती म्हणजे कुणी स्वर्गातली परी आहे आणखी तिचा मर्यादाभंग करायला सारे पुरुष जणू टपून बसले आहेत असाच एकूण तिचा आव होता. त्यामुळें तिची कुणी कधीं खोडी काढलीच, तर साऱ्या पोरांना अगदीं ब्रह्मानंद होत असे. तिला छेडणं हें वाईट काम समजलंच जात नसे मुळीं! विद्यार्थ्यांच्या जगांत तें पुण्यकर्म मानल जाई. ह्यावरून तुम्ही पहा आतां, मुलांना तिच्याविषयीं किती राग वाटत होता तो. तर हो! आतां तिच्या भीतीनं माणसानं गाणं म्हणायचं नाहीं, थट्टामस्करी करायची नाहीं, म्हणजे केवढा सासुरवास झाला हा?...काय म्हणालांत श्रीमंत देशमुख? असं–असं! सांगितलं ना मी तुम्हांला, कीं सहासात वर्षांपूर्वीचा तो काळच अगदीं वेगळा होता म्हणून? तशांत आपलं हें नागपूरसारख्या जुन्या पद्धतीच्या गांवांतलं, महालासारख्या ह्या नगरांतल्याहि जुन्या चालीच्या विभागांतलं, आणखी तशांतहि भटजी कॉलेज होतं म्हणून!... हो– हो, त्या काळीं अगदीं पोरींकडे पाहून हसणं, त्यांच्यादेखत गाणं म्हणणं म्हणजे-सुद्धां मोटा अमर्यादेचा अपराध मानला जात असे! आतां पोरीच मुळीं पोरांकडे चक्क टक लावतांना दिसतात, रसिकपणें त्याच्यापुढें तानालपेटी घेतात, आणि त्यांना घांसून जाण्यांत मौज मानतात! आतांची गोष्ट सोडा, पण, स्त्री–पुरुषांनीं परस्परांकडे पाहून हंसण्याला जेव्हां वेगळाच अर्थ होता तो काळ आठवत नाहीं तुम्हांला? बाईचं हंसणं ऐकूं येणं किंवा तिनं पुरुषापुढें फिदीफिदी करून दांत काढणं हें तेव्हां बरं लक्षण मानलं जात नसे! म्हणून हंसताना बाया तेव्हां तोंडाला पदर लावायच्या! मोठी गोड रीतभात होती ती! मोठी काव्यमय आणि मर्यादशील! स्त्रीपुरुषांनीं एकमेकांना मारे धक्के देत जाणं हेंसुद्धां तेव्हां अमर्यादेचं आणि जंगलीपणाचं मानल जात असे! म्हणूनच म्हणतों कीं तुम्हांला त्यांत आश्चर्य मानण्याचं कांहीं कारण नाहीं. खरोखरच डोरा नगरकरनं अगदीं हंसल्याविषयीं आणि

गाणं म्हटल्याविषयीं मुलांच्या कागाळ्या आणि त्यांचा अपमान केला—कर-विला होता... काय म्हणालास माने? प्रिन्सिपॉल! अरे हो—हो, प्रिन्सि-पॉल तो अगदीं हटकून तिच्या अंगानं असायचा! मुलगी होती बाबा ती! डोरानं चपला उगारल्याविषयीं मुलांनीं उलट्या कागाळ्या करून पाहिल्या नाहींत असं नाहीं! पण कांहीं उपयोग झाला नाहीं त्यांचा! उलट प्रिन्सि-पॉलच अशी कागाळी एका मुलीविषयीं आणूं शकणाऱ्या पोराची चेष्टा करायचा! स्त्रियांना आणि स्त्रीशिक्षणाला उत्तेजन देण्याची ही रीत नव्हे म्हणायचा. अशानंच आम्हीं 'हिंडू लोख' मागं राहिलों म्हणून सांगा-यचा! विलायत देशांत बायकांकडून चप्पल काय, पण बूट किंवा लाथ खाण्यांतहि विशेष कांहीं मानत नाहींत आणि म्हणूनच ते लोक उन्नती-प्रत गेले आहेत अशी मल्लीनाथी करायचा! थोडक्यांत काय, कीं आम्हीं सगळ्यांचे अगदीं गणपति पांडे होऊन जावेत अशीच जणूं काय त्या डॉ. जोसेफ हिवाळे नांवाच्या गोऱ्या इंग्रजांच्या काळ्या पडछायेची आंतरिक इच्छा होती....

"काय म्हणालास बालबुद्धि? गुरुबचनसिंग? सबूर, सबूर, जरा सबूर! तिकडेच आपण जातो आहोंत. गुरुबचनला कसा विसरेन मी? आज इतक्या वर्षांनंतरहि तो शीख छोकरा माझ्या स्मृतींत अगदीं ताजा टवटवीत आहे. पण गोंदू भुसारीविना गुरुबचनपर्यंत पोहोचतां यायचं नाहीं आपणाला. गोंदू भुसारीचा तो प्रकार झाला नसता तर गुरुबचनची कहाणी आज सांगायची वेळच येत नव्हती. गोंदू आणि गुरुबचन हे अगदीं जीवश्चकंठश्च मित्र. बरोबर सिनेमाला जायचे, बरोबर फिरायचे, वर्गांत बसायचेहि एकाच बाकावर! गोंदू आणि गुरुबचन कॉलेजांत अभेद्य जोडी म्हणून ओळखले जात होते. ते दोघे मुलांच्या बैठकींत येऊन बसले म्हणजे असा कांहीं रंग चढायचा म्हणतां! गोंदू होता पक्का वऱ्हाडी. त्याच्या प्रत्येक वाक्याची सुरवात 'का राजे हो' नं व्हायची! आणि गुरु-बचनच्या पंजाब—प्रकरणाचा प्रारंभ 'क्यों बादशहाओं' असा असायचा.

गोंदू गाणं मोठं गोड म्हणायचा. जेव्हां पहावं तेव्हां तो आपला गुणगुण-तांना सांपडायचा. गोंदूचं गाणं आणि गुरुबचनचं बोलणं हा तेव्हांच्या विद्यार्थी–बैठकींचा बेहोष आनंद असे. गोंदूच्या गाण्यांतल्या कलेला उपमाच द्यायची तर ती गुरुबचनाच्या क्रीडांगणावरच्या चापल्याचीच शोभेल. गुरुबचन गोंदूच्या गाण्यावर अगदीं लट्टू असे व गोंदूला गुरुबचनचा उदार, उमदा, धडाडीचा खेळाडू स्वभाव भारी प्रिय होता. गुरुबचन हा श्रीमंताचा, जंगलखात्यांतल्या एका मोठ्या अधिकाऱ्याचा मुलगा होता. गोंदू वऱ्हाडी असला तरी वऱ्हाडशीं पूर्वीच्या काळीं संबद्ध असणाऱ्या श्रीमंताशीं त्याचा मुळींच संबंध नव्हता. त्याची स्थिती हलाखीचीच म्हटली पाहिजे. तो पोरका होता. चार शिकवण्या करून आणि चारदोन हितचिंतकांची मर्जी संभाळून तो आपला विद्याभ्यास पार पाडीत असे. तरीहि त्याच्या वागणुकींत कधीं त्यानं दैन्य दाखवलं नाहीं. गोंदू भुसारी-देखील हंसरा आणि थट्टेखोर होता. पण त्याच्या थट्टेखोरपणावर साहजिकच पुष्कळ प्रकारच्या मर्यादा पडलेल्या होत्या. गोंदूविषयीं कुणी वाईट बोललेलं गुरुबचन खपवून घेत नसे, आणि गुरुबचनला कुणी नांवं ठेवलेलीं गोंदूला आवडत नसत. एक होता पंजाबचा, दुसरा वऱ्हाडी; एक दरिद्री होता, दुसरा श्रीमंत होता; एक अतिशय देखणा होता, तर दुसऱ्याच्या चेहेऱ्यावर वऱ्हाडच्या काळ्या मातीची सांवळी धूळ उडालेली होती; पण त्यांचा स्नेह मोठा जिव्हाळ्याचा होता. ह्या स्नेहाची डोरा नगरकरला कल्पनाहि करणं कठीण गेलं असतं. मी तुम्हांला सांगतों, ऐकून ठेवा तुम्हीं माझं, दोन मुलं परस्परांची ज्या प्रामाणिकपणानं आणि उत्कटतेनें मित्र होऊं शकतात, तशा दोन मुली परस्परांच्या मैत्रिणी कधींहि होऊं शकत नाहींत! त्यांचीं मनंच एकंदरीत कोतीं! एक मुलगा आणि एक मुलगी मात्र परस्परांसाटीं अगदीं प्राण टाकूं शकतील बरं का! पण दोन मुलींची मैत्री! रामाचं नांव घ्या! हेवादावा, निंदानालस्ती, सारं आलंच तिथें. म्हणूनच मी म्हणतों, कीं डोरानं गोविंद भुसारीला गोत्यांत

आणलं, तेव्हां स्वत:साटीं आपण कोणता खड्डा खणून ठेवतों आहोंत ह्याची तिला मुळींच कल्पना नसेल.

"मी तुम्हांला सांगितलंच आहे कीं सदान् कदा शीळ घालायचा आणखी गाणं गुणगुणायचा गोंदूला नाद होता म्हणून. एक दिवस असाच तो कॉलेजच्या फाटकापाशीं शीळ घालत अन् गुणगुणत उभा होता. आज गुरुबचनसिंग त्याच्याबरोबर नव्हता. कारण गुरुबचन गेला होता जबल-पूरला हॉकी–सामन्यासाठीं. 'तिरछी नजरियाके बान' अशाच कोणत्या तरी ओळी गोंदू गुणगुणत होता. 'गोरे गोरे गाल तेरे और काले काले झुल्फ हैं' (तुझे गाल गोरे आणि केंस काळे कुळकुळीत आहेत) असंहि कांहीं तरी तो मधूनच म्हणत असल्याचं स्मरतं. आम्हीं आणखी कांहीं-जण फाटकापाशीं त्या वेळीं होतों. कॉलेज सुरू व्हायची वेळ होती आणि सारखी फाटकांतून विद्यार्थ्यांची आवक चालली होती. शेंपन्नास मुलं येऊन गेल्यावर एखादी मुलगीहि येत असे. गोंदू आपल्याच गुणगुणण्यांत गुंगला होता. आणि त्याचं 'तिरछी नजरियाके बान' नि 'गोरे गोरे गाल तेरे...' चालूच होतं. त्याच्या शेजारून कोण येत जात होतं ह्याचाहि त्याला पत्ता नव्हता. ते दोन शृंगारिक चरण तो कां गुणगुणत होता आणि ते शृंगारिक होते कीं नव्हते, ह्याचंहि त्याला भान नसेल. इतकंच सांगतों, कीं गोंदू भुसारी तसा अगदीं सीधा मुलगा होता नि तो आतां आपल्याच तंद्रींत होता. मी शपथेवर सांगूं शकेन कीं डोरा नगर-कर त्याच्यापुढून गेली केव्हां, रागारागानं पहात जरा पलीकडे असलेल्या चारदोन मुलींबरोबर पुटपुटली केव्हां आणि 'थांब मेल्याला मारतें चप्पल' म्हणून परत आली केव्हां, हें त्याच्या मुळींच खिजगणतींत नव्हतं. त्याचं आपलं 'तिरछी नजरियाके बान' आणि 'गोरे गोरे गाल तेरे' तसंच चालू होतं. तरतरा चालत आणि नाकपुड्या फुगवून श्वास घेत डोरा अकस्मात् गोंदूपुढें येऊन उभी राहिली तेव्हां गोंदू स्तंभित झाला आणि त्याचं गाणं क्षणार्धांत थांबलं. 'कांहीं

लाज नाहीं वाटतं मुलींच्याकडे पाहून अचविचकट गाणीं म्हणायला ?'— म्हणून डोरानं पायांतली चप्पल काढून हातांत घेतली. गोंदूला बोलायला, विचार करायला, वेळच नव्हता. त्याचा चेहरा लाल पडला, पांढरा पडला, आणि उपजत संरक्षणबुद्धीनं त्यानं तिचा वहाण उगारणारा हात गच्च धरून ठेवला. डोरान दांतओंठ खाल्ले, ती किंचाळली, आणि मग तिथं पोरांची एकच गर्दी लोटली. डोराचा हात गोंदूनं धरला तेव्हांचा त्याचा चेहरा मला स्पष्ट आठवतो. निरुपायानं इंगळीची नांगी चिमट्यांत दाबून धरणाऱ्या माणसासारखा त्याचा चेहरा अप्रसन्न, बावरलेला होता. डोरा तोंडानं अद्वातद्वा बोलत त्याच्या हाताशीं झटपटत होती. त्याच अवस्थेत तिथें आलेल्या सुब्रह्मण्यम् नांवाच्या एका प्राध्यकानं त्यांना वेगळं केलं... झालं! डोरानं गोंदूवर चप्पल उगारली आणि गोंदूनं तिचा हात धरून ठेवला म्हणून हां हां म्हणतां कॉलेजभर बोंब झाली. डोरा तिच्या नेहेमीच्या पद्धतीप्रमाणं प्रिन्सिपालकडे फणफणत कागाळी घेऊन गेली. 'गोरे गोरे गाल तेरे' वगैरे गाणी गोंदूनं तिला उद्देशून म्हटलीं नि तिचा हात धरला असा गोंदूवर तिनं आरोप केला. 'ह्या पोरीचे केस काळे असले तरी गाल मुळींच गोरे नाहींत, तेव्हां माझं गाणं तिला उद्देशून असणं शक्यच नव्हतं' असं उत्तर गोंदूच्या जागीं गुरुबचन असतां तर त्यानं प्रिन्सिपालला अवश्य दिलं असतं. गोंदूला तें शक्य नव्हतं. त्यांनं इतकं मात्र सांगितलं कीं 'ही माझ्या अंगावर चप्पल उगारूनच आल्यामुळें हिचा हात धरण्याविना मला गत्यंतरच नव्हतं. गाणं कांहीं मी तिला उद्देशून म्हटलं नव्हतं, ही जवळपास आहे हें सुद्धा मला माहित नव्हतं. गाणीं गुणगुणायची संवय माझ्या अगदीं हाडामाशीं खिळलेली आहे. वाटेल तर कुणालाहि विचारा!' कांहीं मुलांच्या साक्षी प्रिन्सिपॉलनं घेतल्या, त्या गोंदूच्या अंगानं होत्या. तरीहि शेवटीं व्हायचं तेंच झालं. प्रिन्सिपॉलनं ताशेरा झाडून गोंदूला पंचवीस रुपये दंड ठोठावला. त्याहिपेक्षां वाईट गोष्ट म्हणजे 'डोरानं गोंदूवर चप्पल उगारली आणि गोंदूनं

तिचा हात धरला' ह्या संपूर्ण सत्यापैकीं केवळ शेवटचा अर्धा भागच पुष्कळांना कळला आणि त्यापायीं गोंदूच्या दोन शिकवण्या सुटल्या. मुलांची सहानुभूति पूर्णांशानं गोंदूकडे असली तरी जें झालं तें गोंदूच्या मनाला फार लागलं आणि चार-दोन दिवसांतच तो आजारी पडला. जबलपूरहून परत आल्यावर गुरुबचनला झालेला सगळा प्रकार कळला. गोंदूसारख्या सालस मुलानं कोणत्या कां कारणानं होईना, पण डोराचा हात धरला, ह्याविषयींच त्यानं प्रथम खूप विनोद केला. त्याची ती पद्धतच होती. कोणतीहि गोष्ट मनाला कितीहि लागली तरी नेहमीं सारं तो थट्टेवारी न्यायचा. 'गोंदू आजारी आहे, तो इष्काच्या बिमारीनं' असं म्हणायलाहि त्यानं कमी केलं नाहीं. डोराविषयीं त्याच्या मनांत केवढी जबरदस्त अढी बसून गेली होती, तें आम्हांला डोराचं नांव निघतांच त्याच्या डोळयांत जी चमक येऊन जाई आणि त्याच्या उडाणटप्पू विनोदाला जी भरती येई, त्यावरूनच कळून गेलं होतं. गुरुबचनच्या डोळयांतली ही चमक एक दिवस डोराला चांगला चटका देणार अशीच त्याला ओळखणाऱ्या साऱ्यांची अटकळ होती. आतां तो नुसता निमित्तालाच टेकला होता. आणि मग एक दिवस ते निमित्तहि त्याला मिळालं....

"बेंजामिन मलेलू म्हणून तेव्हां गुरुबचनच्याच वर्गांत एक विद्यार्थी होता. डोराचा अगदीं हुजऱ्याच होता म्हणा ना तो! आपलीं लहान सहान कामं करवून घ्यायला आणि अखेर ताकास तूर लागूं न देतां त्यांच्या तोंडाला पानं पुसायला, जहांबाज पोरींना अशीं कांहीं बाहुलीं लागतच असतात. अखेर ज्याचा वांटा तोच नेतो आणि हे हुजरे बसतात बहुतेक काकलत! पण मुलींच्या पदराचा नुसता वारा लागला तरी तेवढ्यांतच हे प्रसन्न असतात, आणखी मग त्यासाठीं त्यांचे चिखलानं माखलेले जोडे डोक्यावर घ्यायलासुद्धां हीं पात्रं मागंपुढं पाहात नाहींत. त्यांपैकींच हा बेंजी मलेलू होता. (मुलं त्याला 'बेहे-

नजी ' म्हणत असत!) गोंदूला शिक्षा झाल्यामुळं ह्याला मोठा आनंद वाटला. आणखी तसं कांहींसं एकदां दूरान्वयानं तो मुलांच्या बैठकींत बोलला. त्यावर गुरुबचननं एकदां बेंजीकडे हंसून पाहिलं, ' ठीक बात है बेहेनजी ' असं तो म्हणाला आणि मग चारदोन मिनीटं तो बैठकीच्या न्हाणीघरांतून जाऊन आला नि टायची गांठ सोडून पुन्हां बांधत भिंतीवरच्या आरशासमोर उभा राहिला. मला त्याचा त्यावेळचा पोषाख अजूनहि आठवतो. निळसर छटा मारणारी गरम विजार त्यानं घातली होती, चेकचा गरम कोट घातला होता, फिक्कट गुलाबी साफा बांधला होता आणि आपल्या रक्तरंगी टायचीं टोकं दोन्हीं हातांनीं तो वर करत होता. सहज मान वळवल्यासारखं करून तो बेंजीला म्हणाला, ' मिस्टर मलेल्, माझ्या विजारीच्या खिशांत टायपिन् आहे ती जरा देतां कृपा करून! माझे दोन्ही हात गुंतले आहेत म्हणून मी तुम्हांला विनंती करतों आहे. तकलीफ मुऑफ हूँ! '

मिस्टर मलेलू! बेंजीची नेहेमी ' बेहेनजी ' किंवा ' अबे मलेल्ू ' म्हणून संभावना करणारा गुरुबचन आज त्याला मोठ्या आदबीनें मिस्टर मलेलू म्हणत होता. पोरांनीं एकदम कान-डोळे टवकारले! त्यांना निश्चि-तीच पटली कीं गुरुबचन आतां कांहीं तरी धमाल मौज करणार! बेंजी मात्र मूर्ख खरा! प्रथमच बहुवचनी भाषा ऐकतांच ' हो-हो! वाय ऑल मीन्स! तकलीफ काहेकी! ' म्हणून तो पुढें झाला आणि त्यानं घाईघाईनं गुरुबचनच्या उजव्या खिशांत हात घातला. गुरुबचननं मान वळवून पोरांच्या दिशेनं डोळा मिचकावला आणि कॉलरबटन दांतांत धरून, वांक-लेल्या मलेलूला तो म्हणाला, ' तुमानीचा उजवा खिसा नव्हे, डावा पहा डावा! ' ' हां-हां ' म्हणून म्हणत त्याच उत्साहानें बेंजीनं भस्कन गुरुब-चनच्या डाव्या तुमानखिशांत हात घातला!...आणि हाय रे हाय! एरंडेलचा भला थोरला घुटका घेतल्यासारखा चेहरा करून विंचू डसल्या-गत तो हात त्यानं इसपट जास्त वेगानं बाहेर ओढला! बेंजी मलेलूचा

त्यावेळचा चेहेरा अगदीं पन्नास रुपये तिकीट भरून पाहण्यासारखा होता. तोंड वांकडंतिकडं करीत आपलाच पंजा आपल्या शरीरापासून त्यानं लांबवून अगदीं दूर धरला आणि चिडीच्या स्वरांत तो म्हणाला, ' You have a strange sense of humour Mr. Mullick, ही काय थट्टा करायची रीत झाली ? '

' अरे यार मलेलू, पण तुला चिडायला झालं काय ? '

' तुला माहित आहे काय झालं ते ! '

' मला तर माहीत आहेच, पण तुला ते जास्त चांगलं माहीत आहे ! जरा सांग तर ! '

' खिशाचं अस्तर तूं आंतून फाडून ठेवलं होतंस. मुद्दाम मला तूं त्या फाटक्या खिशांत हात घालायला सांगितलास. घाणेरडी—घाणेरडी आहे ही तुझी थट्टेची पद्धत ! '

' धोबीच लेकाचे आजकाल फार वाईट झाले आहेत बहेनजी ! ' खिशाचीं अस्तरंसुद्धा फाडतात बेटे ! नाराज न होना बेणजी ! ' असं म्हणून अतिशय पश्चात्तप्त चेहेरा करून गुरुबचननें मलेलूसमोर गुढगे टेकले. मलेलूचा तो तसा किनीन घेतल्यासारखा चेहेरा, आणि गुरुबचनचा हा असा ! फारच विनोदी दृश्य होतं तें !...

पोरं मघापासूनच, सारखीं पोट धरधरून हंसत होतीं. आतां पुन्हा हास्याचा नवा कल्लोळ झाला. बेंजीनं गुरुबचनच्या खिशांत गेलेला पंजा अजूनहि दूर धरून ठेवला होता. त्याला बोलायला शब्दच सुचत नव्हते. आणखी हंसण्याच्या एवढ्या धबडग्यांत त्याचं बोलणं ऐकूं जाणार होतं कुणाला ? मधेंच त्याचा चेहेरा रागावल्यासारखा व्हायचा, मधेंच रडल्यासारखा व्हायचा, आणि आपण खेळाडू आहोंत, तशी कांहीं ही चेष्टा आपल्याला लागलेली नाहीं, हें सिद्ध करण्यासाठीं मधेंच तो मलूलपणें हंसण्याचा प्रयत्न करायचा ! गुरुबचनहि आतां जोरजोरानं खिदळूं लागला

होता. तोंडांतल्या तोंडांत कांहीं तरी पुटपुटणाऱ्या बेंजीला हंसताहंसतां ओरडून तो म्हणाला,

'बेणजी, आधीं हात धुऊन ये हात! तसा हात धरून किती वेळ उभा राहणार तूं! मग बोलत बसूं आपण सावकाश!' आणखी मग मलेल्ल जसा न्हाणीघराकडे गेला तसा गुरुबचन पुन्हा खदखदूं लागला. सोड्याच्या शेंकडो बाटल्या फटाफट फुटल्याप्रमाणं किती तरी वेळ ती खोली पोरांच्या हंसण्यामुळं सारखी दुमदुमत राहिली. बेंजी न्हाणींतून परत आला तेव्हां पुन्हा एकदां टाळ्या पिटून मुलं खिदळलीं.

'तूं मोठी गंमत केलीस असं वाटत असेल नाहीं तुला गुरुबचन!' बेंजी म्हणाला.

'खरी गंमत तर बेहेनजी तूंच केलीस!' गुरुबचन हंसला. पुन्हां मुलांत खसखस पिकली व शांत झाली.

'तूं मला सहकार्य दिलं नसतंस तर ही मौज होऊं शकली असती का तूंच सांग बरं?' तो पुढें म्हणाला.

'तुझा मित्र तो गोंदू—' बेंजी म्हणाला, 'त्यानं डोराशीं गंमत करून पाहिली होती. थोडी महाग पडली ती त्याला.'

'महाग कां असेना, पण आपल्याला गंमत पाहिजे. माझी तक्रार अशी आहे कीं गोंदूनं डोराचीं पुरेशी गंमत केलीच नाहीं! अखेर सोवळा मराठा पडला ना! त्याच्या जागीं जर मी असतों...'

'विचार करून बोला सरदार! डोराला तूं नीट ओळखत नाहींस.'

'आणखी ती तरी मला कुठे ओळखते आहे? आजपर्यंत गोंदू-सारखीं मवाळ पोरंच भेटलीं तिला.'

'मग तूं हो कीं पुढं! आपल्या मित्रासाठीं कर कांहींतरी!'

'त्याच विचारांत होतों मी! बोल, काय करूं?'

'पहा बरं गुरुबचन! मग मागं हटशील! प्रसंग डोराशीं आहे!'

'पैज तुझी माझी. मी मागें हटणार नाहीं. मी ह्या तुझ्या डोराला जे कांहीं तूं म्हणशील तें करीन!'

'महाग पडेल बरं सरदार!'

'पंचवीस रुपये दंडापेक्षां पुष्कळ जास्त मोल द्यायची माझी शक्ती आहे!'

'ऐट नको मारूंस! नि उगीच इरेला पडूं नकोस! वाटत असेल तुला कीं आपण मोठे सहा फूट उंच आहोंत! पण डोरानं चप्पल काढली, कीं दिसतील देव! तुझं कृपाणसुद्धां तुझ्या कामीं येणार नाहीं.'

'स्वतःवरून ओळखतोस का रे?'

'नाहीं, जरा गोंदूला विचार ना!'

'तो अडलेला होता बिचारा. मी सगळा हिशेब चुकता करून देईन तिचा! जगांतले सगळेच पुरुष मुर्दाड नाहींत हें तिलाहि कळायला पाहिजे एकदां. चप्पल मारण्याचं नुसतं नांव तर काढूं दे तिला!'

'काय करशील तूं तिचं? तूं मारशील तिला उलट?'

'नहीं यार! तरुण पोरीच्या अंगावर हात टाकण्याइतका मी अरसिक नाहीं!'

'मग काय करशील तूं तिचं?'

'तूं म्हणशील तें!'

'पहा बरं! डोराची चेष्टा करणं म्हणजे भेंजीची खोडी काढणं नव्हे!'

'समजलं रे! तुला तिच्या पदराआड दडायची संवयच आहे! बोल काय करूं मी? पैजेवर मी तुला सांगतों, कीं तिची जन्माची खोड मी मोडीन.'

'दुसरंतिसरं तर राहूंच दे, नुसतं गोंदूनं म्हटलं तसं गाणं तूं तिच्यासमोर म्हण, नाहीं तिनं तुझी दाढी पेटवली तर मला सांग!'

‘ तुला काय सांगायचं कपाळ ! हीं मर्दांचीं कामं आहेत. तुला तीं कळायचीं नाहींत ! ’

‘ मग पैजेवर तूं तरी एवढं मर्दांचं काम करून दाखव ! ’

‘ दाखवतों करून. काय पैज ! ’

‘ तूंच सांग. ’

“ सांगतों, मी डोरा नगरकरसमोर गाणं म्हणतों, अगदीं ‘ आदा ’ सकट म्हणतों. तिला उद्देशून म्हणतों. तिनं चप्पल मारण्याची भाषा केली तर मी काय करीन, तो तमाशा तू पाहशीलच. तसं जर मी केलं नाहीं तर ह्याच मुलांच्या बैठकींत मी हातांत बांगड्या भरून घेईन. पण मी जर तसं केलं, तर आतां इथं असलेल्या पोराच्या साक्षीनं तूं बांगड्या भर आणि त्या बांगड्या भरूनच जा डोरासमोर ! मंजूर ? ’

‘ मंजूर ! ’

‘ पहा बरं बेहेनजी ! शब्द पाळायची मला संवय आहे. मित्राच्या अरमानासाठीं मी कांहीं करूं शकतों. स्वतःच्या शौकासाठींहि पुष्कळसं करूं शकतों. तूं मात्र आपले शब्द ध्यानांत ठेव. ’

‘ठेवले. चल बोल, मग केव्हा चलतोस डोरासमोर ?’

‘अरे केव्हां कशाला ? उधार गोष्ट आवडत नाहीं मला. ती येते आहे बघ डोरा कॉलेजच्या चौकांत. हा असाच निघतो मी ! ’

हां हां म्हणतां गोष्ट कडोनिकडीला आली होती. गुरुबचन कांहीं तरी अगदीं अनपेक्षित करणार असं साऱ्यांनाच वाटत होतं. तो बोलेल तसं करणारा पोरगा होता. डोराकडून परस्पर गुरुबचनला जिरवायचा मलेल्चा विचार स्पष्टच दिसत होता. गुरुबचनलाहि तो दिसला असला पाहिजे. पण तो पोऱ्याच मोठा जिद्दवाला होता. बरी असो, वाईट असो, एखादी गोष्ट त्याच्या मनानं घेतली, कीं ती तो करूनच दाखवायचा ! आतांहि तो कांहींतरी अगदीं अनपेक्षित करील अशीच आमची अटकळ होती, आणि त्यानं जें केलं तें होतंहि विलक्षणच ! त्यानं जें केलं तें तो

करील अशी मात्र कुणाला पुसटसुद्धां शंका नव्हती. गुरुबचन आणि डोरा ह्यांचा सामना व्हायच्या बेतांत होता आणि तो पहायला आम्ही सारे उत्सुक होतो. तिलाहि पार जिरविणारा कुणीतरी भेटायला हवा होता. गोंदू भुसारीच्या प्रकरणानंतर मुलांना असें फारच तीव्रतेनं वाटत होतं. डोरा नगरकरला धडा शिकविण्याइतकी छाती ठेवणारा सबंध कॉलेजांत कुणी असला तर तो गुरुबचनच होता. म्हणून गुरुबचन ऐटीनं बैठकी-बाहेर बूट वाजवीत निघाला तशी मुलंहि कुणी पडवींत तर कुणी चौकांत श्वास रोखून आतां पुढं काय होतं तें पहात उभी राहिली.

गुरुबचननं 'तिरछी नजरियाके बान' आणि 'गोरे गोरे गाल तेरे और काले काले झुल्फ है' हीं कडवीं आपल्या बोगऱ्या आवाजांत हात-वारे करून- म्हणायला प्रारंभ केला, तेव्हां डोरा चौकांतल्या सायकल-स्टॅंडवर आपल्या दुचाकींत वाकून वारा भरत होती. गुरुबचन तिच्यापासून सरासरी दहा यार्डांवर उभा राहून, तिच्याचकडे तोंड करून मारे हात-वारे करत होता आणि भसाड्या सुरांत गाणं म्हणत होता. 'गोरे गोरे गाल तेरे—' व मग तिरछी नजरियाके बाऽऽऽन!' ताना मारण्यांत-सुद्धां गुरुबचननं कसूर केली नाहीं.

ज्या कडव्यापायीं कॉलेजांत नुकताच येवढा इतिहास घडला तींच कडवीं पुन्हा कानावर येतांच डोरा हातांतला पंप सोडून विंचू डसल्या-सारखी ताठ उभी झाली. तिच्या नाकपुड्या फुलल्या, भुंवया वांकड्या-तिकड्या झाल्या आणि डोळे चढवून तिनं एकदां गुरुबचनकडे आणि एकदां आपल्या पायांतल्या वहाणांकडे पाहिलं. श्वास रोखून सारीं मुलं पहात होतीं. गुरुबचननं आणखी पांच-सात पावलं डोराच्या दिशेनं आगे कूच केलं आणि हातवारे करीत अगदीं निर्धास्तपणें तो म्हणत राहिला,— 'तिरछी नजरियाके बान!' गुरुबचनच्या उद्देशाविषयीं आतांपर्यंत डोराला कांहीं संशय असलाच तर तो आतां नाहींसा झाला. आजवर कुणी कधीं दाखवलं नसेल अशा प्रकारचं धारिष्ट दाखऊन उघड उघडच तो तिला

आव्हान देत होता. गुरुबचनचा तो अगदीं विव्हळ चेहरा, त्याच्या स्वरां-तलं तें भसाडं कारुण्य, त्याचे ते वेडविणारे हावभाव...छेः! हें सारं मुकाट्यानं सहन करणं डोराला शक्यच नव्हतं! त्या गोंदू भुसारीचा नुकताच तिनं धुव्वा उडवून दिला होता. आणखी आतां हा शीख बोकड बुद्धयाच तिची खोडी काढत होता काय? ठीक आहे!

'इव्हा, जरा माझ्या ह्या पुस्तकांकडे बघ ग! आणखी हें घड्याळ धर जरा माझं!' पडवींतून चाललेली इव्हा सॅम्युएल नांवाची पोरगी डोराजवळ आली आणि एकदां गुरुबचनकडे आणि एकदां डोराकडे पाहून म्हणाली, 'कां ग?'

'बघ ना तो मेला बोकड कसा बेंबटतो आहे मघांपासून! जरा थोबाडांत चप्पल मारून तोंड बंद करतें त्याचं!'

गुरुबचनला मराठी चांगलं समजत होतं. तो 'खो–खो' करून एकदां हंसला, आणि एक हात कंबरेवर देऊन पुन्हा म्हणूं लागला, 'तिरछी नजरियाके बाऽऽनऽ!'

मुलांची उत्कंठा आतां कळसाला पोंचली होती. डोरानं आपलं मनगटी घड्याळ इव्हाच्या स्वाधीन केलं, ओठावर दांत रोंवले, आणि ती खवळून ओरडली, 'You fllithy goat! गलिच्छ बोकडा! I will teach you some music now!' थांब, आतां मी तुला थोडं गाणं शिकवतें!'

आणि असं म्हणत असतांच पायांतली चप्पल हातांत घेऊन आवे-शानं ती गुरुबचनसिंगवर तुटून पडली. गुरुबचन कंबरेवर दोन्ही हात ठेऊन आणि दोन्ही पाय थोडेसे फाकून स्मित करीत अगदीं चैनींत उभा होता. खरोखरच मोठा फक्कड दिसत होता तो! अगदीं डगलस फेअरबँक्स, किंवा डेनिस किंगसारखा! तो गोरा गुलाबी, सडसडीत आणि डोरापेक्षां चांगला वीत दीड वीत जास्त उंच होता आणि आकृतीनं रेखीव, भरीव, लवचिक अशी काळीसांवळी डोरा चप्पल उगारून त्याच्या अंगावर धांवली होती. ...नंतर काय केलं असेल गुरुबचनसिंगनं तिला असं तुम्हांला वाटतं?

चालवा चालवा जरा कल्पना! सांगा तात्या देशमूख! तूं रे बाळबुद्धि! तूं मंजुनाद! अरे स्वतःला कवि म्हणवतोस ना लेका! मग सांग ना! चालव ना जरा कल्पना!...नाहीं? नाहींच सांगतां यायचं! अगदीं कल्पनेच्या पलिकडचीच गोष्ट होती ती! मग तुम्ही बरी म्हणा, वाईट म्हणा! मात्र आम्हीं सगळे तेव्हां थक्क झालों असलो तरी आम्हां कुणाला तेव्हां गुरुबचनला दोष द्यावासा वाटला नाहीं, इतकं मात्र खरं! त्याच्या बेदरकार आणि जिद्दखोर धाडसामुळेंच आमचीं मनं कौतुकानं भरून आलीं! उमाजी नाईक श्रीमंतांना लुटून गरीबांना दान करत होता, त्याच्याविषयीं नाहीं का नाहीं म्हटलं तरी आपल्याला कौतुक आणि आदर वाटत? तर मग ही डोरा तरी कोणती सरळ होती? तसंच पाहिजे होतं तिला!...तसं म्हणजे कसं विचारतोस बालबुद्धि? तुला नाहीं ना कल्पना करतां येत? अरे, प्रत्यक्ष जे पहात होते त्यांनासुद्धां कल्पना नव्हती कीं चप्पल उगारून अंगावर आलेल्या ह्या पोरीचं गुरुबचन आतां काय करणार म्हणून!

गुरुबचन अगदीं सैलपणें उभा राहिल्यासारखा दिसत असला तरी तो पूर्णपणें सावध होता. डोरा झेंप घेऊन त्याच्या हाताच्या टप्प्यांत आली मात्र, आणि त्यानं चप्पल उगारलेला तिचा हात मनगटापाशीं लीलेनं वरच्या वर धरला. त्यानं तिचं मनगट अगदीं सहज झेलावं तसंच धरलं, पण कांहीं झालं तरी गुरुबचनसारख्या खेळाडूचीच पकड होती ती. डोराचं मनगट गुरुबचनच्या पकडींत सांपडतांच पट्कन् तिच्या हातांतली चप्पल गळून खालीं पडली आणि 'सोड–सोड मेल्या मला' म्हणून ती किंचाळूं लागली. साराच प्रकार दृष्टी बांधून टाकील अशा वेगानं आणि तऱ्हेनं घडत होता. गुरुबचननं तिचं तें मनगट तर सोडलं नाहींच, पण तिचा दुसराहि हात धरला. मग सफाईनं स्वतःच्या उजव्या हाताचा वेढा तिचा शरीराभोंवतीं घालून त्यानं तिचा देह असा कांहीं जखडून आणि डांबून धरला कीं तिला जागचं हलतां येणं अशक्य झालं. मग मस्तक किंचित् खालीं वाकवून तो तिचीं सारखीं चुंबनं घेऊं

लागला. एक–दोन–तीन–चार! कां कुणास ठाऊक, पण डोरा आतां किंचाळतहि नव्हती. अगदीं कल्पनातीत तें झाल्यामुळें तिची वाचा बसली होती. गुरुवचननं तिला जखडून धरल्यामुळं तिला साधी हालचालहि करतां येत नव्हती, कीं आणखी कोणत्या अज्ञात कारणामुळं ती अगदीं गप्प, अगदीं मलूल झाली होती कोण जाणे! पण ती अगदीं निःशब्द, निश्चेष्ट झाल्यासारखी दिसत होती एवढं मात्र खरं! गुरुवचनच्या आविर्भावांत मला तेव्हां वैषयीकता किंवा पिपासा मुळींच दिसली नाहीं. एखाद्या अपराध्याला फटके मारण्याचं कटु कर्तव्य ज्या प्रकारं पार पाडावं, त्याच प्रकारें तो तिचे मुके घेत होता. आसक्तीची धुंदी त्याच्या डोळ्यांत मला कुठेच आढळत नव्हती. उलट, सूर्यप्रकाशांत ठेवलेल्या झळझळीत भांड्यांवरून जसे कठोर किरण तळपावेत तसे किरणच जणूं त्याच्या डोळ्यांतून तळपत होते. मंत्रसामर्थ्यानं बांधून टाकल्यासारखे आम्हीं त्या विलक्षण देखाव्यांकडे पहात होतों. कांहीं काळ तरी साऱ्यांची सारीच हालचाल थांबली होती. अगदीं श्वासोच्छ्वाससुद्धां नांवापुरताच उरला होता. असं वाटत होतं, कीं जणूं जगाच्या प्रारंभापासून गुरुवचननं डोराला हें असंच जखडून धरलं आहे आणि तेव्हांपासून ही चुंबनाची क्रिया सारखी चालूच आहे. पण फारच तर तो प्रकार मिनिट दीड मिनिट चालला असेल.

'जा पोरी! पुन्हा गरूर नको करूंस!' असं म्हणून गुरुवचनसिंगनं तिला सोडून दिलं, आणि तीहि एक अक्षर न बोलतां एकदां त्याच्याकडे विचित्र दृष्टीनं पाहून धांवत आणि स्फुंदतच तिथून निघून गेली. तेव्हां कुठे आम्हीं सारे भानावर आलों. आम्हीं भानावर आलों तेव्हां जें कांहीं झालं नि जें कांहीं होणार होतं, त्याच्या कल्पनेनं अगदीं थरारून गेलों. पण गुरुवचनच्या चेहऱ्यावरची रेषाहि ढळली नव्हती. खिदळून हंसत तो ओरडला, "अरे तो बेंजी मुलेलू कुटे आहे लेकाचा

आतां त्याच्या हातांत मला चांगल्या कोंपरापर्यंत बांगड्या भरायाच्या आहेत.' "

अण्णा लट्ठे थांबला आणि विझून गेलेलं चिरुटाचं थोटुक बाहेर भिरकावून तो नव्या चिरुटाचं टोंक काळजीपूर्वक कापूं लागला. ऐकलेल्या गोष्टीचे पडसाद अजूनहि जणूं त्या खोलींत रेंगाळत होते. विचारांत गढलेला उद्योन्मुख लेखकू बालबुद्धि मर्धेच सावध झाल्यासारखं करून म्हणाला, " पण मग पुढं काय झालं अण्णा? "

" हात् लेका! नव्या चिरुटांतून धूर फुंकत अण्णा म्हणाला, " स्वतःला लेखक म्हणवतोस आणि एखाद्या लहान पोरासारखं पुढं काय झालं म्हणून विचारतोस! गोष्ट केव्हां सुरू झाली आणि केव्हां संपली हें तरी तुला कळलं का? "

" पुढं काय झालं हें अण्णानं आधींच आपल्याला सांगितलं आहे. गुरुबचन कॉलेजांतून काढला गेला. डारा नगरकरहि कॉलेज सोडून गेली. गुरुबचननं आपली जिद्द पुरी केली. पैज त्यानं जिंकली. तो मोठा मर्द पठ्ठा असला पाहिजे! " माने म्हणाला.

" मर्द पठ्ठा होता!" दूर कुठेतरी दृष्टी लावल्यासारखं पहात अण्णा म्हणाला, " बापाकडून तो यथेच्छ झोडपला गेला आणि कॉलेजांतून काढला गेला. हें प्रकरण जास्त वाढवणं डोराच्याहि हिताचं नव्हतं, म्हणून तें तेवढ्यावरच दबलं. पण कॉलेज सोडून जाण्यापूर्वी गुरुबचन डोराला पुन्हा एकदां भेटला आणि मजलेदार हंसत त्यानं तिला स्वतःच्या कांहीं बांगड्या बेंजामिन मलेल्लूला बहाल करण्याविषयीं विनंती केली. "

" गणपति पांडेला आतां बांगड्या घातल्या पाहिजेत आणि शरयू कैकिणीला ही गुरु चरित्राची कथा साग्र संगीत ऐकवली पाहिजे " मानेनं समारोप गेला.

—हंस, जानेवारी ४९

———

# यंत्र ! : : ४

आज जगाविषयीं माझं मन रागानं जळत होतं. जग म्हणजे नुसता नागडा स्वार्थ! मग त्यांत मैत्री, कोमल भावना, नातीं, कशा–कशाला म्हणून स्थान नाहीं. आपलं साधलं म्हणजे झालं; मग दुसरा जाई ना कां खड्डयांत! दुसऱ्यासाठीं थोडी–थोडीसुद्धां झीज सोसायची माणसाची तयारी नसते. इतकं कशाला, दोन क्षण थांबून कुणी कुणाशीं नुसते चार प्रेमाचे शब्द बोलायला सुद्धां मोकळा नसतो! प्रेमाचे, स्नेहाचे शब्द कुणी बोलूं लागला, म्हणजे सहस्र हिश्शानीं तिथें त्या बोलणाऱ्याचा कांहीं तरी स्वार्थ लपला आहे म्हणून खुशाल समजावं! चालू जगांतली मैत्री म्हणजे शुद्ध ढोंग! जिथें स्वार्थ साधेल तिथेंच जाणत्या वयांत माणसाची नेमकी मैत्री जडते 'ते अमुक सावकार ना, वा!, आमचे ते चांगले मित्र आहेत! ते कलेक्टर राणे–म्हणजे तो आमचा गंप्याच कीं नाहीं, वा, वा, तो तर माझा मित्रच! कॉलेजांत बरोबरच होतों आम्हीं! कोण स्वरकिन्नरी लीलावती म्हणतां? अहो चांगला स्नेह आहे कीं आमचा त्यांच्याशीं!' ही अशी आमची गळेपडू मैत्री! मैत्रीची रंगसफेदी चोपडून उभी झालेली शुद्ध लबाडी! खरी निरक्षेप मैत्री म्हणाल तर ती बालपणांतली. स्वत:ला माझा मित्र म्हणवतो, आणि तरी हा लेकाचा केकऱ्या माझ्याशीं असा वागतो! माझ्यापेक्षां पांचशें रुपये जास्त देऊन नसतं तें घर घेतलं तर काय ह्याचे पितर नरकांत गेले असते! मित्राशीं चढाओढ? असेल, त्याच्या सासऱ्यांनीं त्याला तें घर घ्यायला सांगितलं असेल! मग मारायची होती सासऱ्याला एखादी थाप! मित्रासाठीं येवढंहि त्यानं करूं नये! पण नाहीं –नाहींच तें! तसाच तो दुसरा शुंभ–देशपांड्या! नाहीं तर नाहींच दिलं त्यानं मला युनिव्हर्सिटी कोर्टाच्या निवडणुकीसाठीं मत! म्हणे काय दुसऱ्या एका मित्राला आधींच शब्द दिला आहे! तूं पूर्वींच कां नाहीं

आलास! शब्द दिला तर तो मागें घ्यायचा असता! येवढंहि नाहीं मैत्रीसाठीं करवत ? मला तरी काय माहित कीं तूं येवढंहि नाहीं करणार माझ्यासाठीं म्हणून! नाहीं तर, आलों असतो प्रथम तुझ्याकडे!! आम्हीं भोळे—आम्हांला वाटलं कीं देशपांड्याचं मन आमच्या खिशांतलं! आणखी नेमकं एकच मत कमी पडून आपटलों आम्हीं! शाबास देशपांडे! खूप जागलास पांच वर्षांच्या मैत्रीला. ह्या स्वार्थी बाजारापेक्षां बाळपणचे संबंध किती शुद्ध, किती निरपेक्ष! "रम्य तें बालपण" म्हणून "बालकवीं" नीं ("बालकवी"च ना?) म्हटलं आहे तें उगीच नव्हे! माणूस वयानं वाढला कीं बिघडलं सार! वाढत्या वयाच्या नि देहाच्या प्रमाणांत त्याचं मन आणि त्याच्या मनाचा मोठेपणा सारखा लहान होत जातो! माणूस मरायच्या आधीं त्याचं मन मरूनच गेलेलं असतं बहुतेक! म्हणूनच म्हातारी माणसं अप्पलपोटीं झालेलीं असतात! स्वार्थ—स्वार्थ स्वतःचाच विचार करायची त्यांना संवय लागते. दुसऱ्याचा विचार, दुसऱ्यासाठीं झीज ही गोष्टच त्यांच्या ध्यानीं-मनीं नसते!

खरंच, माणूस किती क्षुद्र होऊं शकतो! माणूस किती पण पडतो! अरे, तुम्हीं जरा दुसऱ्याविषयीं विचार कराल, थोडासा चांगुलपणा दाखवाल, तर काय मराल होय? पण नाहीं—नाहींच तें! सारा चोरांचाच बाजार! मी आणि माझं—मी आणि माझं! बस्—इतकंच!

झपाझप पावलं टाकीत मी मार्गानं चालले होतों आणि मनांतल्या मनांत जगाच्या क्षुद्रपणाला, स्वार्थीपणाला लाखोली मोजत होतो. माझ्या मनांत होत्या, त्याप्रमाणें कांहीं गोष्टी न घडतां, दुसऱ्या कुणाच्या मनांत होत्या, त्याप्रमाणें त्या झाल्या होत्या. माझ्या योजना सिद्धीस जाऊन इतर कुणाच्या त्या हुकल्या असत्या, तर त्यांनीहि मला आणि जगाला अशाच शिव्या मोजल्या असत्या, हा विचार करण्याइतका मी तेव्हां शुद्धीवर नव्हतों. व्यवहारांतली प्रत्येक गोष्ट अगदीं रंगून एकतानतेनं केल्यामुळंच

मी यशस्वी झालों होतों, आणि कोणतीहि गोष्ट माझ्या थोडीहि मनाविरुद्ध गेली कीं त्यांत जगाच्या क्षुद्रपणाचा आणि भावनाशून्यतेचा पडताळा मला पटत असे. आणि मग अशावेळीं मला बाळपणांतल्या कांहीं मित्रांची आठवण होई व त्यांनीं तेव्हां माझ्याविषयीं ठेवलेली निरपेक्ष स्नेहाची वृत्ति आठवून वर्तमानकाळाविषयीं व वर्तमानकाळांतल्या स्वार्थी मैत्रीविषयीं मी अधिकच जळफळूं लागे. एक नवा व्यवहार आटोपण्यासाठीं झर झर पावलें टाकतांना ज्यांच्यामुळें नुकतेच माझे दोन व्यवहार सपशेल फसले, त्यांना पावलागणिक शिव्या देत असतां जात्या-येत्यांचें मला मुळींच भान नव्हतें. बेभानपणें फुसांडत माझें मन दवळत होतें. व त्यांत सिमेंट, विटा स्वार्थ, क्षुद्रत्व, तुरीची डाळ, न पडलेली मतें, व बालपणांतील निर्व्याज मित्रभावना ह्यांचें मोठें विचित्र व विसंगत मिश्रण झालें होतें. इतक्यांत माझ्या कानावर कुणीतरी तारस्वरांत ठोकलेली हांक आदळली.

"नाना—ए नाना—थांब, थांब !"

कोण बुवा ! स्वर ओळखीचा वाटत होता आणि तरीहि ओळखीचा वाटत नव्हता. हा स्वर इतका फुटलेला नसता तर तर तो अण्णा उपाध्येचा आहे असं मीं म्हटलं असतं. मीं इकडे तिकडे पाहिलं.

" अरे मागें—मागें पहा वळून. " पुन्हां त्याच स्वरानें माझा पाटलाग केला व भर रस्त्यावर माझ्यासारख्या कंत्राटदाराला " नानाराव " किंवा "नानासाहेब " म्हणून आदरानें संबोधण्याऐवजीं एकेरी विशेषणानें लगट करणाऱ्या त्या आवाजाचा धनी माझ्यापाशीं येऊन पोंहोचला.

"ओळखलंस ? " माझा हात जोरजोरानें हलवीत त्यानें विचारलें. ह्या माणसाच्या दोन हनुवट्यांपैकीं एक वजा केली असती, आणि त्याच्या डोक्यावर दाट कुरळ्या केसांचा टोप ठेवला असता तर मीं त्याला अवश्य अण्णा उपाध्ये म्हटलं असतं. पण समोर मला जी आकृति दिसत होती तिच्याकडे पाहून मी थोडा घोटाळलों.

" ओळखलेलं दिसत नाहीं ! मोटी माणसं ! " किंचित् पडलेल्या स्वरांत तो म्हणाला. आतां मला एकदां निर्णय घेणं भाग होतं. चुटपुटत्या आठवणींचा जो एक दगड माझ्या हातांत होता तोच फेंकत मी म्हणालों,

" वारे ! तूं अण्णा उपाध्ये आहेस ! अरे, मराठी शाळेंत एका बांकावर बसलेले आपण, आणि ओळखणार नाहीं ? "

मीं त्याला खरोखरच ओळखलेलें पाहून अण्णाचा चेहरा फुलला. माझा दगड बरोबर लागल्याचें पाहून मलाहि हायसें वाटलें. आपल्या बसक्या, घोगऱ्या संथ स्वरांत अण्णा म्हणाला, " नाहीं ओळखत बाबा, नाहीं ओळखत पुष्कळशी माणसं ! तुझी गोष्ट वेगळी, पण अगदीं लंगोटीयार म्हणविणारे पुष्कळदां ओळखत नाहींत आणि पुष्कळदां ओळखच दाखवीत नाहींत लेकाचे ! " असें म्हणून अण्णा पचकन थुंकला. आतां एकदम मला खूणगांठ पटली. थोडेसे बोलून झाल्यावर पचूकन थुंकायची सवय त्याला अगदीं लहानपणीसुद्धां होती.

" न ओळखणारे नसतील ओळखत, " मी म्हणालों, " पण मला मात्र जुना मित्र भेटला कीं अगदीं ब्रह्मानंद होतो. अरे, लहानपणची मैत्री तीच खरी ! पुढचा सारा भाडोत्री कारभार ! नुसतं स्वार्थासाठीं एकानं दुसऱ्याच्या गळयांत पडायचं येवढंच ! बाकी त्यांत कांहीं अर्थ नाहीं ! जुना तांदूळ, जुनी दारू, आणि जुनी मैत्री—— Nothing like it ! "

" खरं आहे. पण ही जाणीव ठेवतो कोण लेकाचा ? पुढें पहावं तर जो तो आपल्याच गर्दीत आणि धुंदींत ! नव्या ओळखी होतात, नव्या भानगडी निघतात, मग कुठला बालमित्र आणि कुठला कोण ? बाळपणची निरपेक्ष मैत्री वगैरे सगळं थोतांड असतं, आपण तेव्हां मूर्ख असतों, असंसुद्धां पुष्कळसे पठ्ठे म्हणूं लागतात ! "

मला दुसरी खूण पटली. लहानपणापासूनच " पट्टे " हा अण्णाचा फार आवडता शब्द होता.

" मी कांहीं त्या गाढव आणि स्वार्थी लोकांपैकीं नाहीं. " मी म्हणालों; " खरं सांगूं ? आजच मला आपल्या लहानपणाच्या शाळासोबत्यांची राहून राहून आठवण येत होती. अगदीं बोला फुलाला गांठ पडली. किती वर्षांनीं भेटलास तूं आज ! "

" दहा वर्षे तरी झालीं कीं ! मागें आपण एकदां आगगाडींत भेटलों होतों, तेव्हां नुकताच मी सर्हिसला लागलों होतों. आणखी तूं पण नुकतीच धंद्याला सुरुवात केली होतीस. "

अरेचा ! माझा हा बाळमित्र मला दहा वर्षांपूर्वी गाडींत भेटला होता हेंच मुळीं मी विसरलों होतों. तेव्हां कसल्या " सर्हिस " मध्यें तो होता ह्याची अर्थातच मला कल्पना नव्हती. माझं अज्ञान न दाखवतां मी चांचपडतच म्हणालो— " बाकी तुमची लाईन मात्र मोठी गमतीदार हां "

" कसली कर्मांची गमतीदार ! " पुन्हां एकदां थुंकून अण्णा म्हणाला, " अगदीं रेल्वेरुळासारखं आमचं आयुष्य ! सारख्या धांवताहेत गाड्या उरावरून ! रात्र नाहीं—दिवस नाहीं—तुला कल्पना नाहीं यायची बाबा असिस्टंट स्टेशन—मास्तरच्या आयुष्याची ! तशांत इथें माझ्या डोक्यावर आहे एक मूर म्हणून अर्धा गोरा ! पंधराच दिवसांत पंधरा वर्षे झाल्यासारखं वाटत आहे. "

असं ? एकूण हा माझा बाळमित्र रेल्वेखात्यांत होता. आणि पंधराच दिवसांपूर्वी इथें बदलून आला होता आपला एक जुना स्नेही रेल्वेंत असणंहि काहीं वाईट नाहीं. नाहीं म्हटलं तरी माल चढवणं आहे, उतरवणं आहे, वाघिणी मिळवणं आहे, तिकीट नोंदणं आहे ! व्यवहारांत घोळलेलं माझं मन ह्या माझ्या जुन्या मैत्रीच्या नव्या उपयोगाचीं कोष्टकं आपाततः मांडूं लागलं. क्षणार्धांत तो हिशोब पूर्ण करून मी म्हणालों,

" बरं अण्णा, कुठे निघाला होतास तूं? चल, घरीं चलतोस? जरा चहा बिहा पिऊं."

" अरे!" अण्णा तोंड वासून आणि कपाळावर तर्जनी मारून म्हणाला, " बरी आठवण केलीस. मीं तुला आधींच सांगायला पाहिजे होतें."

" काय रे?"

" तुला बापू आठवतो?—बापू दांडेकर?"

" हो—हो! वा:! मला बापू आठवणार नाहीं? एकदां आपल्या घनगर मास्तरांच्या खुर्चीवर टांचण्या मीं लावून ठेवल्या, आणखी छड्या मात्र बिचाऱ्या बापूनं घेतल्या! मुळीं माझं नांव सांगितलं नाहीं बरं!"

बापू मला खरोखरच चांगला आठवत होता. त्यानीं आणि मी कितीकदां चिंचा आणि बोरं बरोबर खाल्लीं होतीं. तो तेव्हांच मोटा तगडा आणि उदार मुलगा होता.

" बापू आतां कुठें असेल असं तुला वाटतं?"

" कां बरं? वऱ्हाडांत कुठेंतरी तो मास्तर होता म्हणून ऐकलं होतं. तिथेंच कुठेंतरी तो असेल. गंमत पहा! शिपाई होऊन सैन्यांत जाण्याची लहानपणापासून त्याची इच्छा होती. आणखी शेवटीं बिचारा नुसता शाळा मास्तर झाला. त्याची अखेर भेट केव्हां झाली तेंच मुळीं मला आठवत नाहीं."

" हं!" अण्णा म्हणाला, " त्याची अखेरची भेट घ्यायचीच आतां वेळ आली आहे!"

" काय, बोलतोस काय?"

" बापू क्षयानं आजारी आहे. अगदीं पहावत नाहीं त्याच्याकडे. तिळातिळानं झिझतो आहे."

" अरे—अरे! एवढा दांडगा माणूस, आणि त्याला पसतीशींत क्षय? कुठें—आहे कुठें तो?"

६

" इथेंच आहे. वायुमान पालटायला इथल्या सुश्रुषालयांत त्याला आणून ठेवलं आहे! त्यालाच भेटायला मी जातों आहें. तूंहि चल ना. चलतोस?"

" अं—मी येऊं म्हणतोस?" मी घोंटाळलों. आतां एका घंट्यांत जाऊन मला नव्या प्लॉटचा सौदा करायचा होता. काम फार महत्त्वाचं होतं. आतां उशीर केला असता, तर हा व्यवहारसुद्धां पुन्हां माझ्याविरुद्ध गेला असता. मला तो प्लॉट भारी आवडला होता. आणखी विशेष म्हणजे पांचसात वर्षांतच त्या जागेची चौपट किंमत मला मिळाली असती. त्याच दिशेनं आमचं गांव वाढत होतं. तो डाह्याभाईसुद्धां त्या जागेसाटीं धडपडत होता. ती जागा एकदां गेली कीं गेली. क्षय म्हणजे कांहीं हृदयाचा विकार नव्हें. ह्या दुखण्यांत माणसं रेंगाळतात...

" मग काय?" अण्णानें विचारलें.

" कुठें, त्या अमर सुश्रूषालयांतच ठेवलं आहे ना त्याला?"

" तिथेंच. चल कीं! बापूला फार बरं वाटेल तुला भेटून."

" खरं रे, पण..."

" दुसरं कांहीं फार निकडीचं काम आहे?"

" होरे! पण आज संध्याकाळपर्यंत मी अवश्य त्याच्याकडे जाईन. फारच तर उद्यां."

" पण गेल्याशिवाय राहूं नको."

" वा! हें काय तूं मला सांगायला पाहिजे? बापूसारख्या बाळमित्राला मी काय भेटल्याशिवाय राहीन? आणि तेंहि तो ह्या स्थितींत असतांना?"

" बरं आहे. चलतों मी."

" आणखी हें पहा, तूं सुद्धां यायलाच पाहिजे बरं का माझ्याकडे!"

" येईन. नमस्कार." अण्णा पच्कन जातां जातां थुंकला आणि आम्हीं विरुद्ध दिशा घेऊन चालूं लागलों.

* * *

जग किती लबाड आणि स्वार्थी आहे पहा! शब्दाला तर कांहीं अर्थच उरला नाहीं. दोन सहस्र रुपयांची गोष्ट ती कोणती! शब्दापेक्षां काय पैशाचं मोल जास्त असावं! पण नाहीं—नाहींच तें! प्रामाणिकपणा, खरेपणा, आम्हीं शिकलोंच नाहीं मुळीं! सारा स्वार्थ! त्या डाह्याभाईनें दोन सहस्र रुपये जास्त दाखवले, आणखी हा दिध्या हुरळला! माझ्या चांगल्या ओळखीचा बरं! स्वत:ला माझा मित्र म्हणविणारा पण अखेर त्यानं ती जागा त्या डाह्याभाईला विकली! लागोपाठ माझ्याविरुद्ध गेलेला हा तिसरा व्यवहार! दिवसभर माझं डोकं चढलेलं होतं. जगाच्या क्षुद्रतेच्या विचारानं अंगाची लाही होत होती. बापूला भेटायला जायच्या मन:स्थितींतच मी तेव्हा नव्हतों. आजारी माणसाला भेटायला जायचं, म्हणजे माणसानं प्रसन्नपणानं जायला पाहिजे. त्रासलेल्या मनस्थितींत तिथें जाऊन काय उपयोग? छे: छे:! अण्णाशीं बोलण्यांत मीं इतका वेळ घालविला नसता, तर गोष्टी कदाचित् अशा होत्याच ना! व्हायची असली म्हणजे मित्राच्या निमित्तानें माणसाची हानी होते. त्या दिवशीं मी बापूला भेटूं शकलों नाहीं. दुसऱ्या दिवशींहि तें शक्य झालं नाहीं. कांहीं नव्हे तर आमचे सासरेच त्या दिवशीं घरीं येऊन उपटले. आणखी आमच्या बायकोची लग्नाची बहीण. आणखी तिचा लग्नाचा भाऊ. मुलगी लग्नाऊ मुलांना दाखविण्यांत आणि लग्नाऊ मुली मुलाला दाखविण्यांत चांगले दोन दिवस मोडले. माझ्या स्वत:च्या लग्नांत माझ्या सासऱ्याला झाली नसेल इतकी दगदग माझ्या सासऱ्याच्या मुक्कामांत मला झाली. सारखी धांवपळ आणि धडपड! पण करतां काय! प्रत्यक्ष बायकोचा बाप आणि त्यांत श्रीमंत. प्रसंग आला तर दहापांच सहस्र रुपये एका रकमेंत देऊं शकणारा! आणखी आम्हांल

तर पैशाची आवश्यकता केव्हां आणि कशी लागेल ह्याचा नियमच नसतो! तेव्हां सासऱ्याची आबाळ करुन कसं भागतं! बापूची आठवण मधुनच होत होती. वाटत होतं कीं अरेरे, आपण इकडे दुसऱ्याची लग्न जमवतों आहोंत आणि तो बिचारा तिकडे मरणाच्या दारीं पडला आहे. आपण इकडे गोडधोड करून खातो आहोंत, आणि तिकडे त्या बिचाऱ्याचं अन्न त्यांचं शत्रू झालं आहे! ज्यानं घरीं आईनं दिलेल्या खारकेंतली अर्धी खारीक खिशांत घालून नेहमीं माझ्यासाठीं आणली, त्या माझ्या बाळमित्रावर असा प्रसंग यावा अं! माझी चलती सुरु झाल्याचं ऐकुन वाटेल त्या सोम्यागोम्यानं जुन्या ओळखी उकरुन काढून माझ्याकडे पैशाची याचना केली. पण छे! बापूकडून तें कधीं घडलं नाहीं. मागणं हा बापूचा स्वभावच नव्हता. देणं हाच त्याचा धर्म! निरपेक्ष माणूस—निरपेक्ष मित्र! आतां असे मित्र कुठून सांपडायला?

दोन दिवसं कामाच्या ऐन धामधुमींतसुद्धां मला मधूनच बापूची आठवण झाल्याविना राहिली नाहीं. सासरा गेल्यावर बरीचशी फळफळावळ घेऊन नक्कीच मी बापूला भेटायला जाणार होतों. पण आम्हीं दैवाचे सिकंदर! जायच्या आधीं आम्हांला कांहीं अहेर देण्याऐवजीं आमचे सासरेच आमच्याकडून हातउसने दोन सहस्र रुपये घेऊन गेले! म्हणे त्याना मुलाच्या लग्नासाठीं कांहीं कापड–चोपड घ्यायचं होतं! जसं कांहीं दोन पैशाचं पत्र पाठवून हें काम झालंच नसतं! म्हणे तुमच्या गांवाला कापड चांगलं मिळतं. हो—कापडहि मिळतं आणि पैसेहि मिळतात! मग कोण कशाला सोडील. सासरा असो कीं बाप असो. निघेल तेवढा advantage घ्यायची वृत्ति! पुन्हां पैसे परत मागायची सोय नाहीं. सासरा पडला ना! त्या पैशांवरुन चार दिवस आयकोशीं कडाक्याचं भांडण चाललं होतं. तीच ह्या आपत्तीचं मूळ होती. मी तिला तसं म्हटलं तेव्हां ती उलटून मला म्हणते काय कीं तुम्हींच स्वार्थी, अप्पलपोटे आहांत! हा जगाचा न्याय. माझे पैसे जाऊन वर मी आप्पलपोटा. पैसे देऊन वर पुन्हा श्रेय

नाहीं तें नाहींच! चार दिवस मी तिला बोललों, आणि पुढचे चार दिवस तिनं मला बोलून खाल्लं. परिणाम काय, कीं माथं अगदीं भडकून गेलं. बापूचा विचार करायला मला सवडच दिली नाहीं त्या वाटिकेनं.

आठदहा दिवसांनीं बरोबर त्याच मार्गावर अण्णाची हांक पुन्हां माझ्या कानावर पडली. मी थबकलों. अण्णा झपाझप्यानं माझ्यापाशीं चालत आला आणि काकुळतीच्या स्वरांत मला म्हणाला,

"नाना अरे बापू आठवण करतो आहे तुझी."

"काय सांगूं अण्णा तुला? कांहींच बोलत नाहीं झालं. काय म्हणत होता बापू?"

"म्हणत होता कीं अण्णा, नानाला बोलावून आण. त्याला आठवण आहे कीं नाहीं माझी? आम्हीं लहानपणीं बरोबर चिंचा बोरं खाल्लीं आहेत. बरोबर विहिरींत उड्या मारल्या आहेत. एकाच बाकावर बसून मास्तरांच्या खोड्या केल्या आहेत. आतां मी पुन्हां पायावर उभा राहणं तर कठीणच दिसतं. पण नाना मला भेटला, तर पुन्हां ते उड्या मारण्याचे आणि धष्टपुष्ट प्रकृतीचे दिवस थोडावेळ तरी परत आल्यासारखे मला वाटतील! त्याच्यापाशीं थोडावेळ जुन्या गोष्टी बोललों, तर मला वाटेल, नेहमींच कांहीं मी असा दुखणेकरी नव्हतों. मीहि पूर्वी चार चौघांसारखाच होतों. अगदींच विसरला कारे अण्णा मला नाना?"

"नाहीं अण्णा, मी बापूला मुळींच विसरलों नाहीं! सांग तूं त्याला!" मी ओरडलों.

"मी त्याला सांगितलं कीं नानाला तुझी चांगली आठवण आहे. तूं प्रथम भेटलास त्याच दिवशीं सांगितलं. इतका त्याचा चेहरा फुलून आला एकदम, आणखी तो सारखा तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसलाय."

"असं अं!"

"तेवढाच त्याला आतां विरंगुळा आहे. त्याला तर कांहीं आतां उठून बाहेर जातां येत नाहीं. पण त्याच्याकडे जो कुणी येईल त्यामुळेंच

त्याचा जगाशीं संबंध. आणखी जुना मित्र कुणी भेटायला आला, म्हणजे तर त्याला लहानपण पुन्हां परत आल्यासारखं वाटतं. पडून पडून त्याचा जीव अगदीं आंबून गेला आहे. चांगले कपडे करून टवटवीत प्रकृतीचा कुणी माणूस त्याच्याशीं बोलूं लागला म्हणजे त्याला वाटतं कीं आपणच चांगले कपडे केले आहेत, आणि आपलीच प्रकृति टवटवीत आहे."

"बिचारा!"

"बारीक तापाची चढउतार सोसत सारखं एका बिछान्यावर पडून रहाणं आणि आंतडी ओरबाडणाऱ्या खोकल्याची ठसक सोसणं म्हणजे सोपं काम नाहीं."

"खरोखरच नाहीं."

"अशा वेळीं चार माणसं त्याच्याशीं बोलून गेलीं म्हणजे त्यालाहि वाटतं कीं आहे, जगाला आपली आठवण आहे. तेवढाच लोभ उत्पन्न होतो. तितकंच मन फुलतं, गुंगुन राहतं. तेवढीच जगाशीं त्याची गांठ बळकट होते. मी त्याला प्रथम भेटलों तेव्हांच त्याला काय ब्रह्मानंद झाला. त्याची बायको म्हणालीसुद्धां, कीं इथें आल्यापासून हे इतके चांगले कधींच दिसले नव्हते म्हणून."

"त्याची बायकोहि इथें आहे का!"

"कुठें असेल मग? अशी अंगापिंडानं सणसणीत पोरगी आहे म्हणतोस! अगदीं बापूला शोभत असेल. आणिक रूपवानसुद्धां इतकी चांगली आहे! तो हाडाकातडयांचा सांगाडा झालेला बापू आणखी ती प्रकृतीनं रसरसलेली पोर पाहिली, कीं आंतडं पिळवटून जातं नुसतं."

"काय दुर्दैव आहे!"

"बापू पुष्कळदां गमतीनं तिला म्हणतोसुद्धां, कीं तुझ्यासारखी सणसणीत बायको जवळ असतांना मला हात लावायची यमदूतांची काय प्राज्ञा आहे म्हणून. तो म्हणतो कीं सावित्रीनं यमाची करुणा भाकली असेल पण तूं यमाच्या मुस्कुटांत मार, तरच माझी बायको शोभशील!"

" ye Gods ! काय बरं वाटत असेल त्या पोरीला ? "

" काय सांगावं काय वाटत असेल तें ! त्याच्यासमोर रडायचं नाहीं म्हणून ती धांवत धावत बाथरुममध्यें जाते आणि मनसोक्त रडून परत येते. जन्माचंच होणार आहे तें आतां तिच्या ! "

" अरेरे ! दुसरं कुणी पुरुष माणूस नाहीं का तिथं ? "

" आहे ना, त्या पोरीचा बाप आहे. तो आहे म्हणून तर सारी ठाकुरकी आहे. नाहींतर हा औषधापाण्याचा राक्षसी खर्च कुणी केला असता ? पण म्हातारं माणूस आहे, मनांतून खचून गेला आहे, त्याच्या-च्यानी नाही उठबस होत आतां. म्हणून तर मी जात असतों दर दिवशीं ! "

" तूं रोज जातोस ? "

" अगदी नियमानं. रात्रपाळी असेल तेव्हां दिवसा जातों, दिवस-पाळी असेल तेव्हां रात्रीं जातों. आपण गरीब माणसं नाना. शरीरकष्ट आपल्याकडून होतील तेवढे करावे. त्याचा भोग तर कांहीं कुणाला घेतां येत नाहीं."

" खरं आहे." थोडा अस्वस्थ होऊन मी म्हणालों; " कुठें तिकडेच निघाला आहेस ना तूं ? घाईत असशील ! "

" घाईत तूं दिसतो आहेस. " पच्‌कन थुंकून थोड्या रुष्ट स्वरांत तो म्हणाला; " चल ना माझ्याबरोबर बापूकडे. इतके दिवस तूं एकदांहि तिकडे फिरकला नाहींस, तो तुझी रोज आठवण करतो आहे. तो अखेर काय म्हणाला माहीत आहे ? "

" काय ? "

तो म्हणाला, " अण्णा नाना अजून आला नाहीं. तेव्हां तोच तर आजारी बिजारी नाहीं ना रे ? एरवीं तो असं करायचा नाहीं ! जरा त्याला, पाहून येतोस का ? "

मी आवंढा गिळला. माझ्या मर्मावर कुठेतरी पट्कन बोट ठेवलं गेलं. काय बरं वाटलं मला? लाज? दुःख? पश्चात्ताप? मला कांहींहि वाटलं असलं तरी चिडक्या स्वरांत मी म्हणालों,

"अण्णा, तरीहि तूं मला पहायला आला नाहींस?"

"वा पठ्ठे! खूप!" अण्णा थुंकून घोगऱ्या आवाजांत म्हणाला.

"खूप काय? आजारी पडूंच शकलों नसतों असं थोडंच आहे?"

"तूं मरूंसुद्धां शकला असतास!" तो म्हणाला, "पण तुला कांहीं-सुद्धां धाड भरलेली नाहीं असं मला वाटलं."

"पण कां?" तेरीमेरीच्या पवित्र्यांत मीं विचारलें, माझी ही विचित्र प्रतिक्रिया अण्णाला मोठी चमत्कारिक आणि अप्रिय वाटली असली पाहिजे. डोळे किलकिले करून थोडक्यांत आटोपण्यासाठीं तो म्हणाला, "तें कांहीं मला सांगतां येत नाहीं. पण मला वाटलं तें बरोबर होतं हें उघडच दिसत आहे." नंतर पुन्हां विनवणीच्या स्वरांत तो म्हणाला. "मग चल ना नाना. चलतोस ना?"

"आलों असतों रे, पण—"

"पण काय?"

"उद्यां येतों बघ. निश्चित!"

"आठदहा दिवस झाले तूं हेंच म्हणतो आहेस. पण आत्तां कां येत नाहींस?"

"कसं सांगूं तुला? सुखासुखी कां मी नाहीं म्हणीन?"

"अगदीं फार खाजगी कारण आहे?"

आतां ह्या अण्णाला मी माझ्या नकाराचं कारण तरी कसं सांगूं. त्याला असं सांगूं, कीं "सर्टनटी इण्डस्ट्रीअल बँक" दिवाळं काढण्याच्या बेतांत असल्याची गुप्त वार्ता मला नुकतीच कळली होती म्हणून? त्याला असं सांगूं कीं तिथे आमचे पांच सहस्र रुपये गुंतून पडले आहेत?

असं सांगूं, कीं ते वांचण्याची खटपट करायची असली तर ती आजच करणं शक्य होतं, आणि तशी खटपट करणं ही मी प्रथम महत्त्वाची गोष्ट मानत होतों म्हणून? ह्यांपैकीं कांहींच अण्णाला सांगण्याचा धीर मला झाला नाहीं. मी म्हणालों,

" असंच म्हणायला प्रत्यवाय नाहीं! "

" बरं आहे. चलतों तर मी. आणखी हें पहा, For Heavens sake निदान उद्यां तरी ये. अरे भारी वाट पहातो आहे रे तो तुझी. "

आणि आम्हीं पुन्हां वेगळ्या दिशा घेऊन चालूं लागलों.

* * *

पुन्हां व्हायचं तेंच झालं! " सर्टनटी इन्डस्ट्रीयलच्या " व्यवहारांत आम्हीं साफ चीत पडलों. जी गुप्त वार्ता आम्हांला कळली ती तितक्याच गुप्तपणें आणखी शेकडों लोकांना कळलेली असल्यामुळें बँकेच्या दाराशीं त्यांनीं एकच गर्दी केली. वटवडा तात्काळ थांबला. पुढें जें काय कायद्याप्रमाणें व्हायचं तें होत राहिलं, पण तूर्त तरी आमचे पांच सहस्र खड्डयांत गेले. श्वशूर महाशयांनीं दोन सहस्र नेलेच होते. विश्वविद्यालयाच्या निवडणुकींत आम्हीं " फेल " झालों असलों तरी दक्षिणा जायची ती गेलीच होती. हानीवर हानी! घावावर घाव! डोकं अगदीं फिरून जायची वेळ आली. पांचदहा सहस्र गेल्यामुळें कांहीं माझी चूल थंडावणार नव्हती. पण हा पायंडा वाईट. तीन पैंच्या पावणेतीन पै करणं हा माझा शिरस्ता नव्हता. त्या मार्गानं मीं यश मिळवलेलं नव्हतं. तीन पैंच्या सहा पै करणं हा माझा खटाटोप होता. तो माझा आनंद होता. त्याच उद्योगाला क्षणाची उसंत न घेतां नेटानं लागणं मला अवश्य होतं. आतां दुसऱ्या विचाराला सवडच नव्हती. गर्दींत आणि घाईत असतांनाच पुन्हा मला अण्णा भेटला. आतां तो समोरूनच येत होता. पाल पहाणाऱ्या विंचवाप्रमाणें मी जागींच खिळून उभा राहिलों.

" अण्णा, क्षमा कर बुवा ! " मींच प्रारंभ केला.

" क्षमा कशाची अन् काय कशाचं ! " उपरोधाच्या स्वरांत अण्णा म्हणाला; " तुम्हीं मोठीं, कामाचीं माणसं ! "

" तसं नाहीं रे ! आतां नाराज होऊं नकोस ! "

" मी कशाला नाराज होऊं ? आपलं काम करावं. मी आपली दहा दिवसांची सुट्टी काढून आपला तिथेंच बहुतेक राहतों. "

" बापूकडे ? "

" नाहींतर आणखी कुठें ? " तो थुंकला.

" कसा आहे बापू ? "

" क्षयाचे रोगी असतात तसाच ! चालला आहे झपाट्यानं पाताळांत. रडते आहे त्याची बायको ! लवकर सुटेल तर बरं होईल ! "

" असं बोलूं नये. "

" माझ्या बोलण्यानं काय होतंय ? होणार असतं तर मीं त्याला अमरपट्टा दिला असता. "

" काय म्हणतो बापू ? माझी आठवण करत होता का ? "

" रोजच करतो. त्यांत नवीन काय आहे ? "

" पण काय म्हणत होता तें तर सांगशील ? "

" त्याला शोभेल असंच कांहींतरी म्हणत होता. "

" पण काय ? " अण्णाचा तेढा रंग तर मला दिसतच होता; पण बापू माझ्याविषयीं काय बोलतो तें ऐकायला मी फार उत्सुक होतों.

" म्हणत होता कीं अण्णा, तूं उगीच नानावर रागावूं नकोस. त्याला खरोखरच फार कामं असतील. मी एक आंथरुणाला खिळलेला आहें तसा कांहीं तो नाहीं. त्याला अजून जगायचं आहे. जगण्यासाठीं जें कांहीं करावं लागतं तें करायचं आहे. साहजिकच माणसं मरणाऱ्यांचा विचार जास्त निकडीनं करतात. मला कांहीं काम ना धंदा. म्हणून उगाच आपलं मला वाटतं कीं त्यानींही माझ्याकडे येऊन बसावं. "

" असं म्हणाला तो ? "

" असं म्हणाला. आणखी म्हणाला कीं, नाना आतां कसा दिसतो तेवढंच एकदां मला पहायचं आहे. पुन्हां एकदां पोटभर लहानपणाच्या गोष्टी त्याच्याशीं बोलायच्या आहेत. पुन्हां एकदां चिंचेच्या झाडावर चढायचं आहे, विहिरींत उड्या मारायच्या आहेत. बोल, चलतोस का आज तरी त्याला भेटायला? पण तुला बहुतेक काम असेल. खाजगी आणि निकडीचं."

माझ्या मनाची ओढाताण झाली. गहूं बाजारांतून केव्हां गडप होईल त्याचा अगदीं नियम राहिला नव्हता. आज मिळणार होता. तोच खरा. तो सौदा मला अगदीं आजच पुरा करायला हवा होता. पोटाचाच प्रश्न होता, तेव्हां तिथें चालढकलीला जागाच नव्हती. मान खाली घालून मी म्हणालों,

" हें पहा अण्णा—"

" समजलों. उद्यां तूं नक्की येणार. अच्छा, नमस्ते!" एकदां थुंकून अण्णा झपाझप चालूं लागला व त्याच्याकडे पहात मीं उद्यां बापूकडे वाटेल तें करून जाण्याचा निश्चय केला. पण तें शक्य झालं नाहीं. दुसऱ्याच दिवशीं सासरा आजारी असल्याची तार आली. जरा कुठं पडसं खोकला झाला कीं तारा ठोकायची म्हाताऱ्याला संवयच होती. पण करणार काय, प्रसंग बायकोशीं होता. तिथें गेलों तर कदाचित् आपले दोन सहस्र रुपये परत मिळतील ही चोरटी आशाहि मनांत दबा धरून होती. पण ती फळाला आली नाहीं. उगीच आणखी चारसहा दिवस वांया गेले आणि जाण्यायेण्यासाठीं शेंदोनशें रुपयांचा भुर्दंड पडला. आणि हें कशापायीं, तर आमच्या श्वशुरांच्या मूल्यवान शिका ऐकण्यासाठीं आम्हीं अडीचतीनशें मैलांचा प्रवास आणि शेंदोनशें रुपयांचा व्यय केला, पण गांवांतल्यागांवांत बापूकडे मात्र जाऊन आलों नाहीं. ही गोष्ट मला खटकली आणि परत येतांच त्याला भेटायचा मीं निश्चय केला. पण तें कुठलं जमायला? नेमकी त्याच दिवशीं मला रवर किन्नरी रंभादेवीची

तार आली कीं, त्यांनीं माझें निमंत्रण स्वीकारलं असून आजच त्या येऊन पोहोंचत आहेत. आतां इथं कांहीं उपायच नव्हता! माझ्याच हातानें ही अलाबला मी माझ्यावर ओढवून घेतली होती. रंभादेवी ह्या अखिल भारतीय कीर्तीच्या गायिका असून जागतिक कीर्तीच्या नर्तिका होत्या. त्यांच्यामुळें जगांत भारतवर्षाचें व भारतीय नृत्यकलेचें नांव उज्ज्वल झालेलें होतें. त्यांच्या नृत्यगायनाच्या कार्यक्रमाची गंगा आमच्या भिकार गांवीं आणणें आजवर मुरलेल्या धंदेवाईकासहि शक्य झालें नव्हतें. अनेक खटपटी करून तें मीं केलें. शेलक्या मंडळीसाठीं केवळ माझ्या दिवाणखाण्यांत एक कार्यक्रम देऊन त्या परत जाणार होत्या. ह्या कार्यक्रमाच्या निमित्तानें एका निवडक वर्तुळांत मला प्रवेश मिळवायाचा होता. व त्या ओळखीच्या बळावर कांहीं नाजुक कामें पार पाडायचीं होतीं. तेव्हां बापूकडे जाण्याऐवजीं मिस् रंभादेवीच्या स्वागतासाठीं हारतुऱ्यासकट ठाण्यावर उपस्थित होणें व नंतर सतत त्यांच्या दिमतीला राहणें हें माझें आद्य कर्तव्य ठरत होतें. रंभादेवीसाठीं मी जो पैसा मोकळ्या मुठीनें खर्च करणार होतों, त्याचा पुरेपूर लाभ न घेणें शहाणपणाचें झालें नसतें. आणि अत्यंत चोख अशा शहपणाचा अभाव, हा माझा व्यवहारी तरी दोष कधींच नव्हता. रंभादेवींच्या आगमनामुळें जेथें आमचें सारें गांवच बेभान झालें तेथें माझी काय कथा? रंभादेवीचें भाषण—रंभादेवीचें प्रसाधन—रंभादेवीचा पोषाख—रंभादेवीचा आहार—रंभादेवीचा विहार—रंभादेवी—रंभादेवी—नानारावांच्या येथें रंभादेवी! बस्स! जनांत किंवा माझ्या मनांतहि तूर्त दुसरी गोष्ट नव्हती. आणि अत्याग्रहापोटीं शेलक्यांतल्याहि निवडक मंडळीसाठीं दुसऱ्या दिवशीं पुन्हां कार्यक्रम सुरू झाला. बाटल्या उघडल्या गेल्या, हास्यविनोदाला पूर चढला, बैठक रंगूं लागली, झिंगूं लागली, तोंच माझ्या हातांत खालून अण्णाच्या आगमनाची चिठ्ठी येऊन पडली. कसातरीच मी खालीं गेलों व पडवींत अस्वस्थपणें फेऱ्या घालणाऱ्या अण्णाला विचारलें,

" काय रे अण्णा, बापू बरा आहे ना?"

" बरा नाहीं!"

" म्हणजे, आजची रात्र..."

" आजची रात्र निभावेल. पण आतां बापूच्या नांवावर फारशा रात्री शिल्लक नाहींत."

" डॉक्टर काय म्हणतात?"

" हेंच म्हणतात. नाना, बापूनं तुझी आज पुष्कळदां आठवण काढली."

" काय म्हणत होता रे तो?"

" म्हणत होता, कीं नानाला एकदांतरी घेऊन ये. त्याला सांग कीं मी त्याचा फार वेळ घेणार नाहीं. मला माहीत आहे, कीं त्याचा वेळ मूल्यवान आहे. पण त्याला सांग कीं, आतां माझासुद्धां एक एक दिवस मोलाचा आहे म्हणून. आणखी येवढं म्हणून बापू हंसला आणि त्याचं तें हंसणं ऐकून त्याची बायको ओक्साबोक्शी रडूं लागली. त्याचं तें हंसणं आणि तिचं तें रडणं ह्यांत कोणतं जास्त भयंकर तें मला कळत नाहीं."

" राम-राम!"

" तुझ्याकडे आत्तां त्या रंभाचा कार्यक्रम चालू आहे ना नाना? नाच–गाणं, हसणं–खिदळणं, अत्तर गुलाब! एकापेक्षां एक झोकदार मंडळी नुसती रंगात आली असतील नाहीं?"

" आहेत झालं!"

" आणखी मी आत्तां काय पाहून आलों माहीत आहे? एक गुढग्यांत मान घालून छाती फुटेपर्यंत रडणारी बायको. एक डगडगणाऱ्या मानेनें आणि मिचकावणाऱ्या डोळ्यांनीं हताशपणें रामनाम जपणारा म्हातारा. एक हाडाचा सांपळा राहिलेला, लुकलुकणाऱ्या डोळ्यांचा प्राणांतिक खोकणारा तरुण माणूस! तिकडे हळुहळू मरणाची हडकुळीं पावलं

पडताहेत, आणि इकडे एका गुबगुबीत नाचणारणीची! ( God, it is terrible! " )

त्याचं बोलणं मला सहन होईना. वास्तविक मी रडायला पाहिजे होतं. पण मला रडायला तोंड नव्हतं म्हणून मी चिडलों.

" अण्णा! " मी थोड्या आवेशानें म्हणालों, " मी जरुर उद्यां बापूला भेटायला येईन! "

उद्यां–पुन्हां उद्यां! आत्तां कां नाहीं? मी तुला आत्तां न्यायला आलों होतों! "

" अण्णा, Don't you see I am just a bit tight! स्पष्टच सांगतों, मी बरीचशी व्हिस्की घेतलेली आहे.

" तें माझ्या केव्हांच लक्षांत आलं होत! "

" मग तूंच सांग, अशा स्थितींत मी एका सभ्य हिंदू बाईसमोर एका वयस्क म्हाताऱ्यासमोर, एका आजाऱ्याच्या भेटीला कसा येऊं? "

" जरुर ये. मुळीच न येण्यापेक्षां असंहि आलेलं बरं. तूं व्हिस्की प्याला आहेस का पाणी प्याला आहेस तिकडे लक्ष देण्याच्या मनःस्थितींत तिथे कुणीच नाहीं, खूप औषधाचा वास दरवळतो आहे तिथे! "

" तूं कांहींहि म्हण, पण मला कांहीं आतां तिथें येणं प्रशस्त नाहीं वाटत! "

" पाहुण्यांना सोडून येणं प्रशस्त नाहीं वाटत कीं दारु पिऊन येणं प्रशस्त नाहीं वाटत? "

" माझ्यावर विश्वासच नसेल, तर वाटेल तें समज " मी फुरंगटून म्हणालों. हाहि घाव माझ्या वर्मी बसला होता. " मात्र मी उद्यां येईन हें नक्की. "

कांहीं क्षण अण्णा माझ्याकडे नुसता पहातच राहिला. आणि मग तो पायऱ्या उतरत म्हणाला. " ठीक आहे. Please yourself. It is no

use wishing you a very good night because you are already having one' "

* * *

आतां ह्या प्रकाराला म्हणावं तरी काय ? मिस् रंभाला निरोप देऊन मी बापूकडे जाण्याचा विचार करतों तों वेगळंच ताट माझ्यासमोर वाढून आलं. पोलिसशी प्रसंग–अँण्टी करप्शन खात्याशीं प्रसंग आणि वकीलाशी डोकेफोड ! विनापरवाना सांठवलेल्या सिमेंटनं जवळजवळ माझी समाधि बांधली जायचीच नौबत येऊन ठेपली होती. पुढचे आठ दिवस सिमेंट, रुपये, पोलिस, वकिल, ह्याविना माझ्या डोक्यांत कांहींच नव्हतं. ह्या गोष्टी केवळ मीच करत होतों असं नाहीं, सारं जग करत होतं. केवळ पकडलं जाणं हेंच खरं पाप होतं. आणि अशा प्रसंगीं पदरचा पैसा जशी साथ करतो तसं दुसरं कुणीच करत नाहीं. मी एखादं व्रत पाळावं तसा पैसा वाचवला होता आणि ह्या वेळीं पैशानं मला हातोहात वाचवून आपलं व्रत पाळलं. पण ह्या भानगडात पक्के पंधरा दिवस गेले, क्षणाची उसंत मला मिळाली असेल तर शपथ खाहे.

आणि त्यानंतर सुटकेचा श्वास टाकून असाच मी मार्गानें जातं असतां समोरूनच मला अण्णा येताना दिसला. त्यानं माझ्याकडे पाहिलं असूनहि न पाहिल्यासारखं केलं आणि मान फिरवून तो चालूं लागला. अण्णाला पहातां क्षणींच मी दचकलों, मला बापूच्या आजाराची आठवण झाली. आणि ओरडून मी म्हणालों,

" अण्णा ! "

त्यानं ऐकून न ऐकल्यासारखं केलं, आतां मीच त्याच्यापाशीं गेलों आणि त्याला म्हणालों—

" अण्णा, बापू कसा आहे रे ? "

" फार छान आहे. " आपल्या बसक्या घोगऱ्या आवाजांत तो म्हणाला. त्याच्या चेहऱ्याची फार चमत्कारीक चाळवाचाळव झाली. माझ्याशी बोलायला तो उत्सुक दिसला नाहीं.

" म्हणजे त्याचा त्रास कमी आहे म्हणतोस ? "

" त्याचा त्रास अजिबात संपला. "

" केव्हांपासून ? "

" झाले दहाबारा दिवस. "

" चला, आपण त्याच्याकडे जाऊं. "

" कुठे परलोकांत ? "

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? बापू मेला. टार झाला. त्याची राखसुद्धां आतां शिल्लक नाहीं. त्याची बायको रंडकी झाली. तिचं कुंकू पुसलं. बांगड्या फुटल्या. सारं झालं. अच्छा. जातों मी; जरा घाई आहे. " बापू पचापच थुंकला. त्याचा स्वर एकापरीनं शांत, निर्विकार, तर दुसऱ्या परीनं अतिशय भयंकर होता. मला असं वाटत होतं कीं, माझ्या काळजाचे टोके चुकत आहेत.

" अरे जरा थांब, मला सांगशील तर सारं ? " मी काकुळतीनं म्हणालों. अण्णानें थंड, गारगोटीसारख्या डोळ्यांनीं मला एकदां आपादमस्तक न्याहाळलें. मी खरोखरच माणूस आहे किंवा नाहीं याविषयी जणूं तो निश्चिती करून घेत होता. नंतर तो त्याच तटस्थ, थंड स्वरांत म्हणाला,

" सॉरी ! मला सध्या वेळ नाही ! " अण्णा पुन्हा थुंकला आणि मला न जुमानतां चालता झाला. मला असं वाटलं कीं जातां जातां जणूं तो माझ्याच अंगावर थुंकला. त्यांनं खरोखरच तसं केलं असतं तरी त्याचे माझ्यावर उपकार झाले असते. माझ्या हातून जें कांहीं घडलं, त्याचा शतांशानं तरी प्रायश्चित्त मिळाल्यासारखं मला वाटलं असतं. एखाद्या

गोरानें भयचकित दृष्टीनं एखाद्या खोल, फार खोल, आणि अतिशय भयाण विहिरींत डोकावून पहावं, तसा मी घटनांच्या विहिरींत डोकावून पाहूं लागलों. मला घेरी आल्यामारखं झालं, माझं काळीज कांपून उठलं. दुसरं कांहीं नाहीं. एक आजारीमाणूस, एक बाळमित्र नुसत्या माझ्या भेटीची इच्छा करत होता. मी कांहीं कुणी देवदूत नव्हतों कीं संत नव्हतों. तरी माझ्या भेटीसाठीं तो तळमळत होता. माझ्या भेटीमुळें त्याला आनंद होणार होता. पण नाही. मला वेळच झाला नव्हता. एक दिवस नाहीं, एक तास नाहीं. दहा मिनिटें सुद्धां नाहींत. गेल्या कित्येक आठवड्यांत माझ्या मरत्या बाळमित्रासाठीं, निदान त्याच्यावर एक दृष्टी टाकून येण्यासाठीं मला दहापांच मिनिटें कांहीं सांपडलीं नव्हतीं. इतर सारे व्यवहार मी आटोपतच होतों. त्यात कुठें चूक करण्याची माझी प्राज्ञा नव्हती. पोलिसची मनधरणी, वकिलाशीं खलबत. एवढंच नव्हे तर मिस् रमासारख्या नर्तिकेचें मनविनोदन ह्या साऱ्यासाठीं मला वेळ मिळाला होता. ते सारेच मी अटळ अपरिहार्य आणि निकडीचे मानत होतों. जी टाळल्यामुळें माझी हानी होणार नव्हती अशी एकच गोष्ट होती! तिच्याकडे कटाक्षानें लक्ष देण्याची आवश्यकता मला वाटली नाहीं, अशी एकच गोष्ट होती. जी चुकल्यामुळें मला कोणतेंच प्रायश्चित्त मिळणार नव्हतें. अशी एकच गोष्ट होती. एक मरत्या माणसाची भेट! आधून चालूनच तो मरुं घातलेला माणूस होता. जिवंत असता तरी एक गरीब शिक्षक माझें काय करूं शकत होता! माझ्या धडपडीच्या महत्त्वाकांक्षी गरजत्या आयुष्यांत त्याला मोजण्यासारखं स्थान होतेंच कुठें? ज्याच्यासाठीं मी अगत्यपूर्वक वेळ काढावा अशी पोलिस, वकिल व एक सुंदर नृत्यांगना हीं माणसें होतीं! एका गरीब शिक्षकाविषयीं मी कशाला उगीच स्वतःला निकड लावून घेणार! आणि तो शिक्षकहि आयुष्यांतून बाद होण्याच्या बेतांत असलेला. संघर्षाच्या चढाओढीच्या आणि स्वार्थाच्या निर्दय क्रीडेत ज्यास अगदीं नगण्य मानल्यानेंहि मुळीं कांहीं बिघडत नाही असा! ज्यांच्या शिव्यांनीं किंवा

ओठ्यांनीं, आनंदानें किंवा दुःखानें, माझा प्रत्यक्ष हानी लाभ कांहींच होण्यासारखा नव्हता असा! केवळ एक मरूं घातलेला माणूस! त्याच्यासाठीं व्यक्तित होणाऱ्या वेळावर कोणतेंच व्याज सुटण्यासारखें नव्हतें. ज्याच्याकडून कसलीहि अपेक्षा ठेवणें शक्य नाहीं, व ज्याची उपेक्षा केल्यास कसलेंहि शासन नाहीं, अशानाहि साथ देणाऱ्या अण्णासारख्या माणसांची जातच वेगळी असली पाहिजे. त्याची जीवनाकडे पाहण्याची दृष्टि वेगळी, मरणाकडे पाहण्याची दृष्टि वेगळी. माणसांच्या त्या जातींत मी पडत नव्हतों. मग मी माणसांच्या कोणत्या जातींत पडत होतों? मी माणसाच्या जातींत तरी पडत होतों काय?

माझें मन एका विचित्र तऱ्हेनें दुखत होतें. एखाद्या वाचा आणि भान गेलेल्या रुग्णाला आपली पीडा शब्दांनी सांगतां येऊं नये, पण त्यास विलक्षण पीडा होत रहावी तसें मला झालें होतें. भयंकर–भयंकर गोष्ट झाली होती! माझ्या हातून हत्या, रक्तपात, ह्यापैकीं कांहींहि घडलें नव्हतें, पण माझ्या वृत्तीची अमानुषता मात्र त्याच प्रतीची होती. एक तरुण माणूस माझी आठवण काढत मृत्यूच्या जबड्यांत सावकाश चघळला जात असतां एखाद्या हृदयशून्य यंत्राप्रमाणें मी माझ्या दैनंदिन आयुष्याच्या फेऱ्यांतच गरगरत होतों. बापूच्या मधूनच येणाऱ्या आठवणीत, मैत्रीच्या कल्पनेंत, ते यंत्र कांहीं काळहि रोखून धरण्याची शक्ति नव्हती. कोणाचा मित्र होण्याची शक्ति माझ्यात नव्हती. क्षणभरहि स्वार्थ विसरण्याची शक्ति माझ्यात नव्हती. मला भरडत रहाणाऱ्या ह्या पैशाचिक यंत्रानें माझ्यांतील साऱ्या कोमलतेचा, साऱ्या माणुसकीचा, साऱ्या परमार्थ भावनेचा चक्काचूर केला होता.

ह्यानंतर सर्व कांहीं होऊं शकेल, पण बापू कांहीं मला कधींहि भेटूं शकणार नाहीं. पंधरा दिवसापूर्वी, तें शक्य होतें, पण आतां तें शक्य नाहीं. तो काय बोलणार होता, त्याला काय वाटत होतें, त्याला काय सांगायचें होतें, व काय ऐकायचें होतें, हें मला कधींहि कळणार नाहीं. जो अगदीं हातालगत

होता, तो आतां शोधूनहि कधीं सांपडणार नाहीं. त्याची एक इच्छा पूर्ण करणें मला शक्य होतें, पण जिवाचा आकांत केला, तरी आतां ती मला पूर्ण करतां येणार नाहीं. मला त्याची क्षमा मागतां येणार नाहीं, त्याच्यापाशीं अनुताप व्यक्त करतां येणार नाहीं. त्याला नुसतें पाहतांहि येणार नाहीं. मृत्यूइतकी गंभीर, अर्थपूर्ण व सर्वव्यापी घटना बापूच्या आयुष्यावर आपला फांस टाकत असतांहि मी माझ्या दैनंदिनी जीवनाच्या उकीरड्यावर एखाद्या कोंबड्या-सारखा फडफडून नाचत बसलों होतों. विचारी सुसंस्कृत माणसाला शोभेल अशा कोमलतेचा वा गांभीर्याचा अंतर्मुख करणारा चटका मला कधीं एकदाहि लागला नाहीं. आणि आतां तो गेला. अगदी कायमचा गेला. अरेरे !

न कळतच माझा मोहोरा वळवून मी घरापर्यंत येऊन ठेपलों होतों. कित्येक वर्षांनीं आज प्रथमच मी स्वतःविषयीं व स्वतःच्या अमानुष कठोरतेविषयीं विचारमग्न झालों होतों. एरवीं जगाची स्वार्थपरायण दुष्टता, हाच आजवर माझा एकमेव मस्तकशूळ होता. यांत्रिकपणें मी घरांत गेलों, यांत्रिकपणेंच मीं कपडे काढले. तितक्यांत फुललेल्या चेहेऱ्यानें समोर येऊन माझी पत्नी म्हणाली,

"आपल्याला काळजी वाटत होती ना? हा घ्यावा, बाबांनीं पंच-वीसशांचा चेक पाठविला आहे. पांचशें रुपये जास्तच!"

"आणखी बरं का बाबा," माझा मुलगा नाचत म्हणाला, "तुम्हाला नकळत आईनीं माझ्या नांवानं लॉटरीचं तिकिट घेतलं होतं. त्याचे दहा हजार मला मिळणार!"

"अरे वा:! खरं?" धंदेवाईक सवयीनें चेक तपासत आनंदानें ताडकन् उठून मी म्हणालों, "म्हणजे दहा सहस्र पांचशें. नॉट बॅड! नॉट ॲट ऑल बॅड!"

आमच्या श्वशुरांनीं सव्याज पैसे पाठविण्याची कृपा केली, आणि दहा सहस्राचा हा अकस्मात लाभ झाला. आहे, आमचं दैव शिकंदर

आहे! निदान दहापांच मिनिटें तरी बापूचे आणि विरक्तीचे विचार माझ्या मनांतून पार लोपले, इतका मला आनंद झाला होता. आणि मग पुन्हां मला विजेचा झटका बसल्याप्रमाणें आठवण झाली कीं बापू मेला! नानाची भेट—नानाची भेट असा आपल्या क्षीणतेनें झिजत जाणाऱ्या स्वरांत म्हणत मेला. अनेक प्रचंड यंत्रांच्या गतीनें घोंघावणाऱ्या माझ्या दैनंदिन आयुष्याच्या कल्लोळांत त्या मरत्या माणसाच्या केविलवाण्या हांकेनें माझ्या मनावर अथवा माझ्या कानावर कांहीं परिणाम केलाच नाहीं! कठोरतेची पुटें घेऊन दगड बनलेल्या माझ्या मनावर परिणाम करूं शकेल असें त्या शरपंजरी पडलेल्या दरिद्री माणसाच्या हांकेंत कांहीं नव्हतंच! समजा ती हांक सत्तेची अनिवार्य शक्ति ठेवणाऱ्या अधिकाराची असती तर? समजा तीं हांक जड व जिवंत जगाचाहि सहज सौदा पटवूं शकणाऱ्या द्रव्याची असती तर? समजा ती हांक कटाक्षमात्रानें सत्ताधाऱ्यांचेंहि सूत्र-चालन करूं शकणाऱ्या एखाद्या रुपेरी रंभेची असती तर? तर सापडला असता का मला वेळ?... पण ही हांक व्यवहारी कोष्टकांत शून्यवत असणाऱ्या एका जिवाची होती! ती मी ऐकलीच नाहीं! ती हांक कान देऊन ऐकण्याची आवश्यकताच मला वाटली नाहीं!...आणि आतां बापू मेला! त्याला मी भेटण्यापूर्वीच मेला. मी कंठशोष केला तरी तो आतां त्याला कधीं ऐकूं जाणें शक्य नाहीं. तेव्हां मी एकच शब्द बोललों असतों, तरी माणुसकीनें मला मान्य करून घेतलें असतें! केवळ कांहीं क्षण... केवळ कांहीं शब्द! पण ते क्षण मला सांपडले नव्हते, ते शब्द मी बोललों नव्हतों. आणि आतां बापू मेला. सहस्रांनीच काय पण जगांतल्या साऱ्या संपत्तीनेंहि हें सत्य पालटणार नव्हतें. आणि तरीहि केवळ दहा सहस्रांवरच त्या सत्याची मला पार विस्मृती झाली होती. मी विसरलों तरी काय काय होतों? मी गमावलें तरी काय काय होतें? मी भयंकर माणूस होतों. खरो-खरोच मी अमानुष बनलों होतों. अपघातानें नव्हे तर संवयीनें व स्वभा-

चानेंच मी अमानुष बनलों होतों. आणि माझी कठोरता अगदीं दुराराध्य होती.

माझ्या दुराराध्येचा विचार मनांत येतांच मी दचकलों व खळखळून रडण्याचा अधिकार व शक्तिही गमावलेल्या माणसाचा जसा कोंडमारा व्हावा तसा माझा कोंडमारा झाला. परंतु माझ्या दैनंदिनी व्यवहाराचे घोंघावतें यंत्र दांतावर दांत घासत भीषण गतीनें सुरू होतांच हें सारेंच मी पुन्हां विसरेन, हा पश्चात्तापहि विसरेन, हा कोंडमाराहि विसरेन, ही भयानक जाणीव मला झाली व ती जाणीव होतांच धुरानें दाटलेल्या खोलींत हातपाय बांधून फेंकून दिल्यासारखें मला वाटलें.

—"दीपावली" ४८



## शेवट : : ५

'Denouement' (शेवट) ह्या फसव्या जुळणीच्या फिरंगी शब्दापायीं रघू अगदीं जेर झाला होता. आजवर रघूच्या गोष्टी संपादकांकडून ह्या 'डिनुमेण्ट' पायींच साभार परत आल्या. रघूच्या गोष्टी एरवीं बऱ्या असतात, पण कलात्मक कलाटणी देऊन शेवट करणें त्याला साधत नाहीं, 'डिनुमेण्ट' कशाशीं खातात हेंच मुळीं तो जाणत नाहीं, असें साऱ्या संपादकांचें त्याला कंठरवानें सांगणें होतें. बी. ए. पढणाऱ्या रघूला 'डिनुमेण्ट' साधणें दूर राहूंच द्या, पण 'डिनुमेण्ट' ह्या शब्दाचा अर्थ सांगणेंसुद्धां प्रथम शक्य झालें नसतें. "Denouement"चा निश्चित उच्चार काय ह्या विषयीं तर अद्यापहि तो संशयांतच होता. पण बिघडलेल्या 'डिनुमेण्ट'ची संपादकीय मल्लीनाथी घेऊन 'साभार परत'च्या एकूण दहापांच चिठ्ठया रघूला आल्यावर तो अपशकुनी शब्द मात्र त्याला पक्का पाठ झाला. संपादकांना त्याच्या गोष्टींचे शेवट टरींव असतात असें वाटत होतें, व संपादकांकडूनहि रघूच्या गोष्टींचा शेवट अगदीं टरींव प्रकारेंच होई. चांगल्या गोष्टींचा शेवट कसा करावा तें संपादकांना कळत नाहीं असें रघूला वाटे, व गोष्टींचे चांगले शेवट रघूला साधत नाहींत असें संपादकांना वाटे. रघूची जगाकडे पहाण्याची दृष्टि धर्मराजाची होती. करतां येईल तेवढें लोकांचें कल्याण करावें असें त्याला वाटे. म्हणून एखाद्या विवाहमंडळवाल्यानें उभ्या आयुष्यांत लावलीं नसतील, एवढीं लग्नें पोरसवदा रघूनें आपल्या गोष्टींतून लावून दिलीं होतीं. पापदृष्टि संपादकांना रघूचें हेंच धोरण मान्य नसावें.

उलटपक्षीं मी मात्र 'डिनुमेण्ट'चा शंकराचार्य मानला गेलों होतों. आयुष्यभर ठेंचाळत गेलेल्या माझ्या अनुभवी वक्रतेनें केलेल्या कथांच्या शेवटांवर तमाम संपादक, व झाडून रसिक प्रसन्न होते. कर म्हटल्यानेंहि

एखाद्या कथेचा भोळा-भाबडा शेवट मला करतां आला नसता. अघटित घटनापटुत्वाच्या विषयांत प्रत्यक्ष परमेश्वराचाच कित्ता मीं समोर ठेवला होता. जें जसं सरळ न्यायानं व्हायला पाहिजे, तें तसें जगांत सहसा होत नाहीं हें कळण्याइतकं आयुष्य मी जगलों होतों. म्हणून माझ्या कथेंत जी नायिका नवऱ्यासमवेत सती जाणार असं वाचकांना अखेरपर्यंत वाटे, तीच अगदीं शेवटच्या क्षणीं मृत पतीच्या चितेवर उडी मारण्याऐवजीं त्याच बिस्तवावर दुसऱ्या लग्नाचे विधी उरकत असल्याचा देखावा दाखवून वाचकाची मी त्रेधा उडवून देई.

रघूच्या कथा साभार परत पाठवितांना कांहीं संपादकांनीं त्याला माझ्या कथांतली अखेरची आश्चर्यकारक वेलांटी डोळ्यांसमोर ठेवायला सांगितलें होतें. " कथादेहाला वळसा घेणारी नांगी पाहिजे व त्या नांगींत वाचकाला हात चोळावयास लावील असा डंख पाहिजे–" रघूची नूतनतम कथा साभार परत पाठविणाऱ्या चवदाव्या संपादकानें त्याला उपदेश केला होता,–" जसा तो अमेरिकेंतील ओ. हेन्री किंवा मराठींतील बाळाराव ह्यांच्या कथांत असतो."

" तुम्हींच सांगा बाळाराव, " माझ्यासमोर हस्तलिखित नाचवीत रघू म्हणाला, " ह्या गोष्टीचा आणखी दुसरा शेवट तुम्ही तरी कोणता केला असतात ? "

" कसली गोष्ट आहे ? " नाकाच्या शेंड्यावर घसरणारी आरशी नाकाच्या मध्यावर सरकावून मीं विचारलें.

" गोष्ट ऐतिहासिक आहे, आणखी ऐतिहासिक सत्यावर आधारलेली आहे. ह्या गोष्टीचा शेवट इतिहासांत झालेला सांगितला आहे, तसाच मीं पण केला. तरीसुद्धां हा संपादक जीभ लांब करून पुन्हां मला कलात्मक कलाटणीच्या आणि नांगींतल्या डंखाच्या गोष्टी सांगतो आहे."

" विंचवापेक्षां त्याची नांगी आणि नांगीपेक्षां नांगीचा चटका देणारा डंख नेहमीच विचारांत घेण्यासारखा असतो. ऐतिहासिक कथेंत-

सुद्धां इतिहासापेक्षां कथा व कथेपेक्षां तिचा शेवट हीं चढत्या महत्त्वाचीं असतात. नाट्यमय कलाटणी व कलात्मक वास्तवता ह्या वेगळ्याच गोष्टी आहेत. "

" पण इतिहासानेंच चक्क माझ्या गोष्टीचा शेवट हा असा—असा झाला म्हणून सांगून ठेवलं आहे ना! तिथं आतां उपाय काय! संभाजीनें धर्मासाठीं हौतात्म्य पत्करलें असें इतिहास सांगत असतां, त्यानें धर्मांतर व झेबुन्निसेशीं शादी करून दख्खनची सुभेदारी पत्करली असें तर कांहीं कितीहि कल्पक लेखकाला उजळ माथ्यानें दाखवितां नाहीं येणार! "

" नाहीं येणार, पण दुसरी कांहीं कलाटणी देतां येईल! "

" आपली बुद्धि तर कांहीं काम करीत नाहीं! इतिहासानें नमूद केलेल्या घटना माझ्या शब्दांत सांगूनच मीं ह्या गोष्टीचा शेवट साधला आहे. तुम्हीं ह्या गोष्टीचा दुसरा कोणता शेवट केला असतात ? "

" प्रथम तुझी गोष्ट वाच पाहूं. दुसरा शेवट देण्याचें काम माझ्याकडे लागलें. "

हस्तलिखिताच्या पत्रावळी उलगडून रघू गोष्ट वाचूं लागला:—

दिल्ली येथील मोंगल सत्तेचा अर्धचंद्र झपाट्यानें क्षय पावत असतांच दक्षिणेंत विकाराबाद व नसिराबादचीं राज्यें कलेकलेनें वर्धमान होत होतीं. पण त्याहिपेक्षां अधिक तेजानें वाढत होतें विकाराबादच्या शहाजादीचें अकलंकित सौंदर्य! विकाराबादच्या सीमेंतील हिऱ्यांच्या खाणी प्रसिद्ध होत्या खऱ्या, पण त्याहिपेक्षां आतां अधिक कीर्तिवंत होतें हें विकाराबादच्या राजवंशांतील रमणीरत्न! शहाजादी लुतुफुन्निसा होतीच तशी रूपवती. एखाद्या पुष्ट हरिणीनें हेवा करावा असें तिचें तारुण्यानें रसरसलेलें शरीर मांसल व चपळ होतें. आणि एखाद्या हरिणीसारखेच होते तिचे काळेशार गहिरे डोळे. तांबूल सेवन केलें नसतांहि तिचे पातळ ओंठ तांबूलसेवन केल्याप्रमाणें दिसत व सुरमा घातला नसतांहि तिचे डोळे सुरमा

घातल्यासारखे वाटत. तिचा स्वर बुलबुलासारखा होता व तिची अंगकांति आरसपानी होती. परंतु शहाजादी लूतुफुन्निसा नुसती रूपवतीच नव्हती, तर मोठी चतुर व बुद्धिमानहि होती. जहानआरा व रोषनआरा ह्यांच्या-प्रमाणेंच तिला शायरीचा नाद होता व संगीतांतहि तिची गति असे. लुतुफून्निसेच्या रूपगुणांविषयीं विकाराबादेंतील कवि म्हणतच असत कीं, 'हे राजकन्ये! तुझ्या रूपाच्या नुसत्या तोंडी वर्णनानेंच जर हृदयें इतकीं घायाळ होतात तर तुझ्या प्रत्यक्ष दर्शनानें त्यांची काय अवस्था होईल बरें! तुझ्या काव्याचे शब्दात्मक पडसाद ऐकूनच जर रसिकांची ही स्थिति होते तर तें काव्य तुझ्या रमणीय मुखांतून ऐकल्यास त्यांची काय दशा होईल! तरुणांच्या दृष्टीनें पहातां तुझा पडदानशील गोषा हें मोठें वरदानच म्हटलें पाहिजे. कारण त्यामुळेंच तुझ्या रूपाचें व शब्दांचें विदारक परिणाम कांहीं मर्यादेंत राहिले आहेत. केवळ तुझें रूप अथवा केवळ तुझें काव्य हें एक एकटेंच तरुण राजपुत्रांची त्रेधा उडवून द्यावयास पुरेसें असतां अल्लानें तुला तीं दोन्ही बहाल केलीं आहेत ह्यांत त्या खुदातालाचा कोणता उद्देश असेल बरें ?"

शहाजादीचें तारुण्य जों जों फुलूं लागलें तों तों तिचें लावण्य अधिकाधिक बहरू लागलें व तिच्या हळूवार काव्यात्मक वृत्ती अधिकाधिक उत्कट होऊं लागल्या. ज्यांना शहाजादीची प्राप्ति तर राहोच पण तिच्या नखाग्राचें दर्शनहि दुर्लभ होतें, त्यानाहि हें जाणण्याविषयीं उत्सुकता लागून राहिली कीं उभार घेऊन वाढणारी ही नवतीची स्वैर आणि सुंदर वेल अखेर कोणाचें भाग्य भूषविणार? राजकन्येच्या सौंदर्याची किर्ति ज्या प्रमाणांत वाढत गेली, त्याच प्रमाणांत इतरेजनांत तिच्या विवाहाविषयींचें कुतूहलहि वाढत गेलें. प्रिय वाचक! यावरून बोध इतकाच घ्यावयाचा कीं मनुष्यस्वभाव दोन–अडीच शतकापूर्वी जसा होता तसाच तो आजहि आहे. अद्यापहि आपणास दुर्लभ असणाऱ्या सुंदर

सुंदर मुलींची प्राप्ति अखेर होते तरी कोणास, हें रिकामटेकडा व लघळ मनुष्यस्वभाव कुतूहलानें हेरतच असतो कीं नाहीं ?

गेल्या कांहीं दिवसांत विकाराबाद व नसिराबादच्या मध्यांत सांडणी स्वारांची वाजवीपेक्षां अधिक आवक–जावक सुरू झाली, तेव्हां उत्सुक जनतेनें पुनश्च कान टवकारले. उंटावरचे हे धांवपळ करणारे शहाणे विकाराबादच्या शहाजादीचें नसिराबादच्या शहाजाद्याशीं लग्न जमविण्याच्या खटाटोपांत तर नसतील ! ह्यांत अशक्य कांहीं नव्हतें, व कांहीं वाईटहि नव्हतें. सीमेला सीमा भिडवून वाढणाऱ्या ह्या दोन राज्यांत असा संबंध उत्पन्न झाला असता तर त्यांत वृद्ध बादशहाला संतोषच वाटावयास पाहिजे होता. शिवाय नसिराबादचा शहाजादा दिलावर होताहि मोठा शूर, रसिक व देखणा ! लुतुफुन्निसेप्रमाणेंच तोहि स्वभावानें काव्यमय असल्याची जनवार्ता होती. खरोखरच शहाजादा दिलावर व शहाजादी लुतुफुन्निसा ह्यांच्या शादीविषयीं बोलणीं चालली असतील काय ? खरोखर त्यांची शादी झाल्यास तो जोडा किती नामी शोभेल !

परंतु लोकांना ह्या विषयांत फार काळ तर्क करीत रहावें लागलें नाहीं. लवकरच नसिराबादचा शहाजादा व विकाराबादची शहाजादी ह्यांच्या वाङ्निश्चयानिमित्त उत्सव करण्याचीच पाळी त्यांच्यावर आली. आणखी एक महिन्यानेंच तीं दोघें विवाहबद्ध व्हावयाचीं होतीं. विकाराबादच्या वैभवास व दिलावरच्या रूप–गुणांस शोभेल असा नजराणा विकाराबादच्या बादशहानें दिला. नसिराबादच्या थोरवीस व लुतुफुन्निसेच्या गौरवास पात्र होईल अशा परतभेटी नसिराबादकडून विकाराबादेस आल्या. कोष्टी, जडजवाहिराचे व्यापारी, नर्तिका, गायक ह्यांच्या धांदलीची ही नुसती सुरवात होती. विकाराबाद व नसिराबाद ह्यांच्या दरम्यान ज्या अमूल्य नजराण्याची देवाणघेवाण झाली, त्यांच्या कलाकुसरीविषयीं, मूल्याविषयीं व नावीन्याविषयींच्या चर्चेस आतां लोकांत बहर आला होता. परंतु नसीराबादच्या शहाजाद्यानें लुतुफुन्निसेच्या मनोरंजनासाठीं एक

निष्णात सारंगीवालाहि पाटवून आपल्या योजकतेचें अचूक प्रत्यंतर दिलें होतें. शीघ्र काव्य करणारा व उत्कट भावनेनें तें काव्य सवाद्य गाणारा कलावंत, हेंच नसिरबादच्या शहाजाद्यानें आपल्या वाग्दत्त वधूच्या काव्यमय वृत्तीचें केलेलें सर्वांत मोठें कौतुक होतें. सारंगीच्या सुरावर प्रेमाचा परिचय करून देण्याची ही कल्पना चातुर्याची नव्हती असें कोण म्हणेल?

वाचक हो! ज्या काळीं लोक स्त्रियांची चिंता करीत, पण त्यांच्या भावनांची विशेष चिंता करीत नसत, तेव्हांची गोष्ट आम्हीं सांगत आहोंत. स्त्रिया म्हणजे उपभोग्य विषय असेंच त्या काळीं मानलें जाई. तेव्हांचे लोक स्त्रियांवर प्रेम करीत, (त्यांच्यासाठीं लढायासुद्धां करीत,) पण प्रेमविवाह करीत नसत. गोष्टांतील सुंदर स्त्रियांच्या वैध व अवैध प्रेमकथांचे पडसाद आजहि आपण ऐकत असलों, तरी प्रियाराधन ही वस्तू तेव्हां अज्ञात होती. अशा काळीं शहाजाद्यानें लुतुफुन्निसेच्या मनोविनोदनार्थ एक निष्णात सारंगीवाला पाठवून तिच्या आवडीविषयीं जो आदर व्यक्त केला, त्यामुळें त्या बालिकेला काय बरें वाटलें असेल? शहाजादा दिलावरविषयीं तिच्या मनांत कोमल भावनेचा उदय झाला असेल काय? सारंगीवाल्या सुलतानचीं (प्रिय वाचक, त्या तरुण व सुंदर सारंगीवाल्याचें नांव सुलतान हेंच होते.) धुंद प्रेमगीतें ऐकून आजवर जनानखान्यांतच जखडून पडलेल्या त्या रसिक कुमारिकेच्या कल्पनेस पंख फुटले असतील नव्हे? वाङ्‌निश्चय व विवाह ह्यांतील एक महिन्याचा अवधि तिला अगदीं असह्य वाटूं लागला असेल काय? तो काळ ती कशा प्रकारें घालवीत असेल बरें?

प्रिय वाचक! ह्या साऱ्या प्रश्नांचीं उत्तरें शोधण्यासाठीं चला आपण आतां किल्ले विकाराबादच्या 'बाला हिस्सार' वर जाऊं. ती पहा खुबसुरत दासींनीं वेढलेली शहाजादी लुतुफुन्निसा त्या उत्तुंग सौधावर उसासे सोडत व उगवत्या चंद्राकडे मधूनच पहात बसली आहे.

जिचा वाङ्‌निश्चय ठरून पंधरा दिवस झाले व जिची शादी पंधराच दिवसांवर येऊन ठेपली आहे, अशा तरुणीनें उसासे सोडणें एका

परीनें आश्चर्यकारकच नव्हे का? परंतु शहाजादी अस्वस्थ आहे व उसासे सोडीत आहे ह्यांत शंकाच नाहीं. सायंकाळचा हा शीतल वायुदेखील तिला पुरेसा थंड वाटत नसावा. आसमंतात फुललेलें सुंदर वसंतवैभवहि तिला फारसें आकर्षक वाटत नसावें. चंद्राकडे पाहून तिच्या हृदयाला आनंद तर नव्हेच, पण जणूं चटका बसत होता. "हाय्!" हा पहा शहाजादीनें पुन्हा उसासा सोडला.

प्रिय वाचक! आणखी जवळ जाऊन राजकन्या व तिच्या दासी, ह्यांचें भाषण आपण ऐकूं या. एरवीं तेथे जावयास सात पहारे, सतरा देवड्या व बाराखडीइतके खुणेचे शब्द लागत असले तरी कल्पनेच्या किमयेनें जनानखान्याच्या त्या गच्चीवर जावयास, अन्य कोणती तर काय, पण लिंगभेदाची अडचणहि तुमच्या आड येणार नाहीं. हें पहा, पुन्हा एकदां शहाजादीनें चंद्राकडे पाहिलें व पुन्हा उसासा सोडला.

"शहाजादीसाहेबा! आज आपली मिजाज विशेष नादुरुस्त आहे का? हकीमाला बोलावणें धाडूं का?" एक दासी म्हणाली.

"नको करीमा! मला हकीम काय करावयाचा?" शहाजादी सुस्कारा सोडून म्हणाली.

"करीमा! किती ग तूं वेडी!" सलीमा नांवाची थोडी विनोदी व बरीच फाजील दासी म्हणाली, "नसिराबादचा हकीम दवा देईल तेव्हांच शहाजादीसाहेबांना आराम पडेल. त्यांचा रोग वेगळाच आहे बरं!"

"चावट मेली!" शहाजादी दचकून लाल होत म्हणाली व तिनें पुन्हा उसासा सोडला.

"मला तर वाटतं," फातिमा नांवाची दुसरी फाजील व विनोदी (आणि फाजील विनोदी) दासी म्हणाली, "त्या नसिराबादहून आलेल्या सारंगीवाल्याचीं गाणीं ऐकूनच शहाजादीसाहेबांची मिजाज जास्त बिघ-

डली आहे. आगींत तेल ओतल्यासारखीं तो नुसतीं प्रेमाचीं गाणीं वाजवीत असतो सारखा!"

"बये फतिमे," करीमा नांवाची शहाणी दासी म्हणाली, "गुलाबाला बुलबुल प्रत्यक्ष मिळायला जो वेळ आहे, तो वेळ गुलाबानं बुलबुलाचीं वर्णनं ऐकण्यांत घालवणं हेंच त्यांतल्या त्यांत सुखाचं नाहीं का?"

"सारंगीवाला सुलतान दिसतो खूब सुंदर, वाजवतो फार सुंदर आणि गातो अतिशय सुंदर हें मात्र खरं! शहाजादासाहेबांनीं अगदीं लायक कलावंत बाईसाहेबांच्या मनोरंजनासाठीं पाठविला." हसीना नांवाची दासी शहाजादीला पंख्यानें वारा घालीत म्हणाली.

"म्हणूनच त्या सारंगीवाल्यापुढं शहाजादीसाहेबांना आतां दुसरं कांहीं सुचत नाहीं. आपणां सगळ्यांना घालवून देऊन तिन्ही त्रिकाळ एकट्याच त्याचीं गाणीं ऐकत बसतात."

शहाजादी पुन्हा दचकली, लाल झाली व बऱ्याचशा तीव्र व कांहींशा व्यथित स्वरांत म्हणाली, "फातमा...!" आणि नंतर कांहीं क्षण फातिमेस व इतर दासींस न्याहाळत राहिल्यावर तिनें आपल्या कोमल हातानें एक आळसावलेली खूण केली. लवून मागें सरत साऱ्या दासी तेथून जातात न जातात तोंच कंबर वाकवून कुर्निसात करणाऱ्या हबशी ख्वाजानें तेथें येऊन वर्दी दिली, "सारंगीवाला सुलतान आला आहे, शहाजादीसाहेबा!..."

चंद्रकिरणाचा स्पर्श झालेल्या कमलिनीप्रमाणें शहाजादीचा चेहेरा क्षणार्धांत फुलला. ती आसनावर सावरून बसली, तिनें चेहेऱ्यावर अवगुंठन ओढल्यासारखें केलें व ती म्हणाली, "पाठवून दे एकदम!"

सारंगीवाला सुलतान वाजवत होता व गात होता,—

"प्रेमाचें वेड हें विलक्षण वेड आहे. ते कोणाला लागेल व कोणाविषयीं लागेल त्याचा कांहीं नियम नाही. जें कधींच सुटूं नये असें वाटतें, असें हें प्रेमाचें वेड आहे. उपाय केला तरी हें वेड वाढतें, न केला तरी

वाटतें, परंतु प्रेम न करितां शहाणें राहण्यापेक्षां प्रेम करून वेडें होणें फार बरें..."

लुतुफुन्निसा एकाग्रपणें सारंगीवाल्याकडे पहात होती व एकतानतेनें त्याचें गीत ऐकत होती. सारंगीवाल्यालाहि स्वतःच्या काव्याच्या आशयाची व स्वतःच निर्माण केलेल्या स्वरमालाची धुंदी चढली होती. त्याचे डोळे अर्धोन्मीलित होते, झुलणाऱ्या केंसांचें क्रीडांगण बनलेल्या भव्य कपाळावरची शीर ताठ झाली होती व चांदण्यांत त्याची गौर व मर्दानी आकृति अतिशयच आकर्षक वाटत होती. कोणताहि सिंहासनाधीश राजा ह्यापेक्षां कितीसा अधिक सुंदर किंवा मोहक असूं शकेल ! उलटपक्षीं तो लठ्ठ, लहरी, मूर्ख व मठ्ठ असण्याचाच संभव अधिक !... 'प्रेमाचें वेड हें विलक्षण वेड आहे. तें कोणाला लागेल व कोणाविषयीं लागेल त्याचा नियम नाहीं. जें कधींच सुटूं नये असें वाटतें असें हें प्रेमाचें वेड आहे...' शहाजादीच्या कानांत हे शब्द घुमत होते. जणूं त्याच शब्दांचा कल्लोळ तिच्या हृदयांतहि माजला होता व तो थोपविण्यासाठीं तिनें आपला हात स्वतःच्या कोमल वक्षभागावर दाबून धरला होता.

सारंगीवाला गात होता,—

"...ज्याला प्रेमाचें राज्य लाभलें, त्याला लाभावयाचें काय शिल्लक राहिलें ? प्रेमाच्या सिंहासनावर बसलेला सुलतान, हाच खरा सुलतान. प्रेमशून्य सिंहासन सोन्याचें असलें तरी तेथील सलतनत व्यर्थ होय...!"

शहाजादीच्या हृदयांत जणूं अनावर तुफान मोकाट सुटलें. कोणाशीं बरें तिची शादी ठरली होती ? नसिराबादच्या शहाजाद्याशीं. तो काळा कीं गोरा तिनें कधीं पाहिलाहि नव्हता. तो वैभवशाली होता, पण बुद्धीचें, गुणाचें व रसिकतेचें वैभव त्याच्यापाशीं खरोखरच असेल काय ? त्याचीं स्तुतिस्तोत्रें आजवर तिनें ऐकलीं होतीं. प्रत्यक्ष सारंगीवाल्याकडूनहि ऐकलीं होतीं. पण शहाजाद्यांचीं स्तुतिस्तोत्रें हीं अक्षरशः खरीं थोडींच

असतात? बहुधा तीं खरीं नसतातच. शहाजहाननें तीनचारशें लग्नें केलीं, आणि तरी केवळ त्यानें ताजमहाल बांधला म्हणूनच त्याच्या दिव्य प्रेमाचा बोलबाला झाला. त्याच्या प्रेमांत कितीसा अर्थ होता, हें वर्षों गणती त्याची गांठहि न पडलेल्या त्याच्या शेंकडों राण्यांनाच माहीत. नसिराबादच्या बादशाहतींत असेंच कांहीं आपल्या दैवीं कशावरून येणार नाहीं?... 'ज्याला प्रेमाचें राज्य लाभलें, त्याला लाभावयाचें काय शिल्लक राहिलें?'......किती सत्य! म्हणूनच आलमगीराच्या अविवाहित कन्येनें आपल्यापेक्षां कमी प्रतीच्या पुरुषावर प्रेम केलें व आपल्या महालांत प्रेमाच्या पागल धाडसानें ती त्याच्या भेटी घेऊं लागली. धूर्त व संशयी अलमगीरानें एके रात्रीं अकस्मात् तिच्या महालांत प्रवेश केला व तेथील एका रांजणांत आपल्या प्रियकराला लपविण्याचा प्रसंग शहाजादीवर आला. खाष्ट औरंगजेबानें त्याच रांजणाखालीं विस्तव पेटवण्याची व त्यांतील गरम पाणी स्वतःस देण्याची आज्ञा फर्मावली. रांजणांत कांहीं नाहीं असें एकदा सांगितल्यावर अलमगीराची आज्ञा मोडणें शहाजादीस अशक्य होतें. विस्तव पेटविण्याच्या मिषानें रांजणापाशीं तोंड नेऊन शहाजादी म्हणाली, 'प्रियकरा! माझ्या लौकिकाची व तुझ्या प्रेमाची चाड असेल तर तोंडांतून उसासाहि सोडूं नकोस.' आणि खरोखरच प्राण गेला तरी तिच्या त्या इमानी व शूर प्रियकरानें नुसतें 'उफ्' देखील केलें नाहीं.

हें खरें प्रेम! हें खरें काव्यमय प्रेम!— प्रेमाची सलतनत ती हीच! प्रेमाच्या सिंहासनावर बसलेला सुलतान हाच खरा सुलतान. प्रेमशून्य सिंहासन सोन्याचें असलें तरी तेथील सलतनत व्यर्थ होय!' तर मग आपल्या प्रेमाचा सुलतान होण्यास कोण बरें योग्य आहे? गेले पंधरा दिवस अनावरपणें आपलें मन कोणत्या दिशेनें धांवत आहे? कोणाभोंवतीं गिरक्या घेत आहे? नसिराबादच्या शहाजाद्याभोंवतीं? कीं,...कीं...सुलतान गात होता,—

" प्रेमाची भाषा पूर्णपणें मुकी, आणि तरीहि अतिशय बोलकी असते. माझ्या प्रेमा, तुला जेथें मीं ओळखलें आहे तेथें तूं स्वतःला ओळखलं नसशील हें शक्य आहे काय ? "

शहाजादी दचकली व लाल झाली. तिनें आपला तळवा हृदयावर घट्ट घट्ट दाबून धरला. चीत्कार करुन कांहीं तरी सांगण्याचा तिला मोह होत होता. चंद्रकिरणांनीं तळपणारे आपले डोळें एकदां स्मितपूर्वक शहाजादीकडे लावून सुलतान गात राहिला,—

" आकाशांतील त्या चंद्रापेक्षांहि तुझा मुखचंद्रमा अधिक सुंदर आहे. कारण त्या चंद्रावरच्या कलंकापासून तुझा मुखचंद्र मुक्त आहे. किंवा तुझें धवल लावण्य पाहूनच, माझ्या प्रेमा, तो चद्र काळवंडला, असें तर झालें नसेल ! "

शहाजादीच्या हृदयाला वेदना होत होत्या व तरीहि अनिर्वचनीय आनंद वाटत होता. आपल्या पत्नीला रत्नाचा हार शहाजादे देत असतील पण काव्यरत्नांचा असा साज आपल्या प्रेयसीला चढविणें त्यांना कुठून शक्य होणार ? कुणाचें होतें बरें हें वर्णन ? अशा काव्यमय आवेगानें हा समोरचा सुंदर गायक कां करीत होता ? विलग ओठांनीं व धपधपत्या हृदयानें शहाजादी लुतुफुन्निसा ऐकत होती. तिच्या शरीरास कंप सुटला होता...वृत्ती अनावर होत होत्या. सुलतान गात होता,—

" पांढऱ्या विरळ ढगांनीं चंद्रबिंबास झाकावें, तसें तुझें अवगुंठन तुझ्या मुखचंद्रास झांकीत आहे. माझ्या प्रेमा, तुझ्या अवगुंठनास सौंदर्य-दर्शनाचें जें भाग्य लाभतें, त्यासहि हा क्षुद्र दास अपात्र आहे काय ? आकाशांतील चंद्राचा भूमीवरील भिकाऱ्यानें हव्यास धरला आहे. परंतु माझें प्रेम हाच माझा अपराध, हेंच माझें पारितोषिक, हीच माझी क्षमा-याचना, व हेंच माझें शासनहि आहे, दुसरें कांहीं नको. तशी माझी पात्रताहि नाहीं. माझें वैर करणारें हें अवगुंठन क्षणभरच दूर कर व मजकडे पहा. तुझ्या प्रेमासाठीं प्राणत्याग करून प्रेतवस्त्रांत मी गुंडाळला

जात असतां दयेनें द्रवून तूं आपले अवगुंटन अखेर दूर करशील व आपली नजर मजवर लावशील असे जरी मला कोणी सांगितलें--"

शहाजादीच्या हृदयाचें विलक्षण वेगानें स्पंदन होऊं लागलें. स्थळा-काळाचें भान ती विसरून गेली. मूर्तिमंत प्रेम जणूं साकार होऊन तिच्या हृदयाच्या तारा छेडीत होते.

"--तरी तुझ्या प्रेमानें आधीच भेदून गेलेल्या हृदयांत ही कट्यार मी ह्याच क्षणी म्यान करीन!"

परवर दिगार! शहाजादी हें काय पहात होती? खरोखरच आवेशानें सुलतानाचा हात कमरेच्या कट्यारीवर गेला आणि उपसून उभारलेली ती कट्यार...

"सुलतान!"--क्षणार्धात मुखावरचें अवगुंटन मागे फेकीत शहाजादी पुढें धावली, व व्याकुळ स्वरांत पुन्हा म्हणाली, "सुलतान...हा बघ मी बुरखा दूर केला! सुलतान..."

सुलतान हळूहळू खाली वांकला. प्रथम त्यानें शहाजादीच्या जर-तारी जोड्याचें चुंबन घेतलें व मग तिच्या निःशक्तपणें प्रतिकार करणाऱ्या हाताचें...किती काळ गेला कुणास ठाऊक, सारंगीवाल्याचे ओंठ शहाजादीच्या कोमल हातावर टेकलेलेच होते.

"नको! सुलतान नको!" शहजादी कांपऱ्या स्वरांत म्हणत होती, "अखेर खानदान नावाची वस्तू आहे, कर्तव्य नांवाची वस्तू आहे, लौकिक नावाची वस्तू आहे...,"

खानदान नांवाची वस्तू, कर्तव्य नांवाची वस्तू, लौकिक नांवाची वस्तू! दिवसामागून दिवस जात होते व त्यांचे पाश शहाजादीभोंवतीं अधिकाधिक बळकट होत होते. सारंगीवाल्याविषयींचें तिचें आकर्षण वाढतच होतें, व प्रेमहि. त्यांत आतां तिचें तिलाहि कांहीं गुपित उरलें नव्हते आणि त्याच प्रमाणांत तिच्या असाहाय्यतेची तिला जाणीव

होत होती. मित्री? होय, तसेंहि म्हणाना! एरवीं जनानखान्यांतल्या स्त्रियांनीं प्रेम केल्याचे, प्रेमासाठीं प्राण दिल्याचे, व एखाद्या सामान्य माणसासमवेत पळून गेल्याचे दाखले काय थोडे होते! अगदीं नोकराचाकराशीं जनान्यांतील स्त्रियांनीं प्रेमसंबंध ठेवल्याचींहि उदाहरणें होतीं. नव्हे तशींच उदाहरणें पुष्कळ होती. समजा, आपण सारंगीवाल्यासमवेत पळून गेलों तर! तर अब्बा काय म्हणतील? लोक काय म्हणतील? आपल्या लौकिकाचें काय होईल? एखाद्या पाखरानें व्यर्थ पंजरावर पंख मारावे व चोंच रक्तबंबाळ करून सुन्न पडावें, तसें आतां शहाजादीचें झालें होतें. एक आठवडा, दोन आठवडे, तीन आठवडे! सारंगी राजकन्या झुरणीला लागली होती. दैवगतीसमोर मान वांकवणें येवढाच तिला मार्ग होता. सुलतान, त्याचे सुस्वर व त्याचें काव्य, येवढाच तिला ह्या क्षणीं आनंद होता व तृषार्तानें पाणी प्यावें तसा तेवढाच तो आनंद ती लुटीत होती. अद्याप सुलतान तिचा होऊं शकला असता,—अद्याप! पण छे! तें शक्य नव्हतें. आतां तिचें लग्न होणार होतें व मग आज शक्य असलेलें तें स्वप्न कायमचेंच मातींत मिळणार होतें. सहा दिवस...पांच दिवस...चार दिवस...! धुंदपणें सुलतान गात होता व धुंदपणें शहाजादी ऐकत होती. नुकत्याच जन्मलेल्या त्यांच्या प्रेमाचें गीत तो गात होता व ती ऐकत होती. दैवगतीपुढें कोणताच उपाय नव्हता. लवकरच सुलतानला ती अंतरणार होती व तिला सुलतान. तीन दिवस...दोन दिवस...एक दिवस...!

अखेर शहाजादीच्या प्रयाणाचा तो दिवस उजाडला. तिच्या काळजाचे तुकडे झाले, रडून रडून तिचे डोळे सुजून गेले. विवाहासाठीं मोठ्या सरंजामानिशीं शहाजादी लुतुफुन्निसा आज नासिराबादच्या दिशेनें मार्गस्थ होत होती. कोसामागें कोस व गांवामागें गांवें जात होतीं, विश्रांतीच्या प्रत्येक टप्प्यावर सुलतानची सारंगी स्वर घुमवीत होती. पालखीच्या वाटचालीलाहि पायीं अंतर तुडवत त्या पालखी-शेजारींच चालणाऱ्या सुलतानचें संगीत साथ देत होतें. बेभानपणें सुलतान सारंगी

छेडीत होता व बेभानपणें शहाजादी ऐकत होती. कोसाकोसानें नसिराबाद जवळ आलें, सुलतानच्या सारंगीचें आक्रांतमय संगीत चढत गेलें, व नसिराबाद एका टप्प्यावर येतांच अकस्मात् थांबलें. संगीताच्या सुरांवर उडणारी शहाजादी छातींत तीर लागलेल्या पांखराप्रमाणें कठोर वस्तुस्थितीच्या दगडागोट्यावर आदळली. सुलतान निघून गेला होता. नसिराबाद एक टप्प्यावर असतांच शहाजादीची रजा घेऊन स्वतःच्या सेवेस सादर होण्याचा त्याला राजपुत्र दिलावरचा हुकूम होता. लुतफुन्निसेचा प्रवास पूर्णपणें संपण्यापूर्वीच शहाजादा दिलावरच्या आज्ञेनें तिचें संगीतमय स्वप्न विच्छिन्न झालें होतें. कायमचें विच्छिन्न झालें होतें. शहाजाद्याच्या आज्ञेनें सुलतान आपणांस अकस्मात् सोडून गेला, हें लुतफुन्निसेस कळताच तिच्यावर नवा आघात झाला, तिच्या मनाला निष्प्रेमाचा नवा पीळ पडला! आणि हाय रे परवर दिगार! तिच्या दुःखाला अनेक प्रकारें कारणीभूत होणाऱ्या नसिराबादच्या ह्या शहाजाद्याचेंच दास्य तिला आतां जन्मभर करावयाचें होतें. आणि त्याचें आजन्म तोंडहि पाहूं नये, असें तिला ह्या क्षणीं वाटत होतें. विवाहाचे सारे सोहाळे पार पडेपर्यंत संकोचाच्या सोइस्कर अवगुंठनाआड हा निश्चय तिनें अक्षरशः पाळला. आणि मग अखेर ती काळरात्र उगवली.

सोहाग रात्रीसाठीं सजवली गेलेली लुतफुन्निसा, प्रहाराची वाट पाहणाऱ्या कसाबखान्यातील गाईप्रमाणें त्या सुसज्ज रंगमहालांत उभी होती. ‘ सुलतान ! सुलतान ! ’ तिचें भंगलेलें हृदय सारखें मनोमन आक्रंदत होतें. ते लखलखणारे दिवे, त्या फुलांच्या माळा, ते गुडघाभर खोलीचे गालीचे व ती मखमली शय्या--सारेंच तिला भयंकर वाटत होतें.

शहाजाद्याच्या आगमनाची वर्दी देऊन सूचक शब्दांत विनोद करीत गेलेल्या शेवटच्या दासींचे शब्द तिच्या कानांत पोळत शिरले. लुत-

फुन्निसेला शहाजाद्याची चाहुल लागली, व तिनें आपल्या सुंदर चेहऱ्यावरील घुंगट अधिकच घट्ट ओढून घेतलें.

"शहाजादी !" मंद स्वरांत हांक ऐकूं आली. "शहाजादी लुतुफुन्निसा !" तोच स्वर किंचित् चढला.

या खुदा ! हा कोणाचा स्वर शहाजादी ऐकत होती ? ती स्वप्नांत तर नव्हती ? हा स्वर तिच्या परिचयाचा होता. हा स्वर तिला प्रिय होता. पुन्हा तो स्वर बोलला,—

"शहाजादी, सारंगीवाल्यासमोर जो बुरखा संकोचला नाहीं, त्यानें शहाजाद्यासमोर लाजण्याचें कांहींच कारण नाहीं !"

शहाजादी दचकली. सुलतान ! हा सुलतानाचाच स्वर होता. पण ह्या रंगमहालांत ह्या अशा वेळीं सुलतानाला प्रवेश कोठला ? काय अरबी-भाषेतील चमत्कारिक गोष्टींचें युग पुन्हा सुरू झालें होतें ? लुतुफुन्निसेचें सारें शरीर कांपूं लागलें. अनावर उत्कंठेने तिनें घुंगट बाजूस सारलें, आणि तिच्या शरीरातून जणूं वीज धक्के देत धांवत गेली. सारंगीवाला सुलतान राज-वेषांत तिच्यासमोर उभा होता. तर मग काय सारंगीवाला सुलतान व शहाजादा दिलावर ही एकच व्यक्ति होती ? जें स्वप्न होतें तें खरोखरच सत्य झालें होतें ? पण त्याविषयीं आतां शंका कशाला ! बुद्धि व राजसत्ता, कला व संपत्ति, सौंदर्य व खानदान, आणि विवाह व प्रेम ह्यांच्या अतिशय मधुर संगमावरच ह्या क्षणीं ती उभी नव्हती काय ? राजकन्या लुतुफुन्निसेला सर्वव्यापी आनंदाचा अनिवार उमाळा आला व क्षणभर वधूसुलभ संकोचाचा विसर पडून एखाद्या उतावीळ दर्वितेच्या आवेशानें, तिच्याकडे स्थिरपणे पाहणाऱ्या शहाजाद्याच्या दिशेनें तिनें पावलें टाकली !

माझ्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पहात रघू थांबला. हाच त्याच्या कथेचा शेवट होता.

"संपली तुझी गोष्ट !" मी विचारलें.

संपली. काय वाईट शेवट आहे हा! आणि तरी लेकाचे संपादक म्हणतात कीं शेवट नीट नाहीं. म्हणून!"

"ठीक आहे. आपण आतां शेवट नीट करून टाकूं."

"पण पहा बरं का, शहाजादी व शहाजादा ह्यांचा विवाह म्हणजे एक ऐतिहासिक घटना आहे तिला धक्का लावण्यांत अर्थ नाहीं."

"नाहीं रे बुवा तुझ्या राजाराणीच्या लग्नाला मी कुठेंसुद्धां हात लावला नाही. जरा पहा तर खरा."

आणि मेजावरील झरणी उचलून अखेरच्या पानावर कोऱ्या पडलेल्या जागेत मी लिहूं लागलों:—

"तिचे बाहू पसरलेले होते व 'सुलतान! डोळ्यांत स्वप्न तरंगत होतें. 'सुलतान! माझा सुलतान! माझ्या हृदयाची सारंगी छेडणारा सुलतान!' तिचें आनंदानें कल्लोळ करणारें मन म्हणत होतें व बलिष्ठ वृक्षावर आश्रय शोधणाऱ्या वेलीप्रमाणें ती पुढें सरत होती. तोंच तिच्या उल्हासास कुंठित करणाऱ्या स्वरांत शहाजादा दिलावर म्हणाला,—

"शहाजादी लुतुफुन्निसा, आहेस तिथेंच थांब. एक पाउलहि पुढें टाकूं नकोस.' शहाजादी चमकली व थांबली. एखाद्या बावरलेल्या हरिणीच्या चकित दृष्टीनें ती शहाजाद्याकडे पहात होती. अधिकाधिक तीव्र होणाऱ्या स्वरांत दिलावर बोलूं लागला,—

"मला तूं स्पर्श करावास, येवढी तुझी योग्यता नाहीं. तूं खोटी आहेस, तुझं चरित्र खोटं आहे, तुझे माझ्यासमोर होणारे प्रेमाचे हावभाव खोटे आहेत! तुझं माझ्यावर प्रेम नाहीं आणि कधींच नव्हतें! राजकुळांत जन्मलेली तूं, तुझं प्रेम एका यःकश्चित् सारंगीवाल्यावर बसूं शकलं! तुझं प्रेम सुलतान सारंगीवाल्यावर होतं आणि आहे. शहाजादा दिलावरवर तें कधींच नव्हतं आणि नाहीं, प्रेमाचे हे सारे लडिवाळ हावभाव त्या सारंगी-वाल्यासाठीं आहेत, ह्या शहाजाद्यासाठीं नाहींत. एका यःकश्चित् सारंगी-

वाल्यावर प्रेम करूं शकणारी तूं माझ्या दृष्टीनें अगदीं तुच्छ आहेस, अगदीं त्याज्य आहेस!"

लुतुफुन्निसेच्या मस्तकावर जणूं अशनिपात झाला. बाहूं पसरून पुढें झेपावत बावरलेल्या स्वरात ती म्हणाली, "थट्टेची ही कुठली रीत सुलतान!"

कठोरपणें लुतुफुन्निसेची मनगटें धरीत शहाजादा म्हणाला,--

"सुलतान! सुलतान! पुन्हा सुलतान! तेंच तर मीहि पण म्हणतों. ह्या क्षणापर्यंत तुझा जीव त्या सारंगीवाल्यावरच जडलेला आहे. शहाजादा दिलावर आणि सारंगीवाला सुलतान ह्या एकच व्यक्ति आहेत, हें तुला कधीं माहित होतं? तूं प्रेम केलंस तें एका सारंगीवाल्यावर! एका शहाजाद्यावर नव्हे! सारंगीवाल्यालाहि मिळूं शकेल, इतकं सवंग तुझं प्रेम आहे. तें मला नको.–एखादा क्षुद्र सारंगीवालाहि जिला भुलवूं शकेल अशी राणी कोठल्या तरी सिंहासनावर शोभेल काय? तुझ्या प्रेमाचा हा उष्टावलेला आणि शिळा घास, कोणताहि स्वाभिमानी शहाजादा टोकरीनेंच उडवून देईल!"

आणि असें म्हणून स्फुंदत त्याला बिलगूं पाहणाऱ्या लुतुफुन्निसेला शहाजाद्यानें धाडकन् ढकलून दिले!

—"हंस" जुलै १९४९

———

किती गंमतीची गोष्ट आहे? खरंच किती गमतीची? तूं मला ओळखतेस. माझा चेहेरा, रूप, रंग, स्वर, तुला परिचित आहे. व्यासपीटावर मी तुला दिसेन. माझ्या लेखनांत माझ्या बहुरूपी पडछाया तूं पाहूं शकशील. मार्गावर, चित्रमंदिरांत, सभास्थानीं, उद्यानांत! कधीं किंचित् प्रयासानें, कधीं अकल्पित अपघातानें, कधी इच्छेनें, तर कधीं अनिच्छेनें तूं मला अवश्य पाहूं शकशील. माझें निवासस्थान, माझी बरी वाईट कीर्ति अथवा अपकीर्ति, माझे कल, कर्तृत्व सांगाती, . . . माझ्याविषयीं अगदीं सारं नव्हे पण कितीतरी तूं जाणतेस. आणि तूं मात्र मला केवळ नाममात्र आहेस. ह्या नगरींतील सहस्रावधि कुमारिकांपैकी एक; कोणा एका महाविद्यालयांतील मुलींच्या अपरिचित मेळाव्यापैकीं एक. अज्ञाताच्या अर्धअंधेरांत गर्दीच्या थव्यानें माझ्या डोळयांपुढें गजबजत फिरून जाणाऱ्या चेहऱ्यांनीं मढविलेल्या श्रोतृसमुदायांपैकीं एक. लेखणीवर विणल्या जाणाऱ्या भावमय शब्दतंतूनीं माझ्याशीं बद्ध असणाऱ्या अनामिक, अस्पष्ट, काल्पनिक, समूहांपैकी एक, जे मला पाहतात पण ज्यांना मी पहात नाहीं, जे मला ओळखतात, पण ज्यांना मी ओळखत नाहीं त्यापैकीं एक!

खरंच कोण आहेस तू? आणि पेटत्या शब्दांचा चटका घेऊन कशाला मला पत्र लिहिलेंस? माझ्या आक्रोशाचे पत्ररूप पडसाद देणें तुला इतकें अनिवार्य वाटलें! काय, तुझीच व्यथा मीं बोलून दाखविली? तुझ्याच हृदयाचें प्रतिबिंब माझ्या हृदयांत तुला दिसलें! मी लिहिलें, आणि तुझ्या भावनेच्या तारा संगीतमय झाल्या! मी बोललों, आणि जणूं तुझ्याच मनांतल्या विद्ध कोकिळा टाहो फोडून उठल्या! इतकें आपण समरूप आहोंत! विचारानें, भावनेनें? प्रकृतीनें? कालमार्गावरील व जीवनपथा-

वरील अगदीं वेगळ्या प्रवास प्रस्तरापर्यंत वाटचाल झालेले आपण दोघे? ऐन तारुण्याची उत्फुल्ल राई रंगाळत्या चालीने पाटीशीं घालणारा मी आणि उतावीळ उत्कंठेनें त्या वसंतवैभवास सामोरीं जाणारी तूं! स्वप्न-सृष्टीच्या सीमारेषेवर प्रवेशाचें आधीरें पाऊल टाकणारी तूं व त्या सृष्टी-बाहेर प्रणयाचीं पावलें टाकणारा मी, कांही साम्य आहे आपणांत? जे घाव मीं घेतले ते तू कधीं घेतलेस? जी वेदना मी भोगली, ती तूं कधी भोगलीस? ज्या संदेहांनी, शंकांनीं, दु:खभोगांनी मला व्याकुळ केले तीं कधीं तुझ्या वांट्यास आलीं काय? भंगलेल्या, तडकलेल्या व विद्रूप झालेल्या स्वप्नांचा, कल्पनांचा व श्रद्धांचा असह्य भार जसा माझ्या मस्तकावर आहे तसा तो तुझ्याहि मस्तकावर आहे काय? पुरत्या साडेतीन दशकांनीं उत्पत्तीचे, स्थितीचे व विलयाचे—वेदनेचे, विध्वंसाचे व अतृप्तीचे; उमलत असतांच उजाड होत जाणारे व वाढत असतांच वितळत राहणारे जें जग मला दाखविले तें उण्यापुऱ्या दोनच दशकाच्या आयुष्यांत तुलाहि दिसलें कल्पनेंतून जादूचें जग घडविणारे तुझें वय व उडून गेलेल्या जादूच्या कल्प-नेवर जगणारे माझें वय, हीं अखेर भेटतात तरी कुठें?

कल्पना—कल्पना! तुझ्याविषयी केवळ कल्पनाच करणें मला शक्य आहे. कशी दिसत असशील तू? कशी बोलत असशील? तुझा स्वर एखाद्या आलाप घेणाऱ्या बासरीसारखा असेल काय? का झंकार देणाऱ्या वीणेसारखा? तुझा वर्ण कसा असेल? केतकीसारखा सतेज आणि पतिगोरा असेल काय? की लाडिक सावळा? की गहिरा गुलाबी? की हिमशलाके-सारखा श्वेतगौर? तूं कोवळ्या कर्दळीसारखी असशील काय? की फुल-लेल्या पारिजातकाच्या डहाळीसारखी मोहोरदार? तुझे डोळे बारीक आणि सतेज आहेत काय? की काळे आणि गहिरे? आणि तुझा केशपाश? तो खरोखरच एखाद्या सळसळत्या नागिणीसारखा सतेज सडक आणि डसरा आहे का? आणि तुझ्या चेहऱ्याचा भाव कोणता? गंभीर? चंचल? हसरा? तरतरीत? शांत? की अगदींच सामान्य, अगदीच अपारदर्शक, अगदीच

बुद्धिहीन! तुझा वेष कसा असेल? सभ्य, शांत भारदस्त आणि तरीहि सुंदर,? थिल्लर, सवंग भडक आणि कंटाळवाणा? तुझें चालणें कसें आहे? तुझें बोलणें कसें आहे? तुझी आकृति कशी आहे? तुझा वेष कोणता आहे? तुझ्या चेहऱ्यावरचा भाव कोणता, तुझ्या शारीरिक व्यक्तित्वाचा गंध कोणता? काहीं काहीं मी तुझ्याविषयीं जाणत नाहीं.

गंमतीची गोष्ट आहे नव्हे? खरोखरच गंमतीची! आणि एकाद्या कल्पनाशील माणसास छेडणारी, रमविणारी अस्वस्थ करून सोडणारी. खरोखरच कोण आहेस तू? ह्याच नगरातील एका महाविद्यालयात जाणारी एक मुलगी—तरुण विद्यार्थिनींच्या अज्ञात अनामिक दशकांपैकी व शतकांपैकी एक. कोणा एका उद्यानांतील अनेक लतिकांपैकी एक लता. मांडवावर दाटलेल्या पर्णराजींपैकी एक पान. पण तुझा रंग कोणता? रूप कोणतं? गंध कोणता? पानाफुलांच्या गर्द राजींतून तुला निवडून दाखवील असें तुझें वर्णन कोणतें? गुण कोणता? पूर्ण प्रकाशांतून जाणाऱ्या माझ्यावर अज्ञाताच्या अवारणातील तुझ्याकडून एकदा आणि पुनश्च प्रहार झाला. फुलत्या शब्दांचीं पिसें व तरुण भावनांचें तळपतें टोक लावून तूं माझा लक्ष्यवेध केलास. काय व्यासपीठावर त्या सायंकाळीं उमटलेल्या माझ्याच शब्दांचे प्रतिध्वनित पडसाद तूं पत्ररूप केलेस? वयांत नव्हे अवस्थेंत नव्हे, पण खरोखरच तुझ्या व माझ्या मनोधर्मांत, वृत्तींत, काहीं मूलभूत साम्य आहे? एकाच मातीच्या आपण भिन्न बाहुल्या आहोंत काय? एकाच वस्तूच्या आपण दोन पडछाया आहोंत? आपलें मूलद्रव्य खरोखरच इतकें समान आहे काय की ज्यामुळें माझ्या वाचेंत, लेखनांत व व्यक्तित्वात तुझीच ओळख तुला पटावी! माझ्या ठायीं तुला स्वत्वाचा साक्षात्कार झाला, पण तुला खरोखरच मी कसें ओळखावें? तुझ्या पत्राने स्वतःच्या नांवाचें रहस्य तूं केलें नाहीस; पण तरीहि तूं माझ्या लेखीं केवळ नाममात्र व शब्दमात्र आहेस. केवळ दोन अक्षरांचें तुझें लाडिक नांव-बालिश मार्दवाचें लोभस लेणें ल्यालेलें. पण अखेर तें केवळ एक नांव

आहे. केवळ अक्षरांची जुळणी. केवळ शब्दांची बेरीज! जितकें तुझें नांव सुंदर तितकेंच तुझें आडनांवहि सुंदर आहे. पण त्या नांवाशीं सजीवतेने संबद्ध असणाऱ्या तुला मी नुसत्या डोळ्यानेंहि कधीं पाहिलें नाहीं. तुझें नांव माझ्या लेखीं कोणाहि हाडामासाच्या पुतळीशीं एकरूप झालेलें नाहीं. तुझ्या नामोच्चाराने किंवा नामस्मरणाने तुझा रंग, रूप, आकृति ह्यांपैकीं कशाचाहि मला बोध होत नाहीं.

तुझ्या नांवाचीं अक्षरें मी जाणतों; पण तू जशी आहेस तशीच तुला क्षणार्धांत मनोमन साकार करण्याची किमया, तुझ्या अज्ञात आकृती-पासून तुटून मजपर्यंत तरंगत आलेल्या तुझ्या नांवाच्या अक्षरांत नाहीं. तुझें केवळ नांव कोरलेल्या एखाद्या वस्तून मला तुजविषयीं जितकें डिवचावें किंवा सांगावें, जवळपास तितकेंच तुझ्या पत्रानेंहि मला तुजविषयीं सांगि-तलें व डिवचलें. ह्या नगरांतील कोणत्या भागांत तुझें वास्तव्य आहे तें पहिल्या पत्रावरील टपालाच्या शिक्क्याने मला सांगितलें. महाविद्यालयांचे उपान्त्य वर्गच आज चालू आहेत व उपान्त्य वर्गाचीच तूं विद्यार्थीनी आहेस, हें ओळखणें विद्यार्थीजीवन मनसोक्त जगलेल्या मला खरोखरच कठीण होतें काय? तुझें विद्यालय व तुझ्या निवासाची अस्पष्ट दिशा—बस! इथेंच सीमेची रेषा ओढून तुझें नाममात्र अस्तित्व अज्ञाताच्या गर्दराईत लुप्त झालें आहे. अज्ञात! हें सारें मला तुझ्याविषयीं माहीत असूनहि अज्ञात? होय, खरोखरच अज्ञात. तुझ्या इच्छेचा स्पष्ट ठसा घेऊन उमटलेली ही मर्यादेची रेषा मी मोडून टाकू का? सहज अंगास सारतां येण्यासारख्या ह्या अज्ञाताच्या विरल पटाचा मी भेद घेऊं कां? अभेद्य व अबोध वाटणाऱ्या तुझ्या नांवाच्या अक्षरांतून तुझें चालतें बोलतें अस्तित्व मी शोधून काढूं का? रंगीत शब्दांच्या मुखवट्यामागे दडलेला तुझा चेहेरा मी उचलून पाहूं का? तशी तुझी इच्छा नसावी. नाहीतर कशासाठीं ही मर्यादेची अनामिक रेषा? हें अपरिचयाचें सहज भेदून टाकतां येण्यासा-रखें गूढ कशासाठीं? तूं मला ओळखावेंस, पण मी तुला ओळखूं नये; तूं

मला पाहावेस, पण मी तुला पाहूं नये, माझ्या आकृतीचा, स्वराचा व्यक्तित्वाचा तुला परिचय असावा, पण तुझा स्वर, तुझी आकृति, तुझें साकार व्यक्तित्व मला अपरिचितच असावें, असेंच तुझें इंगित आहे काय? तसे असेल, तर तेथेच आणि म्हणूनच मी थांबलों आहें. तुझ्या निःशब्द सूचनेने, इंगिताने गूढप्रियतेने व माझ्या सुजनतेने, सत्प्रवृत्तिनें व नैतिकतेने मला जागीच खिळवून ठेवले आहे. म्हणूनच सीमेच्या ह्या मानरेषेवर मी तटस्थ आहे. म्हणूनच निरागस विश्वासाने घेतलेलें हें विरल अवगुंठन भेदून टाकण्याचा अल्प प्रयासहि मीं केला नाहीं. म्हणूनच हलक्या हातांनी अज्ञाताच्या खिजवणाऱ्या प्रांतांत मला जखडून ठेवणारे हे दुबळे पण तरीहि दुर्दम पाश मीं तोडून फेकले नाहीत. किती सोपें—तुझ्या रहस्याचा टाव घेणे खरोखरच किती सोपें आहे, आणि तरीहि मानधन पौरुषाला किती कठीण! तूं मला भेटूं शकली असतीस पण भेटली नाहींस; बोलूं शकली असतीस पण बोलली नाहीस; परिचित असतीस; पण परिचित नाहींस. तर मग तूं जें केलें नाहींस ते मी तरी कसा करीन? तुझ्या रहस्याचा भेद घेण्याची सर्व साधने माझ्या हातीं देऊन मजवरच जणू ते रहस्य राखण्याविषयीं तूं निर्भयपणें विसावली आहेस. तुला शोधण्याचा, तुला पाहण्याचा, तुझ्या नांवाला तुझ्या अज्ञात आकृतीशीं एकाकार करण्याचा प्रत्येक मार्ग तू मोकळा ठेवला आहेस आणि म्हणूनच अतिशय दुर्लंघ्यपणे तू तो बंदहि केला आहेस. आणि तरीहि पूर्ण प्रकाशांत असणाऱ्या मजवर अज्ञाताच्या अंधेरांतून पेटत्या शब्दांचे बाण तूं फेकले आहेस. तुझ्यासाठीं मी साकार परिचित व ज्ञात असावें व माझ्यासाठीं मात्र तूं निराकार, अपरिचित, व अज्ञात असावेंस अशीच जणू तुझी इच्छा आहे. मी तुला आक्रोशून विचारतों, कीं कोणता न्याय आहे ह्यांत? काय तुझा माझ्यावर अधिकार? तुझा पत्रप्रहार मी काय म्हणून बांधल्या हातानें झेलावा? तुझा शाब्दिक संबंध जोडण्यापूर्वी, तुझें नातेंमानण्यापूर्वी तुझे शब्दप्रहार झेलण्यापूर्वी, सन्मान्य परिचयाच्या समान भूमिकेवर तरी आपण असावयास नको

काय? कां म्हणून मी तुला पाहूं नये? कां म्हणून शोधूं नये? कां म्हणून भेटूं नये? कां–कां–कां?

खरोखरच कोण आहेस तूं? कशी दिसतेस? तुझ्या आकृतीचें वर्णन काय? तुझे रंग रूप कोणतें? तुझा स्वर मृदु आहे कीं कर्कश? तुझा भाव कठोर आहे कीं कोमल, तुझी वृत्ति चंचल आहे की स्थिर, तुझ्या अर्थपूर्ण आणि तरीहि अर्थशून्य नांवावर मी कोणती कल्पना बसवूं? त्या स्त्रीरूप कल्पनेला कोणतें रूप देऊं, कोणता रंग देऊं, कोणता डौल, कोणता आकार, कोणती वृत्ति देऊं, म्हणजे ती तुझ्याशीं एकरूप होईल? म्हणजे निराकारातून साकार व शब्दमात्र निर्जीवांतून तूं सजीव होशील? मला वेधून बसलेल्या अनेकाकार व निराकार कल्पने, सजीव शरिरानें माझ्यापुढें उभी राहा. कल्पनारूपानें नव्हे, शब्दरूपानें नव्हे, तर तुझ्या वास्तव स्त्रीरूपाने. ते रूप मी ओळखूं शकेन, त्या रूपाशीं मी नातें सांगेन. वंद्य अथवा निंद्य, आकर्षक अथवा असह्य, असें तेच रूप मला वाटेल. कोणतें आहे तुझें रूप? निराकार कल्पनेचा नव्हे साकार सजिवाचा मला वेध लागला आहे.

अपरिचित कुमारिकांच्या साऱ्या सृष्टीवरच जणूं आज तुझ्या पडछाया पडल्या आहेत. प्रत्येक स्त्रीरूपांत आज मी तुझें प्रतिबिंब पाहतों. ही तर नसशील ना तूं? किंवा ही, किंवा ही? पेटून उठलेली माझी कल्पना तुझींच चित्रें काढत बसते व फाडत बसते. उद्यानांत, चित्रमंदिरांत, सभास्थानीं, राजमार्गावर, कोणाहि अपरिचित मुलीचें अस्तित्व हे तुझेंच अस्तित्त्व तर नसेल ना, वा कोणाहि विद्यार्थिनीची दृष्टी ही तुझीच दृष्टी नसेल ना, ह्या शंकेने मी वारंवार दचकतों. खरोखरच हा केवढा अन्याय आहे! माझा चेहेरा, स्वर, आकृती, अभिरुची हीं सारीं तुला परिचित आहेत. तुझे डोळे मला पाहतील आणि ओळखतील. पण माझे डोळे अगदीं तुझ्यावरून फिरतील आणि तरीहि ते तुला ओळखणार नाहींत. तूं माझ्या अगदीं समीप असशील, दृष्टीसमोर असशील, माझी प्रत्येक हाल-

चाल निरखीत असशील, आणि तरीहि माझे उघडे डोळे शून्य अज्ञाताच्या सृष्टींत तुला पाहूनहि पाहणार नाहींत. शब्दरूप झालेल्या तुझ्या मनाशीं ओळख ठेवणारा मी, तुझ्या शरीराकृतीविषयीं मात्र अंधःकारांतच राहीन. तुझ्या दृष्टीनें मी साकार असेन पण माझ्या दृष्टीनें मात्र तूं केवळ देह नसलेल्या आत्म्यासारखी, शब्द नसलेल्या भावनेसारखी, सत्त्व नसलेल्या कल्पनेसारखी, निराकार अमर्याद व अशरीरीच राहशील.

अभेद्य प्रस्तरासारख्या दाटून बसलेल्या ह्या अज्ञातांतून क्षणार्धांत तुझी सजीव मूर्ति कोरून काढण्याचीं साधनें, खिजविणाऱ्या, खट्याळ, पण अमर्याद विश्वासानें तू माझ्याच हातीं सोपविलीं आहेस व माझ्याच मनामनानें निर्माण झालेल्या मानतंतूनीं माझेच हात बांधून ठेवले आहेस. आणि ह्या अवस्थेत माझ्याशीं शब्दांचें नातें जोडण्याचा, मजवर पत्रप्रहार करीत राहण्याचा तुझा आग्रह आहे. खरोखर काय म्हणू मी तुला? निरागस? नाटकी? कोमल? कठोर? अदूरदर्शी? चतुर? बालिश? मर्यादशील? मृगयाप्रिय? आत्मवंचक? परपीडक? काय म्हणूं? कसें म्हणू? कोणत्या आधारावर म्हणू? मी तुला पाहिलें नाहीं, मी तुला जाणतच नाहीं. पत्र? केवळ तुझे पत्र! ज्यावरून तुझे डोळे फिरले, ज्याला तुझे हात लागले, जें तुझा स्पर्श जाणतें, आकार जाणतें, जें तुझ्यापासून निघालें व मजपाशीं आलें, असें केवळ तुझें पत्र मात्र मजपाशीं आहे. त्या पत्राला मी पुन्हा पुन्हा स्पर्श करतो. तें पत्र मी पुन्हा पुन्हा न्याहाळतों. जणू त्या स्पर्शानेंच मला तुजविषयीं स्पर्शज्ञान होणार आहे. जणू त्या पत्राचा आकार न्याहाळूनच मला तुझ्या आकृतीचा बोध होणार आहे. तुझा अपरिचित स्पर्श घेऊन व तुझी अज्ञात आकृती पाहून ते पत्र मजपाशीं आलें. पण मी जें जणू इच्छितों त्याविषयीं तुझें पत्र अबोल आहे. तरुण, तीव्र, भाबड्या, असंबद्ध, कूट, काव्यमय रंगांचा संमिश्र प्रकाश फेकत अनिर्बंध भावनेच्या प्रवाहावरून वाहात जाणारे शब्दांचे पेटते दिपक! त्यांनीं तुझ्या व माझ्या हृदयांतील अंधेर अधिकच गडद केला आहे. बुद्धि अधिकच बधिर बन-

विली आहे. पिसाट वेगानें इतस्ततः धांवणाऱ्या कल्पनेस अधिकच अंधता दिली आहे. तूं माझ्याविषयीं कांहींतरी जाणलें असशील पण मी मात्र तुजविषयीं कांहींहि जाणलें नाहीं. नुसता बाह्याकारहि नाही, मग अंतरंग कोठलें? पिपासु मधमाशांच्या थव्याप्रमाणें गुंगत घोंघावत जाणाऱ्या तुझ्या धावत्या अक्षराच्या तिरप्या गवाक्षांतून वारंवार व जागोजाग मीं डोकावून पाहिलें. आणि त्यांतून मला काय दिसलें? अस्पष्ट, तीव्र, कोलाहलपर भावनांचा, इच्छांचा, जिज्ञासांचा, अबोध गोंधळ! अज्ञातालाहि अधिकच अस्पष्ट बनविणारा. दूरस्थाला अधिकच दूर लोटणारा. त्यांतून तुझें सुस्पष्ट रूप मला कुठेंच दिसले नाहीं. छटामात्रानेंहि तू तें कोठें प्रदर्शित केले नाहींस. कदाचित् तुझें रूप कोणतें, हें स्वतः तूच जाणत नसशील. ज्या तुला मी जणू इच्छितों, ती तूं स्वतःलाच जाणत नसशील. तर मग शब्दमालांच्या स्फटिकातून तुझ्या अंतरंगाचें प्रतिबिंब तरी तूं मला कसें दाखविणार? आणि तरीहि तू माझ्याशीं नातें सांगतेस? एकाच आत्म्याचें, एकाच वेदनेचें, एकाच मातीचें नातें! आणि त्या मानीव नात्याच्या बळावर तू माझा वेध घेतेस! मला छडतेस, अस्वस्थ करतेस! अदृश्य रूपानें टाळी वाजवून भुलावत नेणाऱ्या यक्षकन्येप्रमाणें वायुरूप असणाऱ्या तुझ्यामागे उभारलेल्या बाहूंनीं मला भटकत ठेवतेस. माझें खिजलेले कुतुहल व डिवचलेली कल्पना, धापा टाकत तुलाच शोधत बसते. खरोखर, तू आहेस तरी कोण? तुला मीं पाहिलें नाही. तुला मी ओळखत नाहीं. तुला मी पाहीन व ओळखेन, तर कदाचित् तुला विसरेन तरी! पाहण्यासारखें व ओळखण्यासारखें तुझ्यांत कांहीं नव्हतें हें तरी मग मला कळेल. पण आज मात्र माझ्या बहुरंगी कल्पनेवर तुझ्याच मुद्रा आहेत. तुझाच अधिकार आहे. तुझ्या पासून वेगळें असें माझ्या कल्पनेला अस्तित्व उरलें नाहीं, कार्य उरलें नाहीं. तुला कोणता सुगंध आवडत असेल? तुला कोणता रंग प्रिय असेल? तुझें निवासस्थान कसें असेल? तुझ्या बुद्धीची उंची आणि भावनांची खोली किती? तुझें दर्शन प्रिय

असेल की अप्रिय? तूं–तूं–तूं! तुला मीं पाहिलें नाहीं. ह्याच नगरांत अगदीं जवळ, हाताच्या टप्प्यांत असूनहि तुला मीं पाहिलें नाही. तुला मी ओळखत नाहीं. हीच जाणीव सतत मला दंश करीत आहे.

निळसर रेषांनीं आखलेल्या वहीच्या पानावर लिहिलेल्या तुझ्या पत्राच्या पानापानातून व शब्दाशब्दातून तुझा शोध घेताना अज्ञाताची ओढ ठेवणाऱ्या अतृप्त कुतूहलाचा ताण मला असह्य होतो. निघू का आताच? पाहू तुला? शोधू तुला? भेटू तुला? भेदू का हा अज्ञाताचा विरल पट? एकाच झटक्यात टाकू का ही मानीव मर्यादा मोडून? संशयास्पद अर्थाच्या तुझ्या शाब्दिक सूचकतेनें का म्हणून मी स्वतःला बांधून घेऊं? उत्कट, निष्काळजी, बेभान, चालत्या कुतूहलाची चुटपुटती खूण शोधून त्यामागे दौडत असतां आनंदाने मान मोडून घेणारें माझें तारुण्य अद्याप माझ्या मनामनांत जागृत आहे. तेंच मला डिवचून सांगत आहे की हा अज्ञानाचा पट फाडून टाक. ह्या मर्यादा मोडून टाक. हा कल्पनेचा असंतोष काय म्हणून? उठ आणि जा प्रत्यक्षाला सामोरे. कर निराकार आहे ते साकार; आणि दे त्याचे पडेल ते मूल्य!

उठू का आताच? निघू का आताच! येऊं का आतांच? आणि शोधू तुला? पाहूं तुला? भेटू तुला? त्या ईर्षेनेंच मी निघालों, तर तुझ्या मार्गावरचें प्रत्येक झाड, प्रत्येक दगड बोलता होईल... पण हें मी काय म्हणतो आहे? आव्हानाच्या आविर्भावानें तूं मला कधीं लिहिलें होतेस? हे आव्हान तर माझें मींच उत्पन्न केले आहे. ही देखील माझीच कल्पना आहे. कल्पना... कल्पना... कल्पना...

ठीक तर मग, तू कल्पना बनून आलीस, कल्पना म्हणूनच राहा. मी तुला पाहण्याचा प्रयत्न करणार नाहीं, शोधण्याचा नाहीं, भेटण्याचा नाही. तुला पाहणे, म्हणजे कल्पनेस शरीर देणें, अमर्यादास मर्यादित करणे. तुला भेटणे म्हणजे जें बहुरंगी, चेतनामय व प्रवाही आहे, त्यास स्थिरता देणे, जडता देणें, एकदेशीय करणे. एका विशिष्ट वर्णाशीं, स्वराशीं व

आकाराशीं तुला बद्ध करण्याचा हव्यास मी काय म्हणून धरूं? स्वप्न म्हणून ज्या स्त्रिया माझ्या कल्पनाचक्षूंपुढें तरळत होत्या, त्यांना माझा स्पर्श होतांच त्यांची माती झाली. त्या स्वप्नांची माती झाली. त्या चेतोहर स्त्रीकल्पनांची माती झाली. तुझ्या कल्पनेला मी मातीचें बंदिस्त शरीर दिलें, आणि त्या बंदिस्त थडग्यांत तुझीच माती होऊन पडली तर? जिला देवता मानलें ती क्रव्यादा निघाली तर? जिला निरागस मानलें, ती नटवी निघाली तर? जेथे कोमलतेची अपेक्षा केली तेथें कपटी कैतव गवसलें तर? जेथे अंतर्बाह्य सौंदर्याचें बहुरंगी स्वप्न पाहिलें, तेथे सर्वव्यापी कुरूप-तेचें करटें दृश्य दिसलें तर? माझ्या आकाशगामी कल्पनेच्या मापानें तूं थिटी भरलीस तर? स्वप्नें साकार करतांना, दिव्य कल्पनेस जड वास्तवाचें शरीर देतांना आजवर जें प्रांय झालें, तें अट्टाहासानें पुनश्च मी कां करूं?

तर मग मी तुला भेटणार नाहीं. तुला पाहणार नाही. तुझा शोध घेण्याचा लवभरहि प्रयास करणार नाहीं. क्षणाक्षणाला नव्या सौन्दर्यानें नटणारी चिर अनामिक चिर अपरिचित कल्पना म्हणूनच मी तुला आमरण वागवीन. मी तुला कधींहि सशरीर पाहणार नाही व म्हणू-नच कधीं विसरणार नाहीं. जेथें परिचयाची, प्रत्यक्षाची तृप्ति आहे, जेथें स्वप्नभंगाचा विटलेला तिरस्कार आहे, तेथेच विस्मृतीचा संभवहि आहे. पण एक अतृप्त, अपरिचित, अमर्याद, सदासुंदर कल्पना म्हणूनच मजपाशीं तूं राहशील. कधीं मी तुला हा वेष देईन तर कधीं तो. कधीं मी तुला एक चैतन्य देईन तर कधीं दुसरें. कल्पनेच्या वैभवासच शक्य अशा नूतन वैचित्र्यानें नटलेल्या आभरणांनीं मी तुला सतत सजवीत राहीन. चकाकत्या शब्दांच्या दर्पणमालेंत तुझीं अगणित रूपें सदा नूतन सौंदर्यानें मी निर्माण करीन. तुलाच स्तिमित करतील, इतकीं तुझ्या कल्पनेचीं असख्य सौन्दर्यें मी शब्दांच्या संगमरवरांतून कोरून काढीन. ह्या क्षणीं मी तुला एक माधुर्य देईन तर दुसऱ्या क्षणीं दुसरें. ह्या क्षणीं मी तुला एक रूप देईन तर दुसऱ्या क्षणीं दुसरें. जितकें माझ्या

कल्पनेचें सौन्दर्य तितकेंच तुझेंहि सौन्दर्य. जितकीं माझ्या कल्पनेचीं रूपें तितकींच तुझींहि रूपें. जितकें माझ्या कल्पनेचें तेज, उंची, लालित्य, काव्य, चारुता, तितकी तुझी. जो मी घालीन तोच तुझा वेष. जो मी देईन, तोच तुझा आकार. जो मी सांगेन तोच तुझा स्वर. कधीं तुला बालिश बनवून मी तुझ्याशीं खेळेन, कधीं गांभीर्यानें तुझ्याशीं बोलेन, कधीं लुब्धपणें तुझ्याशीं रमेन, कधीं तुझ्या उदात्त उंचीला वंदना देईन. कल्पना—कल्पना केवळ अनामिक, अमर्याद, बहुरंगी कल्पना म्हणूनच तू मजपाशीं राहशील.

शब्दरूप कल्पना म्हणून तूं मजकडे आलीस, शब्दरूप कल्पना म्हणूनच मजपाशीं राहा. अमर्याद कल्पनेचें मर्यादित मूळ मीं कां शोधावें? कोणा एका देहाशीं, कोणा एका वृत्तीशीं, कोणा एका रूपाशीं व त्या साऱ्यांच्या अप्रिय, अनाकर्षक मर्यादेशीं तुला बद्ध करण्याचा मोह मला कां व्हावा? त्यापेक्षां हें रहस्यमय अज्ञानच किती प्रेरक, किती खिजविणारें, किती सृजनशील आहे! जोंवर तूं अज्ञान आहेस तोंवर हें कुतूहल आहे, तोंवर हें काव्य, तोंवर हें स्वप्न व अतृप्त जिज्ञासेनें जळणारा व जाळणारा हा तुझा माझा अनामिक संबंध! त्या संबंधास कांटेरी कुंपणें घालणारें प्रत्यक्ष मी कशासाठीं शोधूं!

तुला मी कधींहि पाहाणार नाहीं. कधींहि भेटणार नाहीं. तुझ्या बाह्याकाराशीं परिचित होण्याचा अल्प प्रयासहि माझ्याकडून आतां होणें नाहीं. आणि तरीहि तुझी कल्पना माझ्या स्मृतींत सदैव जागृत राहील. माझ्या लेखीं तूं साकार अशी कोठेंच नाहींस, आणि म्हणूनच सर्वत्र आहेस. व्यासपीठापुढील अग्रिमपंक्तींतून दिसणाऱ्या स्त्रियांच्या कुंजांतील तुझ्या अपरिचित अस्तित्वाच्या कल्पनेनें आता मी सदैव शंकित व कंपित होईन. जेथें मी आहें त्या पटगृहांत तर तूं नसशील? मार्गावर तर तूं नसशील? थव्यानें जाणाऱ्या विद्यार्थिनींच्या अपरिचित मेळाव्यांत तर तूं नसशील? कधीं तूं मला पाहशील, व कधीं पाहाणार नाहींस; पण तुझ्या अज्ञात

अस्तित्त्वाची जागती कल्पना मला मात्र सदैव रोमांचित ठेवील. कारण माझ्या लेखीं तूं एक साकार स्त्री नाहींस. साऱ्या स्त्रीजातीइतकी अथवा त्याहूनहि अमर्याद, अशी निराकार कल्पना आहेस. आणि तशीच तूं राहा! स्नेहाचें नव्हे, वात्सल्याचें नव्हे, प्रेमाचें नव्हे, परिचयाचें नव्हे, हेंच तुझें माझें नातें!

तुझ्या पत्राचें व तुझ्या पत्रास प्रेरक झालेल्या माझ्या वक्तृत्त्वमय साहित्याचें हेंच पारितोषिक व हेंच समाधान. तुझे पत्रमय शब्द मीं चेतविले व तूं चेतवून ठेवलीस माझी कल्पना! कल्पना म्हणून आलीस, कल्पना म्हणूनच मजपाशीं राहा. तुझा तरुण देह पाहाण्याची इच्छा मी कशासाठीं धरूं? तूं यथाकाल बालिकेची युवती, युवतीची पुरंध्री, व पुरंध्रीची वृद्धा होशील. तुझ्या शरिरास वार्धक्य येईल, विकलता येईल, अवांच्छनीय अशी कुरूपता येईल. पण माझ्या कल्पनेंत मात्र तूं चिरतरुण, चिरसुंदर अशीच राहशील. वार्धक्य तुला असेल पण तुझ्या कल्पनेस नाहीं. कुरूपता तुला असेल पण तुझ्या कल्पनेस नाहीं. स्वप्नभंग प्रत्यक्षांत आहे, कल्पनेंत नव्हे. अपेक्षाभग वास्तवांत आहे, स्वप्नभूमींत नव्हे. माझ्या वक्तृत्त्वांत व साहित्यांत पाहतेस, तें तूंच निर्माण केलेले माझें कल्पनारूप! त्याच्याशींच तूं नातें सांगत आहेस. तुझा जीव जडला आहे त्यावरच, पत्रप्रहारहि तूं त्यावरच केला आहेस. त्या कल्पनेविषयींच तुला मोह आहे, अपेक्षा आहेत. मोहकता, आकर्षण, अपेक्षा, कल्पनेसच कल्पनेकडून असतात. प्रत्यक्षाच्या कुरूप व दाहक स्पर्शानें त्यांची रक्षा होते. तर मग अज्ञान कल्पने, आकार घेऊं नको, परिचित होऊं नको, अंतर तोडूं नको, कल्पना म्हणून तूं मजकडे आलीस; कल्पना म्हणूनच तूं मजपाशीं राहा! कल्पनेच्या उभय निर्मिति—तुझ्या आणि माझ्या—कल्पनेच्या जगांतच काय त्या संलग्न होऊं शकतील, संपूर्ण होऊं शकतील. अतृप्तींतील तृप्ति, असमाधानांतील समाधान, अपूर्णांतील पूर्णता व कुरूपतेंतील सौन्दर्य, केवळ तेथेच काय तें आहे!

—"मनोहर" एप्रिल १९४९

" पंचवीस सहस्र–पंचवीस सहस्र– पंचवीस सहस्र– " 'इलस्ट्रे-टेड वीकली' मधला तो पंचवीस सहस्रांचा कोड्याच्या पारितोषिकाचा आंकडा श्रीधरच्या डोळ्यांसमोर गर्विष्ठ बेडकांच्या एखाद्या रांगेप्रमाणें सारखा फुगतच चालला होता. भालू बोलत होता त्याकडे त्याचें विशेष लक्षच नव्हतें.

" Sorry old boy ! पण मी तरी काय करूं? मलाच मोठ्या कष्टानं ह्या विमामंडळीच्या कार्यालयांत रात्रीपुरती झोंपायला मान्यता मिळाली. आणि तेसुद्धा कायदेशीर नाहीं. उगीच त्या पिंगेची आणि आपली मैत्री होती म्हणून..."

..." ठीक आहे, ठीक आहे..." श्रीधर कुठें तरी पहात म्हणाला, " Don't you mind it ! इतक्या रात्रीं तूं मला इथं झोपायला जागा दिलीस हे काय थोडं झालं ?"–' पंचवीस सहस्र ! पंचवीस सहस्र !' त्याचें मन म्हणालें. " तर मग आज रात्रींपासून तुझी मिसेस इथें झोपायला येणार ? केव्हां, संध्याकाळच्या गाडीनं येणार त्या ? " श्रीधर म्हणाला.

" संध्याकाळच्या गाडीनं. दिवसा ती कामावर जाणार. संध्याकाळीं सकाळीं आम्हीं दोघहि कुठंतरी भटकून वेळ काढणार, आणि एखाद्या हॉटेलांत जेऊन रात्री ह्या मशिदींत झोपायला येणार !"

" राइट ! " श्रीधर म्हणाला, " ह्यापुढं लेका, तुझ्या रात्री तरी अगदीं मजेंत जाणार ! "

श्रीधरनें थोडीहि कुरकुर न केल्यामुळें प्रसन्न झालेला भालू बाय-कोला दोष देत म्हणाला, " बाकी श्रीधर बायका म्हणजे एकंदरींत क्षुद्रच !"

पंचवीस सहस्र!—श्रीधरच्या मनांत आरोळी उठली व त्याच्या डोळयांसमोर मोठमोठ्या अक्षरांत तो आंकडा लिहिला गेला. "तसं नाहीं रे!" तो म्हणाला.

"तसं नाहीं तर कसं?" न आलेला राग स्वरांत दाखवीत भालू म्हणाला, "मी माझ्या वाइफला लिहिलं कीं, अजून चार दिवस तू माहेरींच रहा. इथं मुंबईत जागेची सोय लावायला वेळ लागेल. आणखी माझा मित्र श्रीधर रात्रीं माझ्याकडे निजायला येत असतो. तो सध्यां जरा पुष्कळच अडचणींत आहे. त्याचं जरा नोकरीचं जमूं दे. आणखीं मग तूं ये. आपल्याला नोकऱ्या तरी आहेत. पण त्याला बिचाऱ्याला तेंहि नाहीं. तशांत रात्रीचा निवारासुद्धां नाकारायचा म्हणजे..."

"ठीक आहे ठीक आहे." श्रीधर घाईनें म्हणाला, "तुझ्या मिसेसचं म्हणणं ठीक आहे. तुझं लग्न होऊन चार महिने नाहीं झाले, मला वर्षभर जॉब नाहीं मिळाला, तर वर्षभर दूर रहायचं का काय त्यांनीं तुझ्यापासून? वास्तविक मला फटिंगालाच लाज वाटायला पाहिजे, तुम्हांला इतके दिवस दूर ठेवण्याविषयीं."

मलबार हिल आणि मरीन ड्राइव्हला एकूण चार इमले असलेल्या माणसाच्या अवसानानें श्रीधर म्हणाला.

भालू थोडासा खरोखरच गहिंवरला आणि थोडासा आनंदानें गहिंवरला आणि म्हणाला, "श्रीधर..."

"ठीक आहे भालू, चलतों मी आतां. Thank you for everything. आणखी माझी ती पेटी मात्र राहूं दे सध्यां इथंच. त्या आपल्या ध्यानं मला सांगितलं आहे, तेवढं जमलं कीं ती मी घेऊन जाईन."

"पेटी वाटेल तितके दिवस राहूं दे." भालू घसा स्वच्छ करून म्हणाला, "आणखीं हें पहा—" भालूनें खिशांतून पैशाचें पाकीट आणि त्या पाकिटांतून एक दहाची नोट काढून पुढें पाऊल टाकलें.

" भालू–यू भाल्या ! " जान डी रॉकफेलरनें डॉलराबिलाकडे ज्या तुच्छतेनें पहावें तसें पहात श्रीधर म्हणाला, " माझा अपमान करायचा आहे होय तुला ? "

" श्रीधर, हे पैसे तूं घेतले नाहींस तर तो मी माझा अपमान समजेन. तुझे शेवटचे पैसे तूं त्या वीकलीच्या कोड्याच्या प्रवेशमूल्यासाठीं वेचलेस, तें मला माहीत आहे. प्रेमानं देतों आहे, घे. "

पंचवीस सहस्र ! श्रीधरच्या मनांत गिल्ला झाला. भालूनें बळाबळानें दहाची ती नोट श्रीधरच्या मळक्या खिशांत कोंबली. लाथा झाडणाऱ्या मुलाच्या तोंडांत बळानें कुणी खडीसाखर घातल्यावर त्यानें जसें तोंड करावें तसें श्रीधरनें तोंड केलें. भालू पुढें म्हणाला, " का रे श्रीधर, मग तूं त्या आडव्या चौकटींत अखेर कोणता शब्द घातलास ? dream कीं cream ? "

" ड्रीम " श्रीधर म्हणाला, " दुसरा कोणता शब्द तिथं चालाय-चाच नाहीं मुळीं. नमस्ते भालू. "

" नमस्ते श्रीधर. " श्रीधरच्या पाठीवर थाप मारून भालू म्हणाला, " एक दिवस तुला त्या कोड्याच्या स्पर्धेत फटकन पंचवीस सहस्र मिळून जातील आणि आम्ही मात्र बसूं दीडशें एके दीडशें करीत ! "

ह्या क्षणीं खिशांत पंचवीस सहस्र असणाऱ्या माणसानें दीडशें रुपये असणाऱ्या माणसाकडे पाहून मान हलवावी, तशी श्रीधरनें हसून मान हलविली आणि खोलीच्या दारावर फिरंगी बाप्तिस्मा घेऊन अवतरलेल्या, जांभेकर मंडळीच्या 'जॅम–ॲण्ड बेकर' ह्या विनोदी पाटीकडे धांवती दृष्टि टाकून तो सरसरा जिना उतरून गेला. पंचवीस सहस्र ! पंचवीस सहस्र ! पंचवीस सहस्र ! पायरीपायरीगणिक श्रीधर घोकत होता.

मार्गानें चालतां चालतां त्या पंचवीस सहस्रांच्या व्ययाचा व वाटणीचाच प्रश्न श्रीधरचें डोकें खात होता. वास्तविक पाहतां आज रात्रीपासून त्याच्या डोक्यावर रात्रीपुरतें देखील छप्पर उरलें नव्हतें.

नोकरी, चाकरी, लग्नकार्य, हे सारे क्षुद्र प्रश्न. त्या प्रश्नांपायीं तो व्यर्थ आपलें डोकें आतां बेजार करून घेणार नव्हता. नोकरी मिळण्यापेक्षां किंवा जागा मिळण्यापेक्षां कोड्याचें पारितोषिक मिळणेंच अधिक शक्य होतें. 'dream कीं cream' ह्या समस्येपेक्षां कोणतीहि जागतिक समस्या अधिक महत्त्वाची नव्हती. अर्थात् 'dream' च ! ह्या समस्येचें श्रीधरनें उत्तर देऊन टाकलें होतें. 'cream' (क्रीम) नव्हे, 'dream' (ड्रीम) ! तेवढें एकच उत्तर कोड्याच्या प्रस्तुत संदर्भांत शक्य होतें. पंचवीस सहस्र ! पंचवीस सहस्र ! श्रीधर मार्गानें झपझप चालत होता. त्याच्या विचारांच्या आंदोलनांच्या प्रमाणांतच त्याची गति कमीजास्त होत होती, चेहरा पालटत होता, व ओंठ हालत होते. 'ड्रीम' या अचूक शब्दाची निवड केल्यामुळें त्याला पंचवीस सहस्र मिळणार होते, नव्हे, ते त्याच्या अगदीं खिशांतच पडल्यासारखे होते, ह्यांत कांहीं शंका नव्हती. पण खरा कठीण प्रश्न होता, तो त्या पंचवीस सहस्रांच्या उपयोगाचा होता. त्या पंचवीस सहस्रांचें पुढें काय करायचें ?

सहज गांवदेवींतल्या एका शांत सुंदर बंगलीकडे श्रीधरचें लक्ष गेलें. त्या बंगलीला फिकट अस्मानी तेलरंग दिला होता. चारी अंगांनीं सुंदर बाग होती. गुलाली रंगाच्या फुलांनीं डंवरलेल्या एका बोगन वेलीची त्या घराच्या पितळी नामाक्षरांवर कमान झाली होती. आणि त्या घराचें नांव होतें, 'स्वप्नकुंज' !

छे: छे: ! मुंबईत तर सध्यां पंचवीस सहस्रांना असें घर मिळणें दुरापास्त होतें. श्रीधरला वाटलें : परंतु एखाद्या शांत छोट्याशा गांवांत मात्र त्यापेक्षां थोड्या कमीच रकमेंत एखादा टुमदार बंगला विकत घेतां येईल. जोडीला एखादें शेत घेतां येईल. एखादा लहानसा धंदा सुद्धां काढतां येईल. तर मग ठरलें ! प्रथम प्रवासाला निघायचें. छानदार वायुमान असलेलें एखादें छोटेसें तालुक्याचें गांव शोधून काढायचें-हो. गांव मात्र तालुक्याचा तरी पाहिजेच. टपाल, नळ, वीज, रेल्वे, औषधालय,

वाचनालय, सारे कांहीं तिथें पाहिजे. आणि असें गांव सांपडलें कीं, तिथें घ्यायची एकदम थोडीशी भुई, आणि टुमदार बंगली बांधायला सुरुवात करायची. पंचवीस सहस्रांतून जे कांहीं पांचसात सहस्र उरतील, त्यावर एखादा कोणता तरी धंदा काढायचा, नाहींतर शेती घ्यायची. आणखी मग नाटक सिनेमा पहात आणि पुस्तकें वाचत शांतपणें ...

छे : –छे : –छे : ! काय गाढव आहोत आपण, श्रीधरला वाटलें, पंचवीस सहस्र हातांत येतांच प्रथम लोकांची देणीं देऊन टाकलीं पाहिजेत एकदम. छोट्या छोट्या देण्यांचा नुसता बुजबुजाट झाला आहे. सध्यां खाणावळवाला, धोबी, शिंपी, आणखी एक डझन दीड डझन नातलगांची आणि मित्रांचीं किरकोळ देणीं घडाघड फेडून टाकलीं पाहिजेत. ऐटींत कॉलर वर करून प्रथम त्यांपैकीं प्रत्येकाकडे गेलें पाहिजे आणि नोटांची चळत खिशांतून काढून ती ओटांत धरत त्यांना ऐटींत विचारलें पाहिजे, '–हं. किती आहेत सांगा बरं तुमचे पैसे? सांगा जोशीबुवा, आमचं बाल किती जेवणाचं? पंचाहत्तर रुपये बारा आणे कवळ? बास? तीन महिन्यांचं येवढंच? हं–चला घ्या हे! आटपा! मला घाई आहे. 'एरॉस' मध्यें आधींच तिकीट काढून ठेवलं आहे. राहूं द्यात–राहूं द्यात ते चार रुपये चार आणे! तुमचे पैसे आमच्याकडे राहूं शकतात आणखी आमचे काय तुमच्याकडे राहूं शकत नाहींत वाटत? पुन्हां दर्शन? येऊं आतां एखाद्या आदितवारीं फांस्टला!'

आणि असेंच धोब्याला, असेंच शिंप्याला, असेंच किरकोळ घेणेकऱ्यांना! बाहेरगांवच्या मित्रांना तर खडाखड तारेनें द्रव्याज्ञा पाठवायच्या! अगदीं चकित होऊन जातील सगळे. पैशाची आशा सोडूनच मुळीं ते बसले असतील. आणि मग एकदम टपालवाला कानावरची लेखणी काढून त्यांच्या समोर उभा राहील. अगदीं फुकटचे पैसे आकाशांतून पडल्यासारखा त्यांना आनंद होईल. आणि कां होऊं नये बरं त्यांना तसा आनंद? निष्कांचन माणसें असतात हीं खालच्या मध्यम वर्गातलीं. आपण अगदीं

निकडीचा चेहरा केला, आणखी त्यांच्याहि पोटांत चांगुलपणाचा अंश होता, म्हणूनच त्यांनीं आपल्याला पैसे दिले. पारितोषिकाचा निर्णय प्रकट झाला आणि पंचवीस सहस्र हातांत आले कीं पहिलें काम ऋण वारून टाकायचें. सगळें मिळून पांच सातशें सुद्धां नसेल असेल.

——भ्यॉं–भ्यॉं–भ्यॉं! क–कर्रर! श्रीधर भानावर आला. जवळ-जवळ त्याच्या टांचेपाशींच ती पॅकार्ड गाडी उभी राहिली. गाडींत कुणी-तरी खूप तोंड ओठ रंगवलेली बाई होती. बहुतेक ती नटी असावी. सारथी कांहीं तरी बडबडला. ती मागच्या गादीवर बसलेली तरुण झग-झगीत बाई कांहीं तरी पुटपुटली. श्रीधरनें चटकन् एका अंगाला उडी मारली आणि तो त्या झपाट्यानें अदृश्य होणाऱ्या गाडीकडे पाहूं लागला.

...पॅकार्ड, स्टुडबेकर, हिलमन, मॉरिस, फोर्ड...! हो तर! पंच-वीस सहस्रांत गाडी निश्चितच घेतां आली असती. एक नाहीं दोन गाड्या घेतां आल्या असत्या. आणखीं त्या गाडींत बसायला एखादी ओट रंगव-लेली बाईसुद्धां आणतां आली असती.

पण नो–नो–नो–No! हीं लक्षणें पैशाची धुंदी चढल्याचीं आहेत. तें कांहीं आपल्याला मुळींच करायचें नाही. प्रथम आपल्याला देणीं देऊन टाकायचीं. आणि मग एक छोटीशी बंगली. त्यांत एक छोटीशी अभ्या-सिका, एक छोटेसे वाचनालय. मग कधींतरी गाड्या स्वस्त झाल्या, आणि लढाईपूर्वी आडगिऱ्हाईकी पांचसातशें रुपयांपर्यंत मोटारी मिळत असत, तशी एखादी छोटीशी 'ऑस्टिन' मिळालीच, तर मात्र ती अवश्य घ्यायची. आणि त्या गाडींतूनच मग निघायचें जगाच्या प्रवासाला. जगाच्या प्रवासाचें नाहींच जमलें, तर सारा हिंदुस्थान तरी पहाय-चाच. कितीतरी पाहाण्यासारखें आहे हिंदुस्थानांत. ज्या देशांत जन्म घ्यायचा, तो देश सुद्धां पुरता न पाहतां माणसाने मरावें, म्हणजे खरेंच केवढें दुर्दैव आहे! वास्तविक प्रत्येक माणसानें आपल्या देशाचा अगदीं

कोनाकोपरा पाहिला पाहिजे आणि मग म्हटलें पाहिजे. ' हा माझा देश. ज्याच्यावर मीं प्रेम करावें, असाच सुंदर हा देश आहे!'

"शे ऽ ऽ ट"

"काय?" आपण जणुं मोटारच्या गादीवरूनच बोलत आहोंत असें श्रीधरला वाटलें. एक तरुण भिकारी त्याच्यापुढें हात पसरून म्हणाला,

"कांहीं धर्म करा शेट."

"चांगला धट्टाकट्टा दिसतोस, आणि भीक मागतांना तुला लाज नाहीं वाटत?" खिशांतल्या दहा रुपयांच्या नोटेवर हात दाबून श्रीधर म्हणाला. त्या भिकाऱ्यानें स्नायूंची सराईत हालचाल करून चेहेरा अगदीं दीनवाणा केला व खपाटीं नेलेल्या पोटावर फाडकन् चापट मारून तो म्हणाला, "दोन दिवसांचा उपाशीं आहे शेट."

आपल्या गालफडांत कुणी चापट मारली, असें श्रीधरला वाटलें. धट्टाकट्टा असून काम नाहीं करत? कुठें होतें काम? घाईघाईनें श्रीधरनें खिशांत हात घातला आणि भालूनें त्याला दिलेली भिक्षेची नोट त्यानें त्या भिकाऱ्यापुढें धरली. "माझ्याजवळ मोड नाहीं बाबा." श्रीधर म्हणाला.

"मी देतों शेट." भिकाऱ्यानें कंबरेचा कसा सोडला. त्यांत कांहीं नाहीं तर पन्नास रुपयाची तरी मोड होती. त्या दोघांपैकीं खरा भिकारी श्रीधरच होता. आणि तो भिकारी मात्र होता पुंजीपति. श्रीधरचें पित्त चढलें आणि तो खेंकसला, "चल. आण परत माझी नोट. कांहीं तुला लाज नाहीं वाटत?"

आणि भिकाऱ्याच्या हातून नोट हिसकून तो ताडताड चालूं लागला. फुकटचे पैसे पाहिजेत ह्यांना—फुकटचे पैसे—फुकटचे पैसे. रागीट पावलांच्या तालावर त्याचें मन गुरगुरणारा ठेका धरूं लागलें. फुकटचे पैसे—फुकटचे पैसे—पंचवीस सहस्र! पंचवीस सहस्र! पंचवीस सहस्र!

—नाहीं. नाहीं, मुळींच नाहीं! मुळींच नाहीं. बंगला नाहीं, मोटर नाहीं, प्रवास नाहीं, कांहीं नाहीं. अरे स्वार्थी, आप्पलपोट्या माणसा, पंचवीस सहस्र हातांत पडतांच तूं प्रथम बंगला बांधणार काय? फुकटचे पैसे मिळतांच तूं एकदम चैनीला प्रारंभ करणार? मुळींच नाहीं—मुळींच नाहीं! मराठी शाळेंतले त्याच्या गांवचे त्याचे ते बोरकर मास्तर. बिचारे आतां आंधळे झाले होते. त्यांना प्रथम पैसा द्यायला पाहिजे होता. केवढा सज्जन माणूस—– किती उपकारी, पण आतां अन्नाला महाग झाला होता. म्हातारें वय, दृष्टि गेलेली, बायकापोरं सुद्धां नाहींत. "तुम्हींच सारीं माझीं पोरं" ते आपल्या विद्यार्थ्यांना म्हणत असत. पण कुणीएक त्या म्हाताऱ्याला विचारीत असेल तर शपथ. त्यांना पांच सहस्र तरी द्यायलाच पाहिजे होते. कांहीं फार दिवस काढायचे नव्हते त्या म्हाताऱ्याला आतां ह्या जगांत. पण आजकालच्या दिवसांत अकरा रुपये पेन्शन उपाशीं रहायला तरी पुरतें का माणसाला? आणखी आंधळ्या बोरकरांना अकरा रुपये मिळत होते. अरे हें का रामराज्य आहे अकरा रुपयांत पोट भरायला? देशपांड्यांच्या इथे श्रीधरचें वार होते. सीताकाकूंनीं वारकरी म्हणून कधीं त्याला कामाला लावलें नव्हतें. अगदीं आईसारखें प्रेम त्या माऊलीचें श्रीधरवर. आणखी आतां देशपांडे वकील मेले, देशपांड्यांचा सारा पैसा गेला, आणि लग्नाच्या नुसत्या चार उफाड्याच्या मुली सीताकाकूंच्या पदरीं राहिल्या. एकीचें तर कांहीं दिवसांपूर्वीं म्हणे...! राम-राम! वैऱ्यावर सुद्धां असा प्रसंग येऊं नये. सीताकाकूंनीं घातलेल्या अन्नाच्या एकेका घांसाचें मोल पंचवीस सहस्रांनीं होणार नाहीं. त्यांना पंधरा सहस्र दिले पाहिजेत—हो, पंधरा सहस्र तर खरेच. देशपांड्यांच्या वैभवाला शोभेल अशा रीतीनें सीताकाकूंच्या मुलींचीं लग्नं व्हायचीं तर निदान एकेकीच्या लग्नाला दहा दहा सहस्र तर खरे! पण आपल्या जवळ येणार नुसते पंचवीस सहस्र. आणखी आपल्यावर उपकार करून गेलेलीं माणसें किती तरी आहेत. त्यांपैकीं किती तरी दुःखांत आहेत, अडचणींत आहेत. पंचवीस

सहस्रांत किती लोकांचें दुःख आपण दूर करणार, आणि किती लोकांच्या अडचणी वारणार? पंचवीस सहस्र–पंचवीस सहस्र–छे: !

पंचवीस सहस्रांनीं भागणार नाहीं हें काम! भालूनें आपल्याला आज दहाची नोट दिली, ती पैसे परत येण्याच्या आशेनें थोडीच दिली? त्या दहावर निदान दोन पूज्यें तरी टाकून एक सहस्रांच्या नोटा भालूला आपण विवाह भेट म्हणून द्यायला पाहिजेत. इतके दिवस राहूं दिलें बिचाऱ्यानें. आतां मात्र त्यानें जायला सांगितलें, पण त्याला त्याचा उपाय नव्हता. अखेर भालू म्हणजे कांहीं कुणी दानशूर कर्ण नाहीं. माणूसच आहे साधा. पण तरी त्याच्या दहा रुपयांचे उपकार विसरतां येणार नाहींत. एक सहस्र रुपयांनीं सुद्धां त्या दहा रुपयांचें मोल करणें बरोबर होणार नाहीं. भालूला जास्त पैसे दिले पाहिजेत, सीताकाकूनाहि जास्त दिले पाहिजेत, बोरकर मास्तरांनाहि पण. आणि जोशी खाणावळवाल्याला सुद्धां, आणि आपल्याला स्वतःचे जुने कपडे देणाऱ्या हायस्कूलांतल्या नाटेकर मास्तरांना, आणि लहानपणीं आपण गांवच्या नदींत बुडत असतां आपल्याला वांचविणाऱ्या दशरथ धोब्याला आणि...! My God! दशरथ धोब्याला कसे विसरूं शकलों आपण! त्याचे एकट्याचे उपकार आपल्या पंचवीस सहस्रांनीं फिटणार नाहींत. जास्त पाहिजेत, जास्त पाहिजेत...लाख रुपये, निदान लाख रुपये––पांच लाख असल्यास उत्तमच ..

'...लाख––पांच लाख... लाख–पांच लाख!' ग्रँट रोडहून लोकलगाडी निघाली तेव्हां श्रीधरचें मन म्हणत होतें, 'लाख––पांच लाख,...लाख––पांच लाख...' गाडीचीं चाकेंहि तेंच म्हणत होतीं.

महालक्ष्मी स्टेशनवर बरेच लोक आंत आले. ते रेस मैदानावरून परत आले होते. आणि रेसच्याच गोष्टी करीत होते. आजच्या ट्रबल इव्हेंटमध्यें कुणाला तरी म्हणे एकदम चाळीस सहस्र मिळाले! कुणा रघुनंदन खोचर नांवाच्या माणसाला. आणि मग एकदम तिथें घोटाळणाऱ्या किरिस्तांव आणि अर्धांग्ल पोरींनीं त्याला घेरलें.

श्रीधरच्या डोळ्यांसमोर 'इलस्ट्रेटेड' मधला पंचवीस सहस्रांचा आंकडा फुगत गेला आणि फुटला. आणि मग तिथें दिसूं लागले—चाळीस सहस्र. खट्क—खाट खट्क खाट! गाडीचीं चाकें गरगरत होतीं. एक लाख—चाळीस सहस्र—एक लाख—चाळीस सहस्र!

श्रीधरच्या मेंदूचीं यंत्रें झपाट्यानें फिरत होतीं. पहिले पंचवीस सहस्र मुळीं कुणालाच द्यायचे नाहींत. बंगला नको, गाडी नको, सीताकाकू नाहींत, बोरकर मास्तर नाहींत, दशरथ धोबी नाहीं, नाटेकर नाहीं, आणि भालूहि पण नाहीं. ते सारे पंचवीस सहस्र खिशांत घालून शर्यती मैदानावर यायचें आणि जपून खेळायचें. फार जपून. नुसते पांच सहस्रच प्रथम खेळायला काढायचे. आणि पांच सहस्राचे करायचे एक लाख. म्हणजे जास्त नाहीं, दोन चार. ट्रेबल इव्हेंट जिंकलें कीं संपलें काम. अगदीं साऱ्या आयुष्याची ददात संपली. लाख मिळाले तरी मग बिलकूल चढायचें नाहीं. बिलकुल फुगायचें नाहीं. सरळ जाऊन बोरकर मास्तरांना लोटांगण घालायचें. सीताकाकूंचे पाय धरायचे. नाटेकरांना साष्टांग नमस्कार घालायचा. दशरथकडे जायचें, भालूकडेहि. आणि त्या साऱ्यांना म्हणायचें, 'हे घ्या—घ्या हे—ईश्वरानें मला दिले आहेत, तुम्हींहि घ्या! पैशानें हा श्रीधर पालटेल असं तुम्हांला वाटलं तरी कसं? तुमच्या उपकारांची अल्पस्वल्प फेड करणं परमेश्वरानं मला शक्य केलं, हे त्याचे उपकार!' उपकार आधीं फेडायचे, साऱ्यांचे उपकार आधीं फेडायचे. आपण ज्या शाळेंत शिकलों त्या शाळेंतल्या अकिंचन मुलांसाटीं शिष्यवृत्त्या ठेवायच्या. मुंबईत घर नसल्यामुळें जे वणवण फिरत असतील त्यांच्यासाटीं आसरा उत्पन्न करायचा, जे उपाशी असतील, त्यांना अन्न द्यायचें आणि त्या नंतर कांहीं उरलंच—

अन्नाच्या विचारानें श्रीधर थोडासा भानावर आला. सकाळपासून त्याच्या पोटांत कांहीं नव्हतें. उगीचच आपला तो इकडे तिकडे भटकत होता. ग्रँटरोडहून तो दादर बी. बी. स्टेशनवर उतरला, आणि तिथून

तो दादर चौपाटीवर येऊन बसला, तरी तो आपल्या तारेंतच होता. त्याच्या खिशांत केवळ दहा रुपयांची एक नोट होती. आणि दहा रुपयांची दुसरी नोट त्याच्यापाशीं कुठून आणि केव्हां येणार, हें त्याला माहीत नव्हतें. संरक्षणबुद्धीनें त्याचा हात मधूनच खिशावर जात होता. त्याला भूक लागली होती आणि त्यामुळें तो जास्तच झिंगला होता.

पंचवीस सहस्रांचा ढोबळ टंकांतला आंकडा त्याच्या मनश्चक्षूंपुढून गिरक्या घेत गेला. मग त्याचें स्वतःचें त्या पंचवीस सहस्रांचा जेता म्हणून प्रसिद्ध झालेलें हास्यमुख छायाचित्र. मग शर्यती मैदानावरचे घोडे बेफाम वेगानें धांवत गेले. व फळयावर आंकडा चढला--चाळीस सहस्र! पुन्हां त्याचें हास्यमुख चित्र अनेक सायंदैनिकांत प्रसिद्ध झालेलें त्यानें पाहिलें आणि घोळक्यानें त्याच्याभोवतीं गोळा झालेले वार्ताहर मखमली स्वरांत त्याला विचारूं लागले-'दैवानें तुमच्यावर अभूतपूर्व असा कटाक्ष टाकला. आतां ह्या द्रव्याचें काय करणार तें कृपा करून सांगाल का?'

"चना जोर गरम, चना जोर!' कानाशींच घुमलेल्या कर्कश आरोळीनें श्रीधरची तंद्री चाळवली. "चना जोर गरम, चना जोर!" पुन्हां तीच साद उठली. श्रीधरच्या तोंडाला पाणी सुटलें. त्याचा हात संरक्षणबुद्धीनें खिशावर गेला. त्याची दृष्टि चणेवाल्याच्या खोमच्यावर, तिथल्या हिरव्यागार मिरच्यावर आणि पिवळ्या धमक लिंबांवर थोडी रेंगाळली आणि मग साऱ्या वाळवंटावर इतस्ततः फिरूं लागली. कांहीं पोरें पलकिडेच वाळूचा किल्ला बांधून खिदळत होतीं. भेळ आणि गंडेरीवाल्यां-भोवतीं माणसांची वर्तुळें जमलीं होतीं. सारें वाळवंट रंगीबेरंगी कपड्यांनीं आणि चेहेऱ्यांनीं फुलून आलें होतें. दूर क्षितिजापाशीं एका कोळयाच्या बोटीचें शीड दिसत होतें. समुद्राला भरती येत होती आणि फुसांडत व थपडा मारीत लाटा पुढें पुढें येऊन फेसाच्या फवाऱ्यांत फुटत होत्या. सों-सों-खळ्ळ! सों-सों खळ्ळ! एक लक्ष-पंचवीस सहस्र! एक लक्ष-पंच-वीस सहस्र! पांच लक्ष-पचवीस सहस्र! सों-सों-सों-खळ्-खळ्-खळ्...

सतरा अठरा वर्षांची एक गोरीपान मुलगी दोन्ही हात पसरून लाटेला सामोरी गेली आणि तिच्या पायांवर लाट फुटतांच हर्षभरानें किंचाळली. तिचे कपडे ओले झाले. दुसरी लाट सरसरत रोंरावत पुढें आली आणि त्या लाटेला भेटण्यासाठीं जलकन्येसारखी दिसणारी ती मुलगी आणखी पुढें गेली. पुढें गेली आणि...पुढें गेली आणि...

...एखाद्या क्रूर कैदाशिणीप्रमाणें त्या विक्राळ लाटेनें त्या कोवळ्य पोरीला आंत ओढलें. एकच ओरडा झाला पण कोणींच पुढें होईना. श्रीधरला वाटलें, मग आपण पुढें झालों. आणि तिसरी बुचकाळी खाण्यापूर्वींच तें गोड ओझें आपण आपल्या हातावर तोलून धरलें. एखाद्या दंवानें ओलावलेल्या फुलांच्या गुच्छासारखी ती दिसत होती. पलीकडेच उभ्या असणाऱ्या तिच्या मोटारींत आपण तिला सोडलें व आपण तिचा निरोप घेऊं लागलों. "कुठें जातां?" ती खालीं मान घालून म्हणाली, "या देहाला आजवर कुणाचाच स्पर्श झाला नव्हता. जे प्राण तुम्हीं वांचवलेत ते ह्यापुढें तुमचेच आहेत. पिताजींची मी एकुलती एक मुलगी आहें. आणि ते मला कधींच कशाला नाहीं म्हणत नाहींत. मी बुडालें असतें तर त्यांची सारी संपत्ति मला जिवंत करूं शकली नसती. तुम्हांला पाहून त्यांना आनंद वाटेल. आंत या, तुमचे कपडे ओले आहेत." तिनें गाडीचें दार विनवणीच्या प्रेमळ अविर्भावानें उघडलें.

फट्! जवळच कुणा पोरानें रबरी फुगा फोडला. "श्रीमान बिर्लोंचें विलायतेंतील वक्तव्य!" सायंदैनिक विकणारा एक पोऱ्या किंचाळला.

...श्रीमान बिर्ला! लक्षाधीश बिर्ला! कोट्याधीश बिर्ला! श्रीधर झिंगूं लागला. बिर्ला मोठ्या संकटांत सांपडले. दरवडेखोरांनीं त्यांच्यावर भयंकर प्रसंग आणला. आपण मोठ्या शौर्यानें आणि कौशल्यानें त्यांचे प्राण वांचवले. कृतज्ञ व सद्गदित स्वरांत बिर्लोंनीं आपल्याला विचारलें, "बोल, तुला काय देऊं? पांच लाख

चालतील? दहा लाख? पंधरा लाख सांग. तुझ्या या उपकाराची फेड कशी करूं!"

पंधरा लाख मागावे, असेंच पहिल्या घडाक्याला श्रीधरला वाटलें. पण असा हावरेपणा अगदींच वाईट दिसला असता. ताठ मानेनें पण धडधडत्या छातीनें श्रीधर म्हणाला, "मला कांहींसुद्धां नको. एक नागरिक म्हणून माझें कर्तव्यच मीं केलें. जातो मी."

त्याला मनांतून भीति वाटतच होती कीं, कदाचित् कर्तव्याचा आनंद भरपूर उपभोगायला बिर्ला त्याला तसाच जाऊं देतील. करतां काय, त्यांच्यांतला पुंजीपति त्या क्षणीं जागा झाला तर? पण नाहीं. तसें घडलें नाहीं. त्याचा हात प्रेमानें दाबून बिर्ला म्हणाले, "तरुण मनुष्या, थांब. तुझ्या शौर्यानें मला वांचविलें! पण तुझ्या निस्पृह चारित्र्यानें मला जिंकलें. जी संपत्ति गुणाचा गौरव करणें जाणत नाहीं, तिचा काय उपयोग?" खिशांतून पेन काढून भराभर त्यांनी एक चेक लिहिला. "तरुण मनुष्या, परमेश्वर तुझें कल्याण करो!" बिर्लांनीं श्रीधरच्या हातांत चेक देत म्हटलें. बिर्ला दृष्टिआड झाल्यावर घाईघाईनें श्रीधरनें तो चेक पाहिला—तो चेक वीस लक्षाचा होता.! मनांतल्या मनांत घाबरत पैसे नाकारण्याचा जो निस्पृहपणा त्यानें दाखविला होता, त्याचें मोल अधिक पांच लक्षांनीं त्याला मिळालें.

'सीताकाकू, मास्तर, दशरथ, माल्ू,' असें ओरडत, तो चेक हलवीत श्रीधर तडक धावत सुटला...

"चिवडा गरम—चिवडा." कर्कश आरोळी उठली. श्रीधर भानावर आला. अंधार पडला होता. काळसर समुद्र फेसाळत होता. वाळवंटावरची गर्दी झपाट्यानें ओसरत होती. श्रीधरला भूक लागली होती. अगदीं कडकडून भूक लागली होती. पलीकडच्या घरांतून फोडणीचा वास तरंगत आला आणि श्रीधरच्या नाकांत शिरला. ताडकन श्रीधर उठला आणि यंत्राप्रमाणें चालूं लागला. उजवी डावी—उजवी डावी—लक्ष

दशलक्ष—लक्ष दशलक्ष. कॅडेल मार्ग, शिवाजी उद्यान, लेडी जमशेटजी मार्ग, टिळक पूल, नप्पू मार्ग, दादर बार...

दादर बारसमोर श्रीधर थोडासा घोटाळला. अन्नाच्या वासाचा नवा गंध त्याच्या दिशेनें आला आणि तो थेट आंत शिरला. बस्स. आतां तो आधीं भरपूर खाणार होता. परिचारकानें खाद्यपत्रिका समोर आणून ठेवली आणि त्यांतील दोन वस्तूवर त्यानें बोट ठेवलें. नंतर परिचारकानें समोरच्या माणसाला कांहीं विचारलें व त्या माणसानें एक बोट वर केलें. वेटरनें श्रीधरकडे प्रश्नार्थक दृष्टीनें पाहिलें व गुंगत गुंगत श्रीधरनेंहि बोट वर केलें.

श्रीधरनें पहिल्या दमांत अर्धा पेला रिकामा केला आणि मग मात्र तो खूप गमतीनें गुंगू लागला. "काय होतं हें, वेटर?" त्यानें परिचारकाला विचारलें. "जिंजर. जिंजर आणि जिन" परिचारक म्हणाला. "जिन म्हणजे—दारू! तरीच ह्या जिंजरला ओ द कलोनचा वास सारखा येत होता आणि जिनचा रंग काय पाण्यासारखाच असतो? तरीच—तरीच! तर मग आज तो दारू प्याला एकूण. ठीक—ठीक—ठीक."

—लक्ष—दशलक्ष! अगदीं लवकरच! अगदीं झपाट्यानें! पहिल्या प्रथम तें पंचवीस सहस्र. मग लक्ष. मग दशलक्ष. नंतर तो दादर बारचें कधींच तोंड पहाणार नव्हता. सी. सी. आय्. चें खूप नांव ऐकलें होतें श्रीधरनें. रेडिओ क्लबचें सुद्धां. त्यांचाच मग तो सभासद झाला असता. पण प्रथम तो बऱ्याच चांगल्या माणसांचें भलें करणार होता. सगळ्या माणसांचें सर्वतोपरी भलें करणं तर त्याला शक्य नव्हतें. पण त्याला माहीत असलेल्या चांगल्या माणसांचें चांगलें मात्र तो अगदीं अवश्य करणार होता. अरेरे, श्रीधरला वाटलें, जगांत इतकीं चांगलीं माणसें, इतकीं गुणी माणसें अशा दुःखांत असावी अं? इतक्या यातना त्यांना भोगाव्या लागाव्यात! उदाहरणार्थ, सीताकाकूंना, त्यांच्या मुलींना. त्यांच्या त्या मुलीशीं तर त्यानें स्वतःच लग्न केलें असतें. अगदीं ठरलें. त्या पडलेल्या मुलीशीं.

श्रीधरला हुंदका आला. आणि त्याच्या डोळ्यांतून पाणी ओघळलें समोरचा माणूस त्याच्याकडे पाहून हंसला. श्रीधरहि हंसला. सीताकाकूहि लवकरच हंसल्या असत्या. आणि त्यांची ती दुर्दैवी मुलगीहि हंसूं लागली असती. जन्माला पुरेल इतकें आधींच रडून घेतलें होतें बिचारीनें. आतां श्रीधर तिला सारखें हंसतमुख ठेवणार होता. अगदीं लवकर. अगदीं निश्चित. चढाओढीचा निकाल लागून पंचवीस सहस्र त्याच्या हातांत येताच! ते पंचवीस सहस्र त्याला निश्चित मिळाल्यासारखेच होते. 'cream' आणि 'dream' मधून त्यानें बिनचूक 'ड्रीम'ची निवड केली तेव्हांच तें ठरून गेलें. पंचवीस सहस्र–पंचवीस सहस्र! भरल्या पोटावर श्रीधर मोठ्या मजेनें गुंगू लागला. पंचवीस सहस्र–पंचवीस...! लक्ष–दशलक्ष!

–परिचारकानें पांढऱ्या चिनीच्या थाळीवर मुंगळ्याच्या तिरप्या अक्षरांत लिहिलेलें बिल आणून ठेवलें आणि सलाम करून तो म्हणाला, "नऊ रुपिया दस आना साब!" झिंगत झिंगत संथपणें श्रीधरनें खिशांत हात घातला. क्षणभर त्याची मुद्रा विचारी झाली आणि विंचू डसल्यासारखा त्या खिशांतून हात बाहेर काढून तो भराभर आपल्या डगल्याचे सारे खिसे पुन्हां पुन्हां चाचपू लागला! छे! त्याचें पैशाचें पाकीट त्या डगल्यांत कुठेंच नव्हते. ती दहाची एकुलती एक नोटहि नव्हती. सारे खिसे श्रीधरनें पुन्हां एकदां घाईनें तपासले. ह्यावेळीं त्याला नवाच शोध लागला. त्याचा एक खिसा साफ कापला गेला होता. ज्या खिशावर तो सारखा मधून मधून हात ठेवीत असे तोच!

परिचारकाचा चेहरा त्वरेनें पालटत गेला. संशय, तिरस्कार, तुच्छता! आणि अखेर गर्भित धमकीच्या ठशावर त्याच्या सुरकुतलेल्या चेहऱ्याचा भाव स्थिरावला. चिमट्यांत बोट सांपडल्यासारखें श्रीधरला वाटलें. खाडकन् त्याची गुंगी उतरली. स्वप्नतंद्रेचे कोमल तंतु अकस्मात

भडकलेल्या वस्तुस्थितीच्या आगीनें जाळून टाकले. "वेटर..." अडखळत श्रीधर म्हणाला,

"मॅनेजर सायबांना सांगा." वेटर गुरकावणाऱ्या कुत्र्यासारखा ओठ दुमडून म्हणाला...पारशी व्यवस्थापक आणि श्रीधर समोरासमोर उभे होते. नाहीं, हा सोदेपणा चालवून घेणें व्यवस्थापकाला शक्यच नव्हतें. पैसे तत्काळ द्यायला पाहिजे होते. आतां–इथें. नाहीं तर पोलिसच्या स्वाधीन करून त्यांचा पाहुणचार देवविणें भागच पडलें असतें. परिस्थिती बांकी होती. "पैसा द्यायलाच पायजे टाल्या!!" व्यवस्थापक मूठ आपटून म्हणत होता. छे:! ह्या परिथितींत स्वप्नरंजनाचें सुख सुद्धां शक्य नव्हतें. प्रश्न खरोखर अगदीं निकडीचा, त्या क्षणाचा होता. चाल-ढकलीला इथें जागाच नव्हती. "वा रे देवा!" श्रीधर स्वत:शीं म्हणाला. "दुसरं कांहीं नाहीं तर नाहीं, पण कल्पनेतलं सुखसुद्धां निरामयपणें भोगायचं आमच्या दैवांत नसावं ना?"

"पैसा द्यायलाच पाहिजे टाल्या!" पुन्हां मूठ आपटून व्यव-स्थापक म्हणाला. आणि व्यवस्थापकाच्या काळ्या जाकिटावरील चांदीच्या शेड्याकडे थिजलेल्या स्थिरतेनें पाहतां पाहतां गुर्मीच्या स्वप्नप्रदेशांत निसटलेली श्रीधरची कल्पना वेगानें फटके मारून नवें चित्र रंगवूं लागली....

...समज इथें तुझा एकादा श्रीमंत हौशी मित्र अकस्मात सुटा-बुटांत आला. आणि खो खो हंसत तुझ्या पाठीवर थाप मारून तो म्हणाला, "काय म्हणतोस श्रीधर, नऊ रुपये दहा आणे केवळ? हाः! हाः! हाः! ए काकड्या! चल उचल ही शंभराची नोट! जरा समोरचा माणूस ओळखून तर वागायला शीक! Have another drink old fellow?"

—"सत्यकथा" ऑगस्ट १९४९

---

विमल भाबडी, लाघवी, सुंदर, सतरा वर्षांची आणि मॅट्रीकमध्यें शिकणारी पोरकट मुलगी होती तेव्हांच तिच्या वडिलांनी तिचं लग्न ठरविलं तें तीस वर्षाच्या एका श्रीमंत पुरुषाशीं. तेरा वर्षांनी तो विमलपेक्षा मोठा होता. पण एवढ्यानं सारं संपलं नाहीं. त्याचं एक पाऊल वाकडं आणि अधू होतं. आपली काळसर देहयष्टी घेऊन तो हेलकावे खात चवड्यांवर चालूं लागला म्हणजे तें दृश्य बरें दिसत नसे. पण एवढ्यांनहि सारं सपलं नाही. तो तोतरा होता. कांहीं शब्दांचं आणि त्याचं उच्चारांच्या विषयांत जन्मजा शत्रुत्व होतं. "रुपये" ऐवजी तो "उपये" म्हणे, आणि "त्यांनीं" ऐवजीं "त्यांगी" म्हणे. विमलच्या आयुष्याची विनोदी विलापिका करण्याचा निर्णय तिच्या वडिलांनीं घेऊन टाकला होता. ह्या विलापिकेला रुपेरी संगीताची साथ भरगच्च होती. इतकी कीं त्यांत विनोद आणि विलाप दोन्हीहि बुडून जाणार होतीं. दरीद्री पण व्यवहारी बापांना एवढेच पहावे लागतें. तशांत विमलची लग्नाविना पाटलेली मोठी बहीण कमल एका भिकारड्या नटाबरोबर पळून गेली होती. माझ्याबरोबर पळून जायला विमलचें वडील तिला संधीच देणार नव्हते. पण बहिणीच्या पावलावर पाऊल टाकायला उतावीळ झालेली विमल माझा हात धरून मला त्याच मार्गानें चालायला सांगत होती.

ह्या विषयांत बायका फार निर्दय. जातच जातीचें शत्रुत्व करते. माझ्याकडे रडत येण्यापूर्वी जात्यायेत्यांनीं विमलच्या दिशेने सफाईदार वार केले होते.

"मुलगा किनई, लग्नाला अगदी एका पायावर उभा आहे!" एक काळुंद्री साभिनय हसून म्हणाली होती. "विमल त्याला बोटांवर नाचवील," दुसरीने नवरदेवाच्या लंगड्या चालीची नक्कल केली होती.

मग तिसरीने जीभ परजली, "विमलसमोर शब्द कांहीं निघायचा नाही तू-त्याच्या तोंडांतून!" "त्यापेक्षा कमल शहाणी हो! आपली हातींपायीं धड असलेल्या माणसाबरोबर पळून गेली!" चवथीने पुस्ती दिली. "शहाणी असेल तर ही सुद्धा जाईल पळून! त्याला कांही हिच्यामागे धावतां येणार नाही!" पांचवीने तोंडाला पट्टा लावला. "काय म्हणावें बाबांना! नुसता त्याचा पैसा पाहिला. तिच्या भावनांचा कांही विचार? तिलाहि कांही स्वतंत्र व्यक्तित्व आहे कीं नाही?" कोण्या विदुषीने समारोप केला.

गेले आठ दिवस विमलच्या मनांत ठासून भरल्या गेलेल्या दारुवर अखेरची ठिणगी पडली. धुमसत आणि हुंदके देतच ती माझ्या खोलींत आली, आणि माझा हात धरून म्हणाली, "बाळू, सोडव मला ह्या नरकांतून! आतां आपण पळून जाऊं."

प्रेम आणि पळून जाणे ह्यांची विमलच्या मनांत अभेद्य सांगड बसली होती. कमलच्या पलायनप्रेमामुळें बसली होती. तिनें शेकड्यांनीं वाचलेल्या गोष्टींतील प्रेमामुळें बसली होती. मी विमलवर प्रेम करीत होतो हें खरें. मला तिच्याशीं लग्न करायचें होतें हेंहि खरें. पण प्रथम मला बी. ए. आणि मग एम्. ए. व्हायचे होते, आणि मग शक्यतर प्राध्यापक. आणखी मग मला लग्न करायचे होते. अवश्य तर तेव्हां पळापळीचेंहि लग्न केलें असतें कदाचित्. पण ह्या क्षणीं पळून जायचें? तेवढें धाडस म्हणा, तेवढा मूर्खपणा म्हणा, माझ्या अंगांत नव्हता. विमलपेक्षां चार वर्षांनीं मी मोठा होतो. आणि अनुभवाच्या आणखी विचाराच्या दृष्टीनें स्वतःला कितीतरी मोठा समजत होतो. पळून जायला तिकीट काढावें लागतें, पळून गेल्यावर गांवोगांव भटकावें लागतें, आणि हॉटेलवाले व चोरून लग्नें लावणारें फार पैसे घेतात, अशी माझी माहिती होती. विमलच्या नवरदेवाइतके पैसे माझ्याजवळ असते तर त्या क्षणीं मी तिच्याबरोबर पळून गेलों असतो. पण पैसे असून तिला पळवून नेण्याची त्याला कांहीं आवश्यकता

नव्हती, आणि मला आवश्यकता असून तितकी माझी ऐपत नव्हती. विमलशीं कोणत्या शब्दांत बोलावं तें मला कळेना. दातांतली पेन्सिल चावत मी म्हणालो, "थट्टा करते आहेस कां विमल?" मला कोणत्याच रीतीनें गुतायचं नव्हतं. पण खरा न वाटण्याइतकी विमलची सूचना चांगली आहे असं मला वाटतं, असंच ती समजली. तिला प्रथम तरी तसंच वाटूं द्यावं असा माझाहि चोरटा हेतू असू शकेल.

"थट्टा नाहीं! आत्ता—ह्या क्षणीं आपण पळून जाऊं." "पण आता आपण पळालों तर पुढं आपल काय होईल?" मी विचारलं. "होईल कसं तरी. जे होऊं घातलं आहे त्यापेक्षा काहीं जास्त वाईट होणार नाहीं." "पण अजून मी बी. ए. सुद्धां झालों नाहीं, आणखी तूं पण मॅट्रिकमध्येंच आहेस. खाऊं काय आपण?" पण खाण्याइतक्या गद्य गोष्टींचा विचार करण्याच्या मनःस्थितींत विमल नव्हती. बी. ए. आणि मॅट्रिकच्या उल्लेखामुळे तिला वेगळ्याच कल्पना सुचल्या. "मॅट्रिकमधल्या मुलींचं का कुठे असं परस्पर लग्न ठरवून टाकत असतात बाळू!" नव्यानें हुदके देत विमल म्हणाली. "मला काहींच कां भावना नाहींत? स्वतंत्र व्यक्तित्व काहींच नाहींच का मला? माझं बरंवाईट ठरविण्याचा अधिकार मला कां नसावा?"

'अधिकार', 'व्यक्तित्व', 'भावना' हे एखाद्या निबर आरशीवाल्या विदुषीच्या तोंडात शोभणार शब्द कचकड्यांच्या बाहुलीसारख्या सुकुमार विमलच्या तोंडात विसंगत वाटत होते. पण स्त्रियांच्या मासिकांतून ती भाषा तिनें वारंवार वाचली होती. तीच न कळत आतां तिच्या तोंडातून बाहेर पडत होती. हुदक्यांचा भर ओसरू लागल्यावर ती पुढें म्हणाली, "आणि लग्न ठरविलं तेंहि ह्या अशा गृहस्थाशीं."

विमलनें पदर चुरगाळून ओटांवर दाबला. जणूं अधिक कठोर शब्द तिचे तिलाच दाबून टाकायचे होते. संतापाच्या ऐन भरांतसुद्धां

ह्याच्या सालस विमलला नको असलेल्या नवऱ्याचा उल्लेख "तो माणूस" म्हणून करवला नव्हता.

" काकांनीं असं करायला नको होतं खरं." मी मान हलवीत म्हणालों.

" सांग, आपण हा अन्याय मुकाट्यानें सहन करायचा का?" तिच्या ' आपण ' ह्या शब्दावरील आघातानें मला झिणझिण्या आल्या.

" काय करूं या मग आपण?" मी विचारलें.

" आपण आज रात्रीं पळून जाऊं. " मेजावरचा आपला तळव पुन्हा माझ्या पंजावर ठेवून ती म्हणाली. " माझ्या दोन साड्या आणि ब्लाऊज आताच मी इथें आणून ठेवते. रात्रीं सारे झोपले म्हणजे मी तुझ्याकडे येईन. माझ्यापाशीं ओवाळणीचे पंधरा रुपये आहेत. तूंहि तुझीं पुस्तकं दुपारीं विकून टाक. आणखी तुझे शिकवण्यांचे पैसे गोळा करून ठेव. आजच रात्रीं आपण पळून जाऊ

ओल्या चमकत्या डोळ्यांनी आणि निश्चयी स्वराने विमलनें आपली योजना माझ्या समोर मांडली. तिच्या ओवाळणीचे पंधरा रुपये, माझ्या शिकवण्यांचे पंचवीस—तीस रुपये आणि दोन साड्या एवढ्या भांडवलावर ती पळून जायला सिद्ध होती. माझ्या पुस्तकांचा देखील तिनं निकाल लावून टाकला होता. तिच्या योजनेंत माझ्या परीक्षांना आणि प्रोफेसरीला कुठे स्थान दिसत नव्हतं.

" विमल, मला नातलग कुणी नाहींत. कुणाकडे जायची सोय नाहीं."

" नसूं दे. कुण्णाकडे आपल्याला जायचंच नाहीं."

" तुझ्या वडिलांना जसं दुसऱ्या घराचं भाडं परवडत नाहीं, तसंच मला दुसऱ्या खोलीचं परवडत नाहीं, म्हणून मी तुमचा पोटभाडेकरू म्हणून राहतों आहें."

" ह्यापुढें तूं इथे पोटभाडेकरू म्हणून राहूं नकोस. मीहि राहणार नाहीं. दोघांचंहि ह्यापुढें एकच घर करूं आपण."

" अग पण विमल, आज शिकवण्या करतो आहे, तरी ह्या खोलीचंच भाडं मला जड वाटतं. शिकण्याची फी जड वाटते."

अरे पण आपलं शिक्षण संपल्यावर फीचा प्रश्नच कुठें राहणार आहे ! आपण पळून जाऊन लग्न करायचं. शिकायचं नाहीं."

आतां ह्या पोरीला काय म्हणावं, तेंच मला समजेना. एक पोरगी " मी पळून येतें " म्हणून म्हणत असतां, " मी येत नाहीं." असं स्पष्ट-पणें तिला सांगणं मला कमीपणाचं वाटत होतं. पुन्हा मी आडवळणानं बोलूं लागलों.

" विमल," मी म्हणाला, " समज आपण पळून गेलों आणि तूं किंवा मी आजारी पडलों, आपले कपडे फाटले, आपल्यापाशीं पैसे नसले, किती त्रास होईल मग तुला ? "

" सगळा त्रास मी सोशीन. आपण एकत्र असतांना सगळं मी सहन करीन. झालं ! "

विमलला वाटल ह्यापुढे माझा आक्षेप असणं शक्यच नाहीं. केवळ तिच्या त्रासाचाच मी विचार करतों आहें असं तिला वाटलं. ती पुढें म्हणाली, " आज रात्रीं वाट पाहा मग माझी." आतां मात्र स्पष्ट बोलणं मला भागच होतं. माझ्या पुरुषार्थाची तिला शरणचिठ्ठी देत मी म्हणालों, " नाहीं विमल."

" तूं वाट पाहणार नाहींस माझी ? " आश्चर्यानें आपले काळेशार डोळे विस्तारून ती म्हणाली.

" नाहीं ! "

" कां बरं ! माझ्यावर तुझं प्रेम आहे. करशील तर तूं माझ्या-शींच लग्न करशील, असं तूं म्हणाला नव्हतास ! मींहि म्हटलं नव्हतं का तसंच ! "

" म्हटलं होतं. पण सगळ्या परीक्षा देऊन झाल्यावर मी तुझ्याशीं

लग्न करणार होतों. अजूनहि केलं असतं. मला कल्पना नव्हती की तुझे वडील इतक्या लवकरच तुझं..."

"तर मग तूं कांहीं माझ्याबरोबर पळून यायला तयार नाहींस." माझ्यावर विमलनें दृष्टि रोखली. तिच्या भाबडेपणालाहि माझी भित्री माघार आतां स्पष्टपणें कळली होती.

"तूं माझ्याबरोबर येणार नाहींस आणि माझ्याशीं लग्नहि करणार नाहींस. मला फार आशा होती तुझी बाळू! तुझ्यावर माझं प्रेम होतं. ह्या गृहस्थावर माझं अगदीं प्रेम नाहीं. आई—आईग!" एकदम विमल फुटून फुटून रडूं लागली.पावसाच्या वर्षावानें कापणाऱ्या कर्दळीच्या कोंवळ्या पानासारखा तिचा ओला चेहरा दिसत होता.

"विमल, विमल—" मी घाबरून उभा राहिलों. आणि तिच्या पाठीवर ठेवण्यासाठीं हात पुढें केला.

"अंगाला हात नको लाऊस माझ्या." झटक्यानें दूर सरत हुंदक्यांनीं गुदमरलेल्या स्वरांत ती म्हणाली.

"मला माहीत नव्हतं तूं असा असशील म्हणून. बरं झालं त्या दिवशीं मी तुला—"

आणि शब्द व हुंदका दाबण्यासाठीं पुन्हा विमलनें पदराचा बोळा ओटांवर दाबून धरला. पण तिचं अपुरं वाक्य मला कळलं. मी एकदा तिचा मुका घेण्याचा प्रयत्न केला होता. पण हातावर हात ठेवण्यापलीकडे ती कधींच गेली नव्हती, आणि मलाहि जाऊं दिलं नव्हतं. पांच क्षणांपूर्वी माझ्याबरोबर पळून यायला सिद्ध असणारी विमल आता माझा स्पर्शहि अमंगळ मानत होती. शेंकडो टांचण्या एकदम टोचाव्या तशा मला वेदना झाल्या.

"विमल" एक पाऊल पुढें टाकून मी म्हणालों, "एक्—एकहि शब्द बोलूं नकोस माझ्याशीं. एक पाऊलहि पुढं येऊ नकोस!" पुन्हां विमलनें हुंदका दाबला.

मंत्रमुग्ध झाल्यासारखा मी जागच्याजागींच थबकलों आणि तिच्याकडे पहात राहिलों. दाबलेल्या हुंदक्यामुळें तिचें सारें शरीर थरथरत होतें, आणि डोळ्यातून आंसवें गळत होतीं. तिचे काळेशार डोळे पावसाळी मेघासारखे सजल दिसत होते. रडण्यामुळें तिच्या चेहऱ्यावर वेगळाच गोडवा आला होता. बेहिशेबी अविचाराच्या एका उर्मीनें क्षणभर मला उंच उचललें. ह्या क्षणीं विमलबरोबर पळून जावें असें मला वाटलें. विमलनें मला बोलूं दिलें असतें तर तेंच मी तिला सांगणार होतों. पण जळत्या दृष्टीनें कांहीं क्षण तिनें मला नुसतें बाधून टेवलें, व मग काय होत आहे तें कळण्यापूर्वीच ती माझ्या खोलीबाहेर धावत गेली. मी भानावर आलो. ऐनवेळीं अविचारापासून विमलनें मला वाचविलें असेंच नंतर मला वाटलें.

× × ×

अडीच–तीन वर्षं विमल माहेरीं आलीच नाहीं. तिच्या घरीं सासू सासरा कुणीच नव्हतें. विमलच्या बाळंतपणासाटीं सुद्धा तिची आई विमलच्याच घरीं गेली होती. परत आल्यावर सारखें ती विमलच्या नवऱ्याचेंच कौतुक सांगत असे. विमलचा नवरा म्हणे तिला सोडून रहायला मुळींच राजी नव्हता. अगदीं बाळंतपणासाटीं सुद्धा नाहीं. आणि विमलसुद्धां आपल्या नवऱ्याला एकटा टाकून यायला तयार नव्हती. माझ्याशिवाय त्याचं कोण पाहील, हा तिचा मंत्र. जणू कांहीं ती अठरा वर्षांची आणि तो एकतीसचा असण्याऐवजीं तोच अठराचा आणि ती मात्र एकतीसची होती. भारी प्रेम होतं दोघांचं. भारी लळा होता विमलला आपल्या नवऱ्याचा. आणि त्याला सुद्धां ती अगदीं जीव कीं प्राण होती. विमल पुन्हा माहेरीं परत येईपर्यंत कितीदां आणि किती जणांना तिच्या आईनें हें सारं ऐकविलं असेल त्याचा हिशेब नाहीं. दुसरा कुणीच श्रोता नसला तर ती विमलच्या वडिलाकडे आपला मोर्चा वळवी, आणि त्यांनाहि तिचें पुराण ऐकण्यांत विमलइतकाच स्वतःच्याहि बुद्धिमत्तेचा गौरव झाल्यासारखा वाटे. विमलच्या संसाराविषयीं तिची 'आई काय म्हणणार

हें जितकें निश्चित झालें होतें तितकेंच तिचे वडील काय म्हणणार हेंहि निश्चित झालें होतें. आईचा कथाभाग आटोपल्यावर समारोप करतांना तिचे वडील म्हणत, “ विमल सुखी व्हायचीच कीं ! आम्हांला माहित होतं ह्या लग्नामुळें ती सुखी होणार म्हणून. वाढत्या वेलीला वेळेवारींच आधार दिला पाहिजे. मग त्याला ती अगदीं घट्ट धरते. तो आधार ओबडधोबड असला तरी चालेल. पण किडका, नासका नसला म्हणजे झालं. विमलच्या विषयांत माझं ऐकलंत तसंच ह्या दुसऱ्या पोरटीच्या विषयांतहि ऐकलं असतंत तर—” ह्या समारोपाच्या वाक्याला विमलची आई साधारणत: उठून स्वयंपाकघराची वाट चालूं लागे.

गेलीं दोन वर्षं विमलच्या सुखी संसाराचीं हीं वर्णनं मी ऐकत होतो. विमलला मुलगा झाल्यावर तर त्यांच्या विशेष आवृत्त्या निघूं लागल्या. तिचं पत्र आलं म्हणजे त्यांना आणखी उजळा चढे. विमल सुखी झाल्याचं ऐकून मला आनंद वाटायला पाहिजे होता. निदान दुःख होण्याचं कारण नव्हतं. पण तिच्या सुखाचीं वर्णनं ऐकून मला कांहीं बरं वाटत नसे. माझ्याशीं लग्न न करतां सुद्धां विमल सुखी झाली होती. एका तोतऱ्या, लंगड्या माणसाबरोबर सुद्धां ती अगदीं आनंदांत होती. एवढंच नव्हे तर तिला त्याचा लळा लागला होता, तिला तो जीव कीं प्राण वाटूं लागला होता. आश्चर्याची गोष्ट होती ! तो कांहीं माझ्यासारखा दुहेरी पदवीधर नव्हता, कीं माझ्याइतका देखणा तर सोडाच, पण अव्यंगहि नव्हता; कीं माझ्याइतका तरुण नव्हता, कीं माझ्यासारखा प्राध्यापक होण्याच्या बेतांत नव्हता. आतां त्याचं बोलणं चालणं अक्षरश: मोठं विनोदी होतं खरं. त्यामुळें विमलला नायक मिळण्याऐवजीं नुसता विदुषकच मिळाला होता. पण विदुषक हा हास्याचा विषय व्हायला पाहिजे, प्रेमाचा नव्हे. तर मग ही वेडी पोर त्या विदुषकालाच धीरोदात्त नायक समजूं लागली होती कीं काय ? कीं नुसत्या त्याच्या पैशावरच ती भाळली होती ? पण हें मात्र मला शक्य वाटेना. विमल अगदींच मूर्ख मुलगी

होती. पैसा कधीं तिच्या हिशेबांतच नव्हता. तर मग काय? माझ्याबरोबर पळून गेल्याविनाच विमल त्या माणसाबरोबर सुखी झाली! ऐकूं तर असेंच येत होतें. विमल त्या माणसाचा संसार करण्यांत खरोखरच रमून गेली असली पाहिजे. एरव्ही कांहीं असतें तर तें अगदींच लपून राहिलें नसतें. ह्या गोष्टींना कुठून तरी वाचा फुटतेच. एकूण विमल त्या माणसा-बरोबरच सुखी झाली आणि त्याच्यावरच प्रेम करूं लागली तर! माझ्या-विना तिचें कांहींसुद्धां अडलें नाहीं एकूण!

आणि हीच कल्पना मला एखाद्या कुसळासारखी सलत होती. मला कळलें असतें कीं, विमल पुष्कळदां एकटी असतांना सुस्कारे सोडते, कधींकधीं अकारण दुःखाच्या छटा तिच्या चेहऱ्यावर उमटून जातात, तर मला बरें वाटलें असतें. तिला माझी पुष्कळदां आठवण येते आणि अशी आठवण झाल्यावर ती विचारक्रान्त होऊन बसते, असें कुणी मला सांगि-तलें असतें, तर मला आनंद झाला असता. पण कानोसा घेऊन पाहिल्या-वरहि तसें मला कुणी सांगेना. विमल मला अगदीं पार विसरून गेली होती, अशांतला भाग नव्हता. तिच्या पत्रांत पुष्कळदां मला नमस्कार सांगितलेला असे. तिची आई प्रामाणिकपणें मला तो पोहोंचता करी, आणि मग विमलच्या सुखाचीं अशीं कांहीं वर्णनें करूं लागे कीं तिला साष्टांग दडवत घालून निरोप देण्याची पाळी माझ्यावरच येई. नमस्कार लिहिण्याइतकी तरी विमलनें माझी आठवण ठेवली होती, एवढीच मला आशेला जागा होती. कदाचित् तिच्या हृदयांत मुक्या दुःखाचें एखादें शल्य असेलहि! किंवा कदाचित् पत्रांतूनसुद्धां कटाक्षानें ज्याचा उल्लेख टाळावा, इतक्याहि महत्त्वाचा माणूस विमल आतां मला समजत नसेल. ही दुसरी कल्पना फारच खिजविणारी होती. मी कांहीं विमलचा आतां कोणी लागणें शक्य नव्हतें. घरादारावर लाथ मारून नेईन तिकडे माझ्या-सवें येण्याविषयीं विमल काकुळती करीत होती, अशी एक वेळ होती. तिच्या अंगांत जेवढें धाडस, जेवढी भावनेची तीव्रता, जेवढा प्रामाणिक-

पणा होता, तेवढा माझ्या अंगांत असता तर विमल माझी झाली असती. ( मग मी एम्. ए. होऊं शकलों असतों कीं नाहीं हा वेगळा प्रश्न होता. ) पण मी सपशेल माघार घेतली. प्रेमाच्या आणाभाकांना मी जागलों नाहीं. व मग ज्या धाडसानें विमल माझ्या-बरोबर लग्न करायला निघाली होती त्याच धाडसानें तिनें एका अपंग माणसाशीं लग्न केलें होतें. एवढेंच नव्हे तर तिचें वैवाहिक आयुष्य पूर्ण सुखी झाल्याचेंहि मी कान किटेपर्यंत ऐकत होतों. खरोखरच आतां तिच्यावर माझा कोणता अधिकार होता ? पण एकेकाळीं आमच्या प्रेमाच्या आणभाका झाल्या होत्या, ह्यामुळेंच तिच्यावर माझा कांहीं अनामिक अधिकार आहे, असें मला वाटत होतें. तिच्या सुखी जीवनाच्या रहस्यानें एकीकडे मला रुखरुख लागली होती, तर दुसरीकडे तें रहस्य जाणून घेण्याविषयीं मला तीव्र उत्कंठा वाटत होती. विमलचें जीवापाड प्रेम—आणि तेंहि एका तोतऱ्यावर—लंगड्यावर ! कसें होऊं शकतें हें ?

तिच्या वैवाहिक आयुष्यांत अवश्य एखादें क्षत असेल. ती येथे आली म्हणजे माझ्या तीक्ष्ण दृष्टीला तें दिसेलच दिसेल. त्या मुक्या, पीडा-दायक दुःखावर मी फुंकर घालीन, आणि मग मी— ! ह्यानंतर माझ्या दूषित कल्पनेला जें सुचे तें साऱ्या सभ्यतेला किळस आणील असे होतें. ते विचार विद्रूप होते, दुष्ट होते, आसक्तीनें बरबटलेले होते. पण आपल्या नवऱ्यासकट खाद्यावर मूल टाकून विमल आज माहेरीं आली तेव्हां ह्याच विचाराचा माझ्यावर पगडा होता. गोडव्यानें फुललेली, अंगानें भरलेली, वेगळ्याच तेजाची लकाकी डोळ्यांत मारणारी विमल टांग्यांतून खालीं उतरली तेव्हां माझी छाती धडधडूं लागली आणि सारीं इंद्रियें झडप मार-णाऱ्या श्वापदाच्या पवित्र्यांत कांहींतरी हेरत राहिलीं. क्षत सांपडलें तर मी अवश्य टोंच मारणार होतों. दाराशीं टांगा थांबला व मी खिड-कींतून पाहूं लागलों.

× × ×

प्रथम टांग्यांतून विमल खाली उतरली. मग तिनें आपल्या दीड-दोन वर्षांच्या मुलाला नवऱ्यापासून घेतलें. आणि मग माझ्यावर पहिला आघात झाला. होय, पडला तिचा नवरा, आणि घायाळ मात्र मी झालों.

" अहो सांभाळून हां–" त्यानें उतरण्यासाठीं पायरीवर पाय ठेवला तेव्हां विमलनें आधार देण्यासाठीं आपला इवलासा हात पुढें केला. " अग नको ग विमय, मी अगदीं बयोब्बय उतलतो पहा ! " मोठ्यानें हंसून तो म्हणाला. त्याला " बयोब्बय " उतरतां आलें, पण तें थेट भुईवर लोळण घेऊन ! तो पडला तेव्हां विमलचा झालेला चेहरा मी आजन्म विसरणार नाहीं. ती पांढरी फटक पडली, ' अयाई ' म्हणून ओरडली, आणि तिच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलें. जणूं तिच्याच हृदयावर प्रहार झाला होता, तिचेंच शरीर ठेंचाळून निघालें होतें, व तीच धुळींत दीनवाणी पडली होती. विमलची आई समोर धावली, वडील धावले, मीहि तिथें गेलों.

" कशी चांडाळीण आहे मी ! " त्याला बसतें करीत विमल स्वतःला बोल लावून घेत होती.

" अग मी उठतों विमय ! अगदी बयोब्बय उटतों ! " तिचा हात पुन्हा नाकारत तो खरोखर उठून उभा राहिला, आणि अंग झटकून मोठमोठ्यानें हसत तिला म्हणाला, " वेडी ! मुईच कुठे यागय नाहीं मया ! " " किती घाबरलें होतें मी ! " आसवांतून हंसत विमल म्हणाली. वास्तविक त्याचा अधू नसलेला पायहि चांगलाच मुरगळला असला पाहिजे. कारण सासऱ्याचा आधार घेऊन चालतांना वेदना लपविण्याच्या प्रयासांत त्याचा चेहरा तटतटत होता, व ओंठ एकमेकांवर न कळत दाबले जात होते. आणि तरीहि हळव्या विमलचें समाधान करण्यासाठीं तो सारखा म्हणतच होता, " कुठं काय झायय मया ? नुसता वडीय मंडयींना नमस्काय घातया आया बयोब्बय ! " आणि " कांहीं झाय नाहीं मया " हें सिद्ध करून दाखविण्याच्या ईर्षेनेंच दुखऱ्या पायानें दिवसभर तो फिरत

राहिला, आणि मग दुसऱ्या दिवशीं निरुपायानें त्याला आंथरूण धरावेंच लागलें. चांगले चारसहा दिवस त्याला आणि विमलला तें दुखणें पुरलें. तो शरीरानेंच आजारी होता पण माझें मन विमलला सारखें त्याच्या भोंवती घोटाळतांना पाहून ठसठसूं लागलें. मुलाला बहुतेक वेळां आईच्याच स्वाधीन करून विमल सदासर्वदा ह्या तेहतीस वर्षांच्या तान्ह्याचीच चाकरी करतांना मला दिसे. मी दिसलों तितके वेळा किंचित् मान कलती करून सस्मित तिनें माझी दखल घेतली तेवढीच. एरव्हीं लहान मुलाच्या खाण्यात तितक्या आणि त्या तऱ्हेच्या त्याच्या खस्ता खाण्यांतच तिचा वेळ चालला होता. तो फारच हट्ट करूं लागला म्हणजे, "ऐकता कीं नाहीं माझं ! " म्हणून आज्ञार्थी स्वरांतहि ती त्याच्याशीं बोलत असे. आणि तिचा तो प्रेमाच्या अंतिम अधिकाराचा शब्द ऐकतांच एखाद्या आज्ञाधारक कोंकरा-प्रमाणें तो तिचा हात चाटूं लागे. माझ्या खोलींत येण्याविषयीं एकदा मी तिला निमंत्रण दिलें तेव्हा "येणारच होतें केव्हातरी मी. माझं तुमच्याशीं कामहि होतं थोडं." असंही ती म्हणाली होती आणि त्यामुळें माझ्या मुरगळलेल्या मनांत कांहीं अनामिक अपेक्षाहि बळावल्या होत्या. तिचा "केव्हातरी" उगवण्याची मी उत्सुकतेनें वाट पहात होतों. पण तूर्त ती माझ्याकडे येण्याचा मुळींच संभव दिसत नव्हता. तिचा साराच वेळ तिच्या नवऱ्याच्या खोलींत आणि त्याच्याच सेवेंत जात होता. त्याचे सर्वच व्यवहार आथरुणावर व आथरुणापाशीं चालले होते. ते सारे व्यव-हार अर्थात् विमलच उपसत होती. आणि मी पुन्हां तिला निमंत्रण देण्याची संधि साधण्यासाठीं वारंवार त्याच्या खोलीभोंवतीं एखाद्या अस्वस्थ आत्म्याप्रमाणे घिरट्या घालीत होतों. त्यांच्या संवादाची चाहूल घेतां आली तर तीहि मी घेत असे. मीं जें पाहिलें आणि ऐकलें त्यामुळें अशान्त होतो, व मला शांतता देईल असें कांहीं ऐकतां किंवा पाहतां आल्यास तें मला पहावयाचें होतें. एक दिवस त्याचा हट्टाचा, जिद्दीचा चढा सूर मी ऐकला आणि त्यांच्या खोलीभोंवती घोंटाळत राहिलों. निस्संशय हा तीव्र

स्वर भांडणाचा होता. चारचौघांत तोंडदेखला गोडवा पेरणारी नवरा-बायको पुष्कळदा एकान्ताच्या साक्षीनें एकमेकांचे वाभाडे काढतात. त्याचा सूर मी ऐकला, व मला वाटलें की रेशमी अविर्भावांत दडवून ठेवलेले त्यांच्या वैवाहिक जीवनाचें कोणतेंतरी जहाल रहस्य आतां माझ्या अगदीं आटोक्यांत आलें आहे. जागा धरून गुरगुरणाऱ्या शिकारी कुत्र्याच्या स्वरांत तो म्हणत होता—

" विमय, आजवय पुष्कय ऐकून घेतय तुझ! साफ सांगतो, ह्यापुढें ऐकणाय नाहीं ! "

" ऐकणार नाहीं म्हणजे ? ऐकलं पाहिजे ! "

" ऐकय पाहिज म्हजे ? ऐकणाय नाहीं ! "

" अहो पण त्यात मी वाईट काय करते आहे ! "

" तू वाईटच कयते आहेस ! पुष्कळ दिवस तू हे वाईट काम केयस ! "

वाईट काम ! माझं काळीज फुललं. कान टवकारून मी पुढें ऐकूं लागलों. तो म्हणाला, " ह्यापुढे असय वाईट काम मी तुया कयूं देणाय नाहीं ! "

" मग काय करणार तुम्ही ? "

" माझ काम मीच कयणाय ! "

" माझं काम आणि तुमचं काम वेगळीं आहेत का ? "

" पण हें काम मीच कयणाय ! आतां मी बया आहे ! " त्याची दृष्टि एकाच दिशेनें लागली होती. पलंगाच्या पायथ्याशी ठेवलेल्या बेड-पॅनवर त्याची नजर रोखलेली होती. एवढंच नव्हे तर " मी बया आहे " हें सिद्ध करण्यासाटीं, त्या दिशेनें चालण्याची तो धडपड करीत होता.

" उठू नका-उठू नका म्हणते ना ? ऐकणार की नाहीं तुम्ही माझं!' मर्यादेबाहेर व्रात्यपणा करूं पाहणाऱ्या मुलाला ज्या स्वरांत तिनें दाबलें असतें तसेंच तिनें त्यालाहि दाबलें. तो क्षणभर दबला व पुन्हां पलंगावर

बसला. विमलनें संत्री पिळलीं, रस पेल्यांत गाळला व तो पेला स्टुलावर ठेवीत ती म्हणाली, " आतां घ्या बरं हें पटकन्. "

" मी घेणाय नाही ! "

" असं काय बरं ? " ती काकुळतीने म्हणाली.

" मी घेणाय नाहीं. " तो पुन्हां म्हणाला.

" असा भलता हट्ट कां करतां ? "

" मग कबूय कय की माझ्या घाण भांड्यांना हात लावणाय नाहीं? "

" मी कबूल करणार नाहीं ! "

" मी घेणाय नाहीं ! "

" नाहीं घेणार ? "

" नाहीं. "

" नाहीं घेणार ? "

" नाहीं. "

" ठीक आहे, तर मग मीहि आज जेवणार नाहीं. "

ती पलीकडच्या खुर्चीवर जाऊन विणकाम करीत बसली तरी डोळ्याच्या कोपऱ्यांतून त्याच्याकडे पहातच होती. तो काळा असला तरी त्याचा चेहरा अतिशय लवचिक होता. त्याच्या पालटत्या वृत्तीचा प्रत्येक ठसा ओल्या सागरतीरावर उमटणाऱ्या धावत्या पावलांप्रमाणे त्याच्या चेहऱ्यावर उमटत असे. हट्ट—आग्रह—आदर—स्नेह—करुणा—अनिश्चय ! त्याच्या दृष्टीने आसमंतांत अनेक वर्तुळें घेतलीं व ती पुन्हा पुन्हा तिच्यावर स्थिरावली. जणूं त्याच्या साऱ्या सृष्टीचें तीच केंद्र होती. व अखेर त्याने तिचा आश्रय घेणेंच प्राप्त होते. ती त्याच्याकडे ज्या तिर्यक् दृष्टीने पहात होती, त्याच दृष्टीने तिच्याकडे पहात मवाळ पडलेल्या स्वरांत त्याने हाक मारली—

" विमय, ए विमय ! "

" काय म्हणतां ? " अत्यंत स्नेहपूर्ण स्मित करीत ती त्याच्याजवळ आली. त्याने तिचे दोन्ही हात हातांत घेतले, व वर उचलले. जणूं एखादी

नवी वस्तु तिला दाखवावी तसे तिचेच हात तिला दाखवीत तो म्हणाला—

" हे हात किती सुंदय आहेत ? " तिने कांहींच उत्तर केलें नाहीं. प्रत्यक्ष पद्धतीने शिकविणाऱ्या शिक्षकाच्या अनुनयपूर्ण स्वरांत पुन्हा त्याने विचारलें.

" आहेत ना ? "

" बरं आहेत ! " ती म्हणाली.

" हे गाय किती सुंदय आहेत ? आहेत ना ? "

" बरं आहेत ! "

" आणि हे डोये किती चांगये आहेत ? "

" आहेत ! "

" आणि ही सगयी विमयच किती गोड आहे ! "

" बरं असेल ! "

" नाहीं, आहे ! "

" बरं, आहे ! "

" हा:—हा: ! " करून मोठ्या विजयाने तो हंसला, व म्हणाला— " तय मग ह्या सुंदय विमयेने माझीं वाईट कामें कयावी का ? मला ते बय वाटेल का ? वाटणाय नाहीं ! " आपण जिंकली, अशा समाधानाने तो तिच्याकडे पहात राहिला. विमलनें आपला गुलाबगेदासारखा चेहरा पूर्ण-पणें वर उचलला व कांहीं क्षण ती त्याच्याकडे नुसती पहात राहीली. तिच्या काळयाभोर डोळयांत अवर्णनीय स्नेहाच्या उर्मीमागून उर्मी उसळत होत्या. आतां ती त्याच्या अगदी जवळ जाऊन बसली, व त्याचे दोन्ही हात हातांत घेऊन, अत्यंत मृदु स्वरांत तिने त्याला विचारलें—

" हे हात कुणाचे आहेत ? अगदीं खरं खरं सांगा बरं का ! "

" तुझे ! " तो म्हणाला.

" आणि हे पाय ? " तिने त्याच्या पायाला बोट लावून विचारलें.

" तुझेच ! "

" आणि हे डोळे, हें तोंड, हे ओठ ? " तिने क्रमशः तेथे स्पर्श केला. सुंदर रांगोळ्यांनी एखादें आंगण भराभर मुद्रित व्हावें तसा त्याचा लवचिक चेहेरा भराभर पालटत गेला. " हे साये साये तुझे ! पण हे हात काये आहेत, हें तोंड चांगयें नाहीं. हे डोये बाईक आहेत ! "

" पण मग ते माझे हात काळे आहेत ! माझे डोळे बारीक आहेत ! माझें तोंड चांगलें नाहीं ! कारण ते सारे माझेच आहेत. तुम्ही माझेच आहांत. तुम्ही मीच आहांत आणि मी तुम्ही आहे ! "

" विमय–! " त्याच्या स्वरांतला कसलातरी अवर्णनीय कंप आला.

" ऐका ! माझे हे काळे हात तुमच्या शरिराची सेवा करतात, त्यांना स्पर्श करतात म्हणून ते चांगले आहेत. माझ्या ह्या बारीक डोळ्यांना तुम्हीच दिसता म्हणून ते चांगले आहेत. माझ्या ह्या वाईट चेहऱ्यांत तुमच्या सुंदर चेहऱ्याचेंच प्रतिबिंब पडतें म्हणून तो सुंदर आहे. "

" विमय–" त्याच्या स्वरांतला कंप आणखी वाढला.

" मी आजारी पडलें होतें तेव्हां माझ्या खस्ता कुणी काढल्या ? वाटली होती कां माझी घाण तेव्हां तुम्हांला ? वाटली नव्हती ! कशी वाटेल बरं ! मी आजारी होते म्हणजेच तुम्ही आजारी होतात. स्वतःची घाण तुम्हांला वाटली असती तरच माझी घाण वाटली असती. पण तुमचं सगळं सौंदर्य तेव्हां मी पाहिलं. तुमच्या सुंदर हातांनीं तेव्हां तुम्हीं माझी सेवा कलीत ! तुम्ही सुंदर होतात म्हणून मी सुंदर झालें ? बोलाल कां पुन्हां असं? "

" विमय–विमय– " सद्गदित कंठानें साद घालून त्यानें हात पसरलें व एखाद्या बळकट वृक्षावर झेंपावणाऱ्या वेलीप्रमाणें ती त्याला लपेटली. दोघेंहि कांहीं क्षण स्तब्ध होते, व दोघांच्याहि डोळ्यांत आंसवें आलीं होती. मग पुन्हां ती किंचित् मागें झाली. व दोन्ही तळव्यांत त्याचा चेहेरा धरून म्हणाली,

" हा सुंदर चेहेरा कुणाचा ? "

" तुझा..." तो म्हणाला व त्यानें तिचे हात उचलून तिला विचारलें, " आणि हे गोरे हात कुणाचे ?"

" तुमचे!" ती म्हणाली. " आणि हा इथला सगळा चांगुलपणा कुणाचा ?" त्याच्या छातीवर हात ठेवीत तिनें विचारलें.

" तुझा विमय! तुझा–तुझा–तुझा!"

" माझा गोरेपणा तुमचा, तुमचा चांगुलपणा माझा. माझे डोळे तुमचे, तुमचे डोळे माझे, तुम्ही म्हणजे मी, मी म्हणजे तुम्ही, आपण एकच!"

" आपण एकच–विमय, आपण एकच!" आणि त्यानें पुन्हां हात पसरले. तो देखावा आतां मला असह्य झाला. नांगी उभारून जणूं शेंकडों विंचू माझ्या शरीरभर चालत होते. चिरानें कणकणानच मी बिछान्या-वर येऊन पडलों. कधीं बरा होईल हा! आणि कधीं विमल माझ्याकडे येईल!

+ + +

आणि मग विमल एक दिवस माझ्या खोलींत आली.

" इतक्या दिवसांनीं आज यायला होत आहे तुमच्याकडे!" आदरार्थी संबोधन! तशाच संबोधनाची माझ्याहि कडून तिला अपेक्षा असेल. त्या संबोधनानें तिनें मला एकदम दूर ढकललें. पण आज मी तिच्याजवळ जायचा निश्चयच करून बसलों होतों.

" वा ग विमल! अहो जाहो करून बोलायला लागलीस इतक्यांत? तीनच वर्षांत अगदीं आजीबाई झालीस?"

" आजीबाई नाहीं, पण आई तर झालें!" पदराच्या टोंकानें वारा घेत ती म्हणाली. " आणखी आजीहि पण होईन हळू हळू!" तिनें दिलेल्या तिच्या मातृत्वाच्या स्मरणानें मला झोंबणारा चिमटा घेतला.

" होशील तेव्हां होशील! पण आजपासूनच कशाला मला अहो जाहो करतेस?"

"तुम्हीं होणार आहांत प्रोफेसर, तेव्हां मला तुम्हाला अहो जाहोच म्हणायला पाहिजे. तुम्ही मला अगतुग म्हणूं लागलांत तर मी काय म्हणणार बापडी ?" तिच्या बोलण्याचा सूचितार्थ स्पष्ट होता. आंवढा गिळून मी म्हणालों, "मुद्दाम भेटायलाच आली होतीस कीं कामहि होतं कांहीं ?"

"भेटीलाही आलें होतें आणि कामालाहि आलें होतें. भेटल्याशिवाय तर काम कांहीं होणार नव्हतं ?"

"कसलं काम ?"

"तुम्हांला एक विचारायचं होतं."

"विचार!"

"एम्. ए. झालांत, लेक्चरर झालांत, प्रोफेसर व्हाल लवकरच. बायको आणायचा विचार आहे कीं नाहीं ?"

"विचारच केला नाहीं अजून!"

"मग करा कीं आतां! लग्नाचंहि एक वय असतं!"

"असं का आजीबाई ? वा ग, स्वतःचं लग्न झालं कीं जगाचं लग्न लावायला बायका एवढ्या कां उत्सुक होतात ?"

"तें सांगून समजायचं नाहीं. त्याच्यासाठीं स्वतःचं लग्न करून पहा म्हणजे कळेल!"

"काय कळेल ?"

"एकट्याच्या एका आयुष्यांतला आणि दोघांच्या एका आयुष्यांतला फरक. हें पहा, माझी सरला नांवाची नवी मैत्रीण झाली आहे –!"

"दिसायला कशी आहे ?"

"तोंडावर थोडे देवीचे वण आहेत, बाकी चांगली आहे !"

"रंगानं ?"

"काळी सावळीच आहे, पण पोरगी मोठी गोड आहे !"

"आणि डोळे ?"

" मोठे आहेत, पण अधू आहेत. बाकी नांव ठेवावयाला कुठें जागा नाहीं. इंटर यंदाच झाली. असा छान संसार करील सरल !"

" वा विमल! रंगानं सरल थोडी काळी आहे, डोळ्यानं थोडी अधू आहे, चेहऱ्यावर थोडे टांके आहेत. बाकी पोरगी मोटी छान आहे अं !"

" हो छानच आहे! संसार नुमत्या रूपानं होत नसतो. त्याला दुसऱ्याच गोष्टी लागतात. रूपाशिवाय अडत नाहीं, पण त्या नसल्या तर बरीक चालत नाहीं."

" तर मग काय मी त्या सरलच्या तोंडावरच्या देवी मोजत आनंदानें जन्म घालवावा असा तुझा सल्ला ? "

" सांगतेंना, तिच्या सहवासांत आल्यावर ती तुम्हांला वेगळीच दिसेल. तिच्या तोंडावर देवी आहेत असं मुळींच तुम्हांला वाटणार नाहीं. ती काळी आहे हेंच तुम्हांला पटणार नाहीं. फार प्रेमळ पोरगी आहे सरल. फार कष्टाळू, फार सहनशील. तिला जवळून पाहिलं म्हणजे तिच्या बाहेरच्या रंगारूपाचा विसर पडतो, आणि तिचं कांहीं वेगळंच रूप दिसूं लागतं माणसाला आणि त्याच रूपाची माया लागते !"

" असं होय?"

" आतां आमचच पहाना! इतरांना हे सुंदर वाटत नसतील. पण मला यांच्यासारखा सुंदर पुरुष दुसरा दिसत नाहीं. त्यांचं तें रूप मलाच कळूं शकेल, मलाच तें दिसेल, आणखी तें आहे पण माझ्याचसाठीं. नाहीं काय ? "

" विमल !" माझ्या स्वरांत तीव्रता आली. माझें भान जाऊं लागलें " विमल, सरल नांवाच्या ह्या टाचवलेल्या मुलीची माझ्याजवळ तूं तरफदारी करतेस ? तूं ? "

" कां बरं ? तशीच गुणाची आहे सरल ! कुणीहि डोळे मिटून तिच्याशीं लग्न करावं !"

"तूं एक डोळे मिटून घेतले आहेस तेवढं पुष्कळ झालं. तुझ्या नवऱ्याचे डोळे झांकलेले आहेत तेंहि चांगलंच आहे !"

"काय बोलतां आहांत तुम्ही हें ?" विमल ताडकन् उठून उभी झाली. मीहि माझी खुर्ची सोडून तिला सामोरा झालों व म्हणालों, "जें ऐकलंस तेंच ! खरं सांग विमल,तूं आपल्या नवऱ्याला सारं सांगितलं आहेस ? एके रात्रीं तूं माझ्या खोलींत आली होतीस हें त्याला माहित आहे ? माझ्या खुणेवर तूं नाचत होतीस हें त्याला माहित आहे ! माझ्याबरोबर पळून जाण्याचा हट्ट तूं धरला होतास हें त्याला माहित आहे ? तुझा हा हात–हा मीहि कित्येकदा धरला होता हें त्याला माहित आहे ?"

माझ्यांतला सैतान आतां पूर्णपणें मोकाट सुटला. विमल एकेकाळीं माझ्या हाताच्या टप्प्यांत होती हें मला आठवलें. विमल माझी नाहीं, पण माझी होऊं शकली असती हें मला आठवलें. तिचा स्पर्श, त्या स्पर्शाची आग, त्या स्पर्शाची मृदुता व आकर्षण, सारीं मला आठवलीं व बेभानपणें समोर होऊन मी तिचा हात घट्ट, अगदीं घट्ट धरला. विमल प्रथम इंगळासारखी लाल झाली व सीमेच्या संतापानें तीच लाली संगमरवरा-सारखी शुभ्र पडली. तिच्या डोळ्यांतून ठिणग्यांचे झोत उडाले व थिजलेल्या तिरस्कारांत ते विझून गेले. तिनें किंकाळी मारली नाहीं, हालचाल केली नाहीं. तिच्या हातावर माझीं बोटें उमटलीं तरी तिनें नुसता सुस्काराहि सोडला नाहीं. ज्या दृष्टींतील थंड आग्रहाला व भाजल्या तुच्छतेला उपमा नाहीं, अशा दृष्टीनें एखाद्या काष्टपुतळीसारखी ती नुसती माझ्याकडे पहात राहिली. मला जें पाहिजे होतें तें मला मिळालें नव्हतें. एका पिसाट प्रयत्नांत माझ्या हातांनीं जें शोधलें होतें, तें त्यांना सांपडलें नव्हतें. आपापतःच माझे हात तिच्या हातावरून गळून पडले व त्याच क्षणीं "विमय, ए विमय !" म्हणून हाका मारत तिचा नवरा माझ्या दारांत येऊन उभा राहिला. "बोयनं चायल आहे वाटतं ! चायू द्या, चायू द्या !" तो म्हणाला व परत फिरला.

" ऐकलं का ? " विमलनें त्याला हांक मारली.

" का ग ? "

" आपण तिथेच, त्या दारात उभं राहावं क्षणभर ! "

चेहऱ्यावर कोणतेहि आश्चर्य न दाखवितां तो पुन्हां वळून दारांत उभा राहिला, व काय होतें आहे तें मला कळण्यापूर्वीच तिनें एक आश्चर्यकारक गोष्ट केली. चटकन् पुढें होऊन तिनें माझा हात धरला, तसाच धरून ठेवला, व मग ती आपल्या नवऱ्याला म्हणाली " जावं आपण आतां ! येते मी इतक्यात ! " चेहऱ्यावरील रेषाहि ढळूं न देता विमलचा नवरा तिथून निघून गेला. माझ्या जिभेला कोरड पडली. माझें सारें आंग पाषाणाचें झालें आहे असें मला वाटलें. आणि तरीहि विमलच्या हाताचें ओझें मला सहन करवेना. त्या भाराखालीं मी दबून जात आहें, चिरडून जात आहें असें मला वाटलें व एका मृत क्रियेनें माझा हात मी तिच्या हातांतून काढून घेतला.

" कां ! घाबरलात ! माघार घेतलीत ? " विमलच्या नाकपुड्या किंचित् थरकल्या व पुन्हां आपला हात माझ्या हातांत देत ती म्हणाली, " कसा वाटतो हा हात बाळासाहेब ? नुसती माती—खरं ना ? थंड ! मुर्दाड ! घ्या, धरा तर ही माती हातांत ! हा हात केवळ त्यांच्यासाठींच आहे, आणि तुमच्यासाठीं आहे नुसती माती ! तुम्हाला जें पाहिजे होतं तें सांपडलं का तुम्हांला ह्या हातात ? "

" विमलाबाई, " मी घोगऱ्या आवाजात पुटपुटलों. " छी: छी: ! नुसते भेकडच नाहीं तुम्ही, नुसते मूर्खच नाहीं; अगदीं किळसवाणे आहांत ! आईचा हात धरून तिथे काय सांपडेल तुम्हाला ? बहिणीचा हात धरून तिथे काय सांपडेल तुम्हांला ? नुसत्या हाडामांसाच्या हातांत अखेर असतं काय ? धरा—धरून ठेवा पाहूं माझा हात ! "

" विमलाबाई; " मी अवाक् झालों, मला शब्द सांपडेनात.

" माझा हात धरून मी मिळणार आहे होय तुम्हाला ? आतां ? ते मला मिळाल्यावर ? आम्ही दोघं एक—अगदीं एक झाल्यावर ? नुसता क्षणिक मोह नाहीं आमचा ! आमचा स्नेह म्हणजे नुसतं शरीरावर आधारलेलं वेड नाहीं ! तीन वर्षं आम्ही बरोबर सुखदु:ख भोगतो आहोंत. एकमेकांना साथ देतों आहोंत. सारखीं परस्परांत मिळून जातो आहोंत. जगाला ते कुरूप दिसत असतील, मला ते सुंदरच दिसतात. आईला आपलं मूल कुरूप असत नाहीं. बायकोला आपला नवरा कुरूप असत नाहीं. कुरूप शरीर असूं शकतं बाळासाहेब, माया कुरूप असत नाहीं. जिथे माया जडते, तिथे ती सारं सुंदरच करते ! प्रेमाला कुरूपता दिसतच नाहीं, तिथे कुरूपता टिकतच नाहीं ! "

" विमल—विमलाबाई. "

" मी त्यांना सारं सांगितलं कीं नाहीं, तें पाहिजे होतं नाहीं तुम्हांला ? हो, मी त्यांना सारं सांगितलं. अगदीं सारं सारं सांगितलं ! तेव्हांच माझा पुनर्जन्म झाला. तेव्हांच त्यांचं सौंदर्य मला दिसलें ! तुमच्या मनांत माझ्या शारीरिक रूपाचं प्रेत जें सडत पडलं होतं, तशी मी त्यांना मिळालें नाहीं ! मी त्यांना अगदीं नवी होऊन मिळालें ! आणि तुम्हा साऱ्यांना दिसतात त्यापेक्षां अगदीं वेगळेच ते मला सापडले. आम्हाला आतां तोडण्याची तुमची प्राज्ञा आहे होय ? त्यांच्या अगदीं देखत मी तुमचा हात धरला पण त्याना माहीत आहे कीं मी तुम्हाला नुसती माती दिली ! मी तर त्यांच्याच जवळ आहें, आम्ही तर एक आहोंत ! त्यांचा विश्वास आहे माझ्यावर ! विश्वासाचं आणि मायेचं हें सौन्दर्य कधीं दिसेल का तुमच्या आंधळ्या डोळ्यांना ! म्हणा, आतां म्हणा, ते कुरुप आहेत, तोतरे आहेत, आंधळे आहेत ! "

एक दीर्घ श्वास घेऊन ती थांबली आणि आतां तिच्या डोळ्यांत पाणी आलं. माझ्या हृदयांतहि आगीच्या वर्षावानं कांहीं तरी जळून गेलं,

आणि गंगेच्या सिंचनानं कांहीं तरी फुलून आलं. मला न जुमानतां मी हुंदका दिला, आणि एका अनावर आवेगासरशीं तिचे पाय धरले. " विमय–ए विम ऽ ऽ य ! " पुन्हा तिच्या नवऱ्याची हांक आली व मुलाला खांद्यावर घेऊन तो पुन्हा दारांत आला.

" ह्याला घे बघूं ! आणि पाज हें पाणी ! तुझ्याशिवाय पीत नाहीं म्हणतो. "

विमलेनं नवऱ्याच्या हातांतून पाण्याचा पेला घेतला व मुलाच्या तोंडाला लावला. त्यानें " ना " म्हणून मान वळविली. त्या पेल्याला तिनें ओठ लावले व पुन्हा तो त्याच्या समोर धरला. त्यानें पुन्हा मान हालविली व म्हटलें " ना ! " विमलच्या नवऱ्यानें त्या पेल्यांतून कांहीं घोट घेतले, मग विमलनें घेतले व मग बिनतक्रार त्या मुलानें. पुन्हा विमलनें त्या प्याल्याला ओठ लावले, मग तिच्या नवऱ्यानें व मग त्या दोघांना अभेद्य एकरूपता देणाऱ्या त्यांच्या प्रेमाच्या प्रतीकानें ! तीं तिघेंहि जीवनाच्या एकाच प्याल्यांतून घोट घेत होतीं. आणि क्षणांत फुलणाऱ्या व क्षणांत उलणाऱ्या मनानें मी तें प्रेमसंगमाचें दिव्य दृश्य पहात होतों.

" सुषमा " सप्टेंबर १९४८

———

# आमच्याकडे मिळणारीं पुस्तकें

| | रु. | | रु. |
|---|---|---|---|
| तरुणींचे प्रश्न | ४ | उर्मिला | ३ |
| आमचें स्त्री जीवन | ३ | बदसूर जोडपीं | २ |
| प्रेमिकांशीं हितगुज | २ | नरमगरम | २ |
| स्वप्न | ३ | विचित्र वाटमारी | १॥ |
| आणि त्यांनीं संसार केला | ३॥ | मोरांचा नाच | १। |
| पुनर्जन्म (नाटिका) | ·॥· | अकबराचें वेदसाधन | २॥ |
| नवें क्षितिज (नाटिका) | ·॥· | सायंकाळच्या सावल्या | २॥ |
| साहित्य सुवर्ण | ३ | प्रतिभा लांछन | २॥ |
| नामसुधा वेणूसुधा वनसुधा | २ | एकलें बीज | १॥ |
| ओढ—शांता शेळके | ४ | वसंत वैभव | १। |
| पेटती मशाल | ४ | कागदी विमानें | १॥ |
| धाडसी झुंजार | १ | ऐतिहासिक पोवाडे | २ |
| विषारी बाण | १ | वसईची मोहीम | ३॥ |
| चाफेकर—रानडे—फटका | ·।= | मंदज्योती | १॥ |
| वाळूचें घड्याळ | ३ | श्रावणांतील विजा | १॥ |
| चल पुढें | ३ | चित्रा | २ |
| ऐकावें तें नवलच | ३ | सुरसुरी | २ |
| पिवळा बंगला | ३ | जीवनसंग्राम | २ |
| अल्ला हो अकबर | ६ | अनिर्बंध जीवन | ३ |
| चंद्रा व इतर गोष्टी | २ | अगं पद्दा | २ |
| लाडकी लक्ष्मी व इतर गोष्टी | २ | ताजमहाल | २॥ |
| रेघोट्यांचें दैवत | २ | आसरा | ३ |
| साहित्यसेवेंतील स्मृति | २॥ | तुटलेले तारे | १॥ |
| नैनीच्या तुरुंगांत | २ | सागराच्या लाटा | १॥ |
| धूम्रतरंग | २ | काल व आज | १। |